शेक्स्पियर—कविकृत नाट्य माला,

# खंड ५ वा.

---

# ज्यूलियस सीझर

प्रस्तावना, गुणदोष विवेचननात्मक उपोद्घात व कथानक यांसहित.

भाषांतरकार

## खंडेराव भिकाजी बेलसरे.




कीं हे अमृताचे मेघ वोळले। कीं नवरसांचे वोघ लोटले।
नाना सुखांचें उचंबळलें। सरोवर हें॥

रामदास.

प्रकाशक

के. सी. कुळकरणी आणि मंडळी, मुंबई.

मुद्रक

व्ही. जी. जोशी, गणपत कृष्णाजी प्रेस कंपनी, गिरगांव मुंबई.

सन १९१२

किंमत रु० १



# अनुक्रमणिका.

## चित्रपटांचें टिपण.



---

**प्रकाशक**—के० सी० कुलकर्णी आणि मंडळीचे मॅनेजर रा० खंडेराव भिकाजी बेळसरे यांनीं पुणें येथें प्रकाशित केलें.

**प्रिंटर**—व्ही. जी. जोशी यांनीं गणपत कृष्णाजी प्रेस मुंबई, पालवरोड गिरगांव येथें टायटल व प्रस्तावना पृष्ठें १ ते ३६ व संविधानक पृष्टें १ ते १२ व नाटक पृष्टें १ ते १९२ व जाहिरात पत्रिका पृष्ठें २ ते २० छापिलीं आणि आर्यभूषण प्रेस पुणें येथें प्रस्तावनेचीं पृष्ठें ३७ ते ४८ व संविधानकाचीं पृष्ठें १३-३२ आणि अनुक्रमणिका पेज १-२ नटेश अप्पाजी द्रवीड यांनीं छापिलीं.



न्यायमूर्ति सर नारायणराव चंदावरकर,

मुंबई हायकोर्टाचे जज्ज् व मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हाइस् चॅन्सलर्.

The Bombay Art Printing Works, Fort.

नाम० न्यायमूर्ति

## सर नारायणराव चंदावरकर

मुंबई हायकोर्टाचे जज्ज, मुंबई युनिव्हर्सिटीचे
व्हाइस-चॅन्सेलर. इ० इ०

यांस

# हा ग्रंथ

शेक्स्पियर कवीवरील त्यांचें प्रेम आणि प्रस्तुतच्या
उद्योगाला त्यांजकडून मिळत असलेलें योग्य
प्रोत्साहन ह्या गोष्टी मुख्यत्वें
लक्षांत आणून,

## खंडेराव भिकाजी बेलसरे

मराठी ग्रंथकार,

यांनीं, त्यांची परवानगी घेऊन, बंधुप्रेमानें,
बहुमानपूर्वक

# अर्पण केला असे.

**शेक्सपियर–कृत नाट्यमालांतर्गत संविधानकावलीचे अंक कोणकोणास अर्पण करण्यांत आले त्यांचें टिपण:—**

**कथा १ ली तुफान** अर्थात **धी टेम्पेस्ट**—श्रीमती सौ० **माणिकबाई नानुजी कोठारे,** मुंबई, यांस

**कथा २ री प्रेमाचा कळस** अर्थात **रोमियो आणि ज्यूलियट**—श्रीमती सौ० **लक्ष्मीबाई चंदावरकर,** मुंबई. यांस

**कथा ३ री, व्हेनिस नगरचा व्यापारी.**—श्रीमंती सौ० **लक्ष्मीबाईसाहेब पंतसचीव** सं. भोर पुणें यांस.

**कथा ५ वी, ज्यूलियस सीझर**

आणखी कित्येक नामांकित स्त्रियांनीं समर्पण स्वीकारण्याचें आश्वासन दिलें आहे.

**कथा ६ वी, मधुयामिनी स्वप्नदर्शन.**

# ज्यूलियस सीझर

## या नाटकांतील पात्रांचीं नांवें

—:०:—

### पुरुष वर्ग

| | | |
|---|---|---|
| ज्यूलियस सीझर | | रोमन राज्याचा एक पुढारी, जो राजा होण्याची खटपट करित होता व जो पुढें लवकरच मारला गेला. |
| आक्टेव्हियस | .... | सीझरच्या वधा नंतर रोमन राज्याचें मुख्य चालक झाले ते. |
| ॲन्टनी | .... | |
| लेपिडॅस | .... | |
| सिसरो | .... | रोमन सेनेट सभेचे सदस्य. |
| पब्लियस | .... | |
| पॉपिलसलेना | .... | |
| मार्कसब्रूटस | .... | कटवाले. |
| केशियस | ... | |
| कॅस्का | ... | |
| ट्रेबोनियस | .... | |
| लिगॅरस | .... | |
| डेशियस ब्रूटस | .... | |
| मेटेलस सिंबर | .... | |
| सिन्ना | .... | |

| | | |
|---|---|---|
| फ्लॅव्हियस | .... | कोतवाल, कटवाल्यांच्या पक्षाचे |
| मॅरूलस | .... | |
| आर्टिमिडोरस | .... | नगरांतील तिराहित गृहस्थ |
| भविष्यवादी | .... | |
| सिन्ना | ... | एक कवि. |
| ल्यूशिलियस | .... | ब्रूटस याचे मित्र असून त्याच्या सैन्यांतले प्रमुख सेनानायक. |
| टिटिनियस | ... | |
| मेसाला | .... | |
| व्हॅरो | .... | ब्रूटस याचे दास |
| क्लिटस | .... | |
| क्लॉडियस | .... | |
| स्ट्रॅटो | .... | |
| ल्यूशियस | .... | |
| पिंडॅरस | .... | कॅशियस याचा दास. |

## स्त्रीवर्ग.

कॅल्पर्निया ज्यूलियस सीझर याची पत्नी

पोर्शिया. ब्रूटस याची पत्नी.

याशिवाय सभासद, नागरिक, व इतर नोकर वगैरे.

**स्थळ**—रोमनगर व पुढें सार्डिस गांवाशेजारचें मैदान व फिलिप्पी येथील मैदान.

# प्रस्तावना.



**प्रस्तुतचा** खंड वाचकांच्या हातीं देतांना एक महत्वाची सूचना करावयाची आहे. ती ही, कीं हा खंड वाचतांना त्यांनीं तो मननपूर्वक वाचण्याची तसदी घ्यावी; व आपल्या विचारशक्तीस जागृत ठेऊन, मनाचा समतोलपणा ठेवण्याविषयीं जपावें. ह्या नाटकांतील कितीएक विचार पात्रभेदास अनुसरून उद्धटपणाचे व निवळ दांडगाईचे असे आले आहेत. त्यांजपासून कधीं कोणाचें हित व्हावयाचें नाहीं अतएव ते अप्रयोजक व त्याज्य होत. हें या ठिकाणीं लक्षांत ठेवून त्यांजपासून घेण्यासारखा बोध मात्र घ्यावा. एक बाजू दाखवितांना तिच्या बरोबर दुसरी बाजूही पुढें येते, किंबहुना तसें केल्यावांचून चालत नाहीं. तेव्हां त्यांत बरें काय व वाईट काय हें विवेकानेंच ताडलें पाहिजे. हा विवेक वाचकांस कारितां यावा

ह्मणून बरीचशी माहिती उपोद्घातांत नाटकाचें पर्यालोचन करितांना दिली आहे, तिकडेही वाचकांनीं अवश्य लक्ष पुरवावें असें आमचें त्यांस येथें सांगणें आहे.

यानंतर दुसरी एक महत्वाची गोष्ट आमच्या आश्रयदात्यांच्या नजरेस आणणें आह्मांला जरूर वाटतें, ती पुस्तक-प्रकाशनाच्या कामांत येणाऱ्या अडचणी ही होय. लेखकानें पुस्तक लिहून प्रकाशकांच्या अंगावर फेंकून द्यावें अशी आजची स्थिती नाहीं. लेखक या नात्यानें हौसेनें अगोदर पुस्तक लिहायचें, नंतर याचक बनून त्याला आश्रय मिळावा व तें छापून निघावें ह्मणून श्रीमंत व छापखानेवाले यांच्या दारीं खेपा घालावयाच्या, मध्यंतरीं प्रुफकरेक्टर, किंबहुना कंपाझिटर यांच्याही भूमिका घ्यावयाच्या, शेवटीं प्रकाशकाच्या वेषांत ग्राहक प्रेक्षकांना मुजरा ठोकून पडद्याच्या आंत जावयाचें; तेथें गेल्यावर तरी विश्रांति मिळेल ह्मणून आशा धरावयाची, पण तसें तरी कोठें आहे?—गेल्यावरही ऋणकोचें सोंग घ्यावयाची तयारी लवकरच करावयाची असते हेंही येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. अशा परिस्थितींत आपल्या अडचणी प्रांजलपणें वाचकांसमोर ठेवणें आवश्यक वाटलें तर त्यांत नवल काय ? व म्हणूनच छापखानेवाल्यांशीं झालेल्या बाचाबाचीचा प्रकार मोठ्या नाईलाजास्तव आह्मांला वाचकांपुढें ठेवावा लागला. प्रस्तुत ग्रंथाच्या कळकळीमुळेंच

आश्रयदात्यांची कृपादृष्टि मिळावी ह्मणून आम्ही सदर गोष्ट केली. तिच्यासंबंधीं कांहीं लोकांचा गैरसमज झाला असल्यास तो दूर व्हावा ह्मणून पुन्हां त्याचा येथें उल्लेख करणें भाग पडतें.

कित्येकांचें ह्मणणें असें येईल कीं, आह्मांला सर्व काम ज्या अर्थी उधारीनें मिळालें त्या अर्थी धर्माच्या गांईचे दांत मोजून पहाण्याच्या भानगडींत आह्मीं पडूं नये. पुन्हां असें कीं छापखान्याचे मालक धंदेवाले मनुष्य होत; तेव्हां दोन पैसे अधिक मिळावे ह्मणून त्यांना थोडा विलंब केला, तरी तो क्षम्य आहे.

यासंबंधानें आह्माला सांगायचें तें इतकेंच कीं छापखानेवाले हे जसे धंदेवाले मनुष्य आहेत तसेच ग्रंथकार व त्यांचे साहायकर्ते मित्र हेही पुस्तकीज्ञान बाजूस ठेवून छापण्याच्या व प्रकाशनाच्या बाजारांत येऊन बसतात तेव्हां तेही कांहीं वेळ धंदेवाले बनतात हें विसरतां कामा नये. ग्रंथकारास त्याची दिव्य ज्ञानदृष्टी अंधुक करावी लागते. व त्याची विशाळ दृष्टि जी अत्युच्च हिमालयाच्या शिखरावर आरूढ झाली असते तिला खेचून घेऊन आंकुचित करावी लागते; त्याचप्रमाणें ज्या सहृदय हितचिंतकांचीं अंतःकरणें लोकोपकार बुद्धीनें उचंबळलेलीं असतात तीं जेव्हां व्यवहारांत नफ्यातोट्याच्या

नौकेंत बसून हेलकावे खाऊं लागतात तेव्हां त्यांसही तीं आपलीं मनें घट्ट करावी लागतात.

सारांश ग्रंथकार एकदा आपल्या खुर्चीवरून उतरले व आपल्या संसाराच्या चिमुकल्या जगांत प्रवेश करून ओटी-वरून चुलीपर्यंत व चुलीपासून ओटीपर्यंत प्रदक्षिणा घालूं लागले ह्मणजे,

बुभुक्षितै र्व्याकरणं न भुज्यते
पिपासितैः काव्यरसो न पीयते ॥

या वचनाचा लवकरच त्यांस अनुभव येऊं लागतो. तेव्हां त्यांस धंदेवाल्यांशीं धंद्याच्या दृष्टीनेंच वागण्याची कला साधते. यांत काय आश्चर्य ? याच दृष्टीनें पाहतां छापखानेवाल्याशीं झालेले व्यवहारांत धर्माधर्माचें दान असें कांहीं एक नव्हतें. छापखानेवाले उधारी पत्करितात. जरी उधारी असली तरी तींत ते आपला नफातोटा पाहिल्यावांचून पतकरीत नाहींत हें उघड आहे. तशांतून आमच्या व्यवहारांत तर पुस्तकें अमुक मुदतींत छापावीं असा स्पष्ट करार झाला होता; बांध-णावळ अमुक दिवसांत करावी असा जरी करार नसला तरी १५।२० दिवसांत होण्यासारख्या अशा क्षुल्लक कामासाठीं सुद्धां कररमदारांची येवढी जरूर आहे, असें वाटलें नाहीं. येवढेंच केवळ नाहीं तर १५ दिवसांच्या कामाला दहा महिने

लोटून व्याज अंगावर पडेल अशी कल्पना देखील झाली नाहीं; ही आमची चूक झाली. ती आम्ही पदरांत घेतों व छापखान्याचे मालक दोन पैशांकडे पाहून आह्माला, आमच्या वर्गणीदारांना व पुस्तकांना इतके दिवस तिष्ठत ठेवतील यासाठीं योग्य सावधगिरी आह्मी घेतली नाहीं यावरून, जेवढी व्यवहारदक्षता असावी तितकी आमच्या अंगीं नाहीं अशी त्यांनींही आमची खात्री पटविली. हा अनुभव दिल्याबद्दल आह्मी त्यांचे फार ऋणी आहों हेंही प्रांजलपणें आह्मी कबूल करितों. परंतु काम उधारीनें करण्यांत मालकांनीं आमच्यावर उपकार केले असें जर ते मानीत असतील तर त्या उपकारांची आमच्याकडून सव्याज भरपाई झाली यांत गैर असें काय झालें ?

आतां छापखानेवाल्यांची आगळीक झाली असली तरी आह्मींच आपलें मोठें मन करून त्याचा उल्लेख न करतां स्वस्थ रहावयाचें होतें. परंतु तें प्रसिद्ध करण्यांत आमच्याकडून क्षुद्रबुद्धि दर्शविण्यांत आली असें जर कोणी ह्मणतील तर त्यांस आह्मी येवढेंच सागतों कीं सदर हकीकत प्रसिद्ध करण्यांत कांहीं वावगेपणा असेल तर तो दोष आमच्या क्षुद्रबुद्धीचा नसून ग्रंथ लवकर बाहेर पडावा याकरितां आह्माला जी कळकळ वाटते त्या कळकळीकडे आहे, हें लक्षांत आणलें पाहिजे. मनापासून ज्या कामासाठीं आह्मीं

ह्मटत आहों त्यांत क्षुल्लक गोष्टीकरतां देखील दिरंगाई लागल्यामुळें जो खेद होतो त्यामुळेंच ते उद्गार आमच्या लेखणींतून बाहेर पडले. त्यांत जर मनाचा कोतेपणा आहे असें कोणाला वाटत असेल तर त्यांनींच थोर मन करून आमच्या या अंगीकृत कार्यास हातभार लावण्याचा धडा घालून द्यावा ह्मणजे झालें; असें जोंपर्यंत होत नाहीं तोंपर्यंत आह्मी स्वीकारलेला मार्गच योग्य आहे असें आम्हांस वाटतें.

# उपोद्घात.



महाकवि शेक्स्पियर याच्या प्रसिद्ध 'ज्यूलियस सीझर' नामे नाटकाचें भाषांतर प्रस्तुत खंडांत दिलें आहे. हें शृंगारिक नाहीं; किंबहुना कामदेवाच्या लीलेचा संसर्गही यांत कोठें नाहीं. मुख्यत्वेंकरून सीझर याचा वध व त्याचे दुष्परिणाम यांचेंच वर्णन कवीनें यांत दिलें आहे. यामुळें हें नाटक म्हणजे लांबचलांब अशी दुःखाची एक कहाणी आहे असें म्हणावयास चिंता नाहीं. या कवीचीं जीं शोकपर्यवसायी नाटकें आहेत त्यांत हें बऱ्याच वरिष्ट दर्जाचें आहे. यांत शृंगाररसाला जरी थारा दिलेला नाहीं तरी हें नाटक रूक्ष व नीरस वाटत नाहीं; कारण वेगवेगळ्या मनोवृत्तींच्या पात्रांचीं हुबेहूब चित्रें रेखाटण्यांत कवीनें जें चातुर्य दर्शविलें आहे तें केवळ अपूर्व होय. त्याचा लाभ वाचकांस

या नाटकद्वारा होणार आहे तर तो करून घेण्याविषयीं आम्ही वाचकांस शिफारस करितों.

प्रस्तुत नाटक वाचण्यास सुरू करितांना आधीं त्याच्या सामान्य स्वरूपाचा उल्लेख करणें जरूर आहे. ज्यूलियस सीझर हें नाटक रोम नगरच्या राजकीय स्थितीचें व तेथील लोकसमाजाचें स्वरूप कसें होतें हें दर्शविणारें एक उत्कृष्ट चित्र आहे. याशिवाय सीझर याचा वध घडून आला त्यावेळीं व त्यानंतर रोमन लोकांच्या मनाची स्थिति काय झाली होती हेंही त्यावरून दिसून येतें त्याचा अनुभव घडावा म्हणून आपण इ. स. पूर्वी ४० वर्षांवर रोम नगरांत संचार करित आहों असें कल्पिलें पाहिजे व त्या वेळच्या रोम नगरच्या लोकसमाजाशीं आपण आपलें तादात्म्य केलें पाहिजे, तें केलें म्हणजे आपणांस असें दिसून येईल कीं, सीझरच्या वेळीं रोम नगरच्या लोकसमाजाचे महाजनसमाज व सामान्य लोकसमाज असे दोन ठोकळ ठळक विभाग होते. यांतील पहिला वर्ग बहुधा सत्ताधारी असून, तो सामान्य लोकसमाजास खुष ठेवून आपलें वर्चस्व सदैव कायम ठेवण्याचे प्रयत्न करीत असे. महाजनसमाज हा अनेक सरदार घराणीं मिळून बनलेला होता. त्यांतील कोणत्याही एकाच घराण्यानें किंवा व्यक्तीनें श्रेष्ठपणा, किंवा निर्बाधित सत्ता मिळवून बसावें ही गोष्ट इतरांस इष्ट नव्हती. अर्थात्

सीझरची दिवसेंदिवस वाढत चाललेली सत्ता केशियस वगैरे महाजनांच्या डोळ्यांत फार सलूं लागली. यांत नवल नाहीं.

परंतु महाजनांच्या थोरपणावरील हें दडपण कांहीं सोपें नव्हतें. सामान्य जनसमूहास जर हें कृत्य आवडलें तर ठीकच. नाहीं तर पुढें घोर प्रसंग ओढवेल असा त्यांस मोटा धाक असे. याचा त्यांना पूर्वीं अनेकदा अनुभव येऊन चुकला होता. परंतु सीझर याच्या प्रतापाचा असा दरारा होता कीं तो जिवंत असतां त्याच्या विरुद्धलोकमत चिडविणें ह्मणजे आपण होऊन आपला नाश करण्यासारखें होतें. व ह्मणूनच सीझरच्या मृत्यूनंतर वध करण्यास उद्युक्त झालेल्या लोकांस घाईघाईनें लोकमत आपल्या तर्फेस वळविण्याचा प्रयत्न करावा लागला.

या वेळीं रोमन सामान्यजन–समाजाची बरीच अवनति झाली होती. स्वतः विचार करण्याचें सोडून कोणी सांगेल व चिथवील तसें वागण्याकडे त्यांचा कल झाला होता. त्यामुळें त्यांचें निश्चित असें वर्तन रहाणें कठिण होतें. या सामान्य लोकांच्या धरसोडेपणाचा परिणाम महाजन कटवाल्यांना चांगलाच भोंवला. आणि प्रचलित राज्यव्यवस्थेवर अविचारानें उठलें असतां किती घोर प्रसंग ओढवतात याचा त्यांना

पूर्ण अनुभव आला. वस्तुतः पाहतां सीझर जुलमी होता असें दिसत नाहीं. रोमनगरच्या अवनत दशेंत त्या नगराचें रक्षण व्हावें या करितांच राज्यकर्ता पुरुष सत्तावान् व दृढनिश्चयी असला पाहिजे हें त्यानें ताडिलें होतें. आरंभीं तो राजा नसला तरी राजसत्ता त्याच्या हातीं होती. हें कांहीं खोटें नव्हतें. महाजन मंडळावर त्याचे अनेक उपकार होते. त्याची सत्ता उलथून टाकण्याकरितां त्याचा खून करणें हें कृत्य राजद्रोहाचें होतें. या राजद्रोहाचें प्रायश्चित्त त्या लोकांना योग्य असेंच मिळालें. सीझरच्या मृत्यूनंतर जिकडे तिकडे बहुतेक अराजकताच पसरली व सरतेशेवटीं आगस्टस बादशहानें बादशाहीची स्थापनां केली.व रोमन लोकांची लोकसत्ता व नागरीकत्वाचे हक्क हीं विलयास नेलीं. प्रचलित राज्यव्यवस्थेविरुद्ध अविचारानें उठल्यास सर्वतोपरी कशी हानी होते हें यावरून शिकण्यासारखें आहे तरी आमच्या वाचकांनीं हें पुस्तक वाचतांना रोमन लोकांशीं सहृदयतेच्या योगानें आपलें तादात्म्य करून घ्यावें व त्या दृष्टीनें पुस्तक वाचून त्यांतील खुबीदार विषयोपन्यासाच्या योगानें होणाऱ्या आल्हादाचा अनुभव घ्यावा अशी आमची त्यांना विनंती आहे.

याप्रमाणें ह्या नाटकाच्या सामान्य स्वरूपाचें धोरण सांगितल्यावर,आतां या नाटकासंबंधाची जी अवांतर माहिती सांगण्या-

सारखी आहे ती सांगितली असतां विशेष सोईचें होईल. ह्या माहितीचा नेहमींप्रमाणें क्रम ह्मटला ह्मणजे असा आहे (१) नाटकरचनेचा कालनिर्णय (२) आधार व (३) लोकप्रियता ही माहिती त्याच क्रमानें पुढें सादर करितों.

प्रथमतः कालनिर्णयः–कोणताही ग्रंथ कवीनें केव्हां रचला असावा हें बहुधा तीन प्रकारच्या प्रमाणांवरून ठरवितां येतें. पहिलें बाह्य प्रमाण ह्मणजे तत्संबधानें इतर ग्रंथांतील उल्लेख. दुसरें अंतर्गत प्रमाण. हें दोन प्रकारचें असतें. एक ग्रंथांतील वाक्यांवरून दिसणारी तत्कालिन स्थिती व दुसरा ग्रंथ रचनेवरून ग्रंथकाराच्या लेखन–शक्तीचा विकास कितपत झाला याचें होणारें अनुमान. सदरहू नाटकास हीं दोन्ही प्रकारचीं प्रमाणें लावून पहातां हें नाटक इ० स. १६०० व १६०१ च्या दरम्यान लिहिलें असावेंसें वाटतें. बाह्य प्रमाणें:—(१) १६०३ मध्यें ड्रेटन (Drayton) नामक ग्रंथकारानें लिहिलेल्या 'बॅरन्स् वॉर *Baron's Wars* या ग्रंथांतील कांहीं भाग अंक ५ प्रवेश ५ यांतील अँटनीच्या भाषणाशीं जुळतो. त्यावरून हें नाटक १६०३ सालापूर्वीं लिहिलें असावें असें अनुमान काढण्यास बळकट जागा आहे. परंतु तत्कालिन ग्रंथकार एकमेकांच्या ग्रंथांतील भाग चोरीत असल्याचें आढळतें; यामुळें हें प्रमाण पुरेसें समाधानकारक नाहीं. तथापि याहूनही निश्चयात्मक असें दुसरें

एक प्रमाण आहे. ( २ ) वीव्हर ( Weever ) कृत मिरर्स ऑफ मॉर्टिस ( *Mirror of Mrtyras* ) हें पुस्तक १६०१ सालीं प्रसिद्ध झालें. त्यांत पुढील वाक्यें आहेत. " ब्रूटसच्या भाषणानें भिन्न भिन्न विचारांच्या लोकांची मनें वेधून ' सीझरमहत्वाकांक्षी होता ' असें प्रथम भासविलें परंतु वक्तृत्वनिपुण मार्क अंटनीनें त्याचे सद्गुण रेखाटतांच ब्रूटससारखा अधम ब्रूटसच अशी त्यांची ठाम समजूत झाली. " शेक्सपियरच्या जूलिअस सीझर नाटकांतील ब्रूटस व अंटनी ह्यांच्या भाषणांवरून हे विचार सुचले नाहींत असें कोण ह्मणेल ?

अंतर्गत प्रमाणांपैकीं पहिल्या प्रकारचीं प्रमाणें कोठेंही स्पष्टपणें दिसत नाहींत. तत्कालीन घडलेल्या कोणत्याही गोष्टीचा स्पष्ट उल्लेख या नाटकांत नाहीं. परंतु एके ठिकाणीं eternal devil असे शब्द आहेत. संदर्भावरून पहातां तेथें infernal devil असें पाहिजे. मग हा फरक पहिल्या जेम्स राजाच्या कार्कीर्दीत सन १६०० च्या सुमारास झालेल्या कायद्यामुळेंच केलेला असावा असें अनुमान निघतें. infernal (नर्कांतील) असे शब्द वापरणें धर्मविरोधी असल्यामुळें त्यांचा उपयोग करूं नये, असें जेम्स राजाच्या त्या कायद्यानें ठरविलें होतें हें इंग्रजी इतिहास न जाणणारांस सांगणें अवश्य आहे.

या नाटकांतील भाषासरणीवरूनही असेंच अनुमान निघतें. यांतील भाषासरणी 'मच अॅडो,' 'अॅज यूलाइक इट्,' 'ट्वेल्थ नाइट' या नाटकांतल्याप्रमाणें दिसते; व हीं नाटकें तर १५९८ आणि १६०२ च्या दरम्यान कवीनें लिहिलीं होतीं हें निश्चित झालें आहे.

दुसऱ्याही अनेक गोष्टींवरून हेंच अनुमान दृढ होतें. सन १५९९ सालीं पंचम हेनरी नाटक पुरें होतांच इंग्लिश इतिहासांतील कथानकविषयक नाट्यमाला तात्पुरती कवीनें येथें पुरी केली. आठवा हेन्री हें त्या मालेपैकींच आहे खरें; पण तें त्यानें पुढें बऱ्याच वर्षांनीं लिहिलें, व ती नाट्यमाला पुरी करण्यापूर्वींच शेक्स्पियर कवीनें रोमन इतिहासास हात घातला असेल हें फारसें संभवनीय नाहीं.

अशा रीतीनें तिन्ही प्रकारच्या प्रमाणांवरून पहातां हें नाटक १६००--१६०१ च्या दरम्यान आपल्या कवीनें लिहिलें असावें असें अनुमान काढण्यास कांहीं हरकत नाहीं.

**आधार**—शेक्सपियरकृत जूलियस सीझर या नाटकास आधार ह्मटला ह्मणजे प्लूटार्ककृत रोमन व ग्रीक चरितांचें सर थामस नॉर्थकृत भाषांतर होय; याविषयीं मुळींच वाद नाहीं. प्लूटार्क हा चरित्रलेखक असून त्यानें ग्रीक व रोमन थोर पुरुषांचीं समान गुण दाखविणारीं चरित्रें लिहिलीं आहेत. निःपक्षपातानें चरित्रावलोकन करून, त्यास मनोरंजकत्व दे-

ण्याची शैली प्लूटार्कला फारच छान साधली होती, इतकेंच नव्हे तर तत्कालीन परिस्थिति व लोकाचार यांचें त्यानें फार बारकाईनें पर्यालोचन केलेलें दिसतें. नॉर्थनें केलेलें भाषांतर मूळ ग्रीक पुस्तकावरून केलें नसून, एमियट् नामक एका फ्रेंच लेखकाच्या पुस्तकावरून केलें होतें. मूळ पुस्तकाची रचना इतकी उत्कृष्ट आहे कीं शेक्सपियरनें कित्येक प्रवेशाच्या प्रवेश जसेच्या तसे उतरून घेतले आहेत; इतकेंच नव्हे तर कांहीं टिकाणीं भाषांतरकाराची भाषाही त्यानें तशीच ठेविली आहे.

प्लूटार्कच्या चरित्रांपैकीं ज्यूलियस सीझर, ब्रूटस व ॲन्टनी या तिघांच्या चरित्रांचा या नाटकांत उपयोग केला आहे. प्लूटार्कच्या उपरिनिर्दिष्ट ग्रंथांच्या आधारें शेक्सपियरनें एकंदर तीन नाटकांची रचना केली; तीं नाटकें ज्यूलियस सीझर, ॲन्टनी व क्लिओपाट्रा आणि कॅरिओलॅनस् हीं होत. या नाटकांत सकृद्दर्शनीं कांहीं गोष्टी केवळ शेक्सपिअरच्याच लेखणींतून उतरल्या अशा भासतात. परंतु त्या वस्तुतः प्लूटार्कच्या ग्रंथांतून घेतल्या आहेत. उदाहरणार्थ अं. १ प्र.२ यांतील सीझरला वाटणारी सडपातळ माणसांची भीति !

'व्हेनिसचा व्यापारी' वगैरे नाटकांची रचना करतांना शेक्सपियरनें मुळांतील कथाभागांत वाटेल तसा फेरफार केला आहे. खुद्द इंग्लिश इतिहासावरून केलेल्या नाटकांतील

रंग वठविण्याकरितां त्यानें कल्पनेच्या जोरावर हे फेरफार केले हें खरें; परंतु प्लुटार्कनें लिहिलेलीं चरित्रें मुळांतच इतकीं सुंदर आहेत कीं त्यांत कोणताही फरक न करितां त्यानें मूळ चरित्र कथेला नाटकाचें स्वरूप देण्यांतच आपली करामत दाखविली आहे.

केवळ ठळक व कथानकास आवश्यक गोष्टीच प्लुटार्क-मधून घेतल्या आहेत असें नाहीं, तर किरकोळ गोष्टीही प्लु-टार्कमधून घेऊन नाटकाचा परिपोष केला आहे. सीझरच्या मृत्यूपूर्वींचे दैवी आपात, भविष्यवाद्यांच्या सूचना, बळी दिलेल्या जनावरांना काळिजें नसणें, कॅल्पर्नियेचें स्वप्न, वांझ बायकाविषयींची भोळसट समजूत, ब्रूटस व पोर्शियेचें भाषण, अग्निकाष्ठें भक्षून आत्महत्या करणें, डेशियसनें सीझरला कॅपिटल सभागृहाकडे नेण्यासाठीं घातलेली भुरळ, सिन्ना कवीचा वध, सीझरला मारिलें त्याच तरवारीनें केशियसनें आत्महत्या करणें वगैरे एकूणएक गोष्टी प्लुटार्कमधून घेतल्या आहेत. विषयाच्या अनुरोधास अनिष्ट तेवढ्या गोष्टींखेरीज प्लूटार्कच्या लेखांतील सर्व कांहीं जसेंच्या तसें उतरलें आहे. परंतु योग्य निवड करून सर्व भाग एकत्र गुंफण्यांत शेक्स-पियरचें चातुर्य दिसून येतें.

सुतार चांभार वगैरे हलक्या प्रतीचीं पात्रें दाखविलीं आहेत त्यांविषयीं कित्येकांचें ह्मणणें आहे कीं, हे रोमन

कारागिर दिसत नसून, इंग्लिश कारागिरांना हा रोमन पेहराव चढविलेला दिसतो. परंतु त्याविषयीं विचार करितांना आपण एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं हलक्या दर्जाचे लोक सर्व युगांत व सर्व देशांत सारखेच असतात. त्यांतूनही रोम व इंग्लंड या एकसारख्या राजकीय स्थितींतल्या लोकांत तर हें साम्य कवीला विशेष दिसून आलें. परंतु हें साम्य शेक्सपीयरला गौणता आणणारें नसून उलट भूषणावहच आहे असें आम्हास वाटतें.

एकंदरींत या नाटकाची रचना करण्यांत शेक्सपीयरनें आपलें रचनाचातुर्य उत्तम प्रकारें दाखवून प्राचीन रोमन साम्राज्याच्या परिस्थितीचें हुबेहुब चित्र आमच्या डोळ्यांसमोर मोठ्या मनोरंजक रीतीनें ठेविलें आहे.

**लोकप्रियता**:-या नाटकांतील मुख्य विषय, व विशेषतः त्यांतील कांहीं अंक फारच बहारीचे वठले असल्यामुळें, तें लोकांपुढें येतांच, तत्काळ लोकप्रिय झालें यांत फारसें नवल नाहीं. वादळाच्या सपाट्यांत सांपडलेल्या कॅस्का व सिशीअस यांच्यामधील संवाद केवळ वाचतांना तो कल्पनेलाच जिज्ञासाप्रचुर करतो असें नाहीं तर त्याहूनही रंगभूमीवर पहाण्यांत प्रेक्षकास फार तल्लीन करून सोडतो. ॲन्टनीचें वक्तृत्व ऐकतांना नाटकांतील रोमन नागरिकांबरोबर प्रेक्षकांच्या चित्तवृत्तिही हेलकावे खातात. ब्रूटस व कॉशीयस यांचें भांडण जसेंच्या तसें

वठविण्यास कसलेलेच नट पाहिजेत; व शेवटचे शेवटचे प्रसंग साधण्यांत तर नटाचें खरें कसब कसास लागतें.

हा खेळ पहिल्यानें रंगभूमीवर आला तेव्हांच त्याची ख्याति होऊन, लोकांच्या झुंडीच्या झुंडी नाटकगृहाकडे लोटूं लागल्या. त्यावेळीं बेन जान्सननें 'कॅटिलाइन' व 'सेंटजान' हीं मोठ्या परिश्रमानें रचिलेलीं नाटकें रंगभूमीवर आणिलीं. परंतु शेक्स्पियर कवीच्या ह्या नाटकापुढें तीं फिकीं पडून, त्या कंटाळवाण्या नाटकांविषयीं लोक केवळ उदासीन दिसूं लागले. इतर कांहीं नाटककारांनीं १६०२ सालीं स्पर्धेनें 'सीझर याचा वध' हें एक नाटक पुढें आणलें. १६०४ सालीं लॉर्ड स्टर्लिंग यानें ज्यूलिअस सीझर याच नांवानेंच एक नाटक प्रसिद्ध केलें व १६०७ या वर्षी 'सीझर आणि पाम्पी' हेंही नाटक आणखी एकानें पुढें आणिलें. हीं सारीं नाटकें ज्या अर्थी शेक्स्पियर कवीच्या ' ज्यूलियस सीझर ' नाटकानें अस्तित्वांत आणलीं त्या अर्थी सदर नाटक लोकांस कितपत आवडलें याचें बरेंच अनुमान आपणांस करितां येतें.

क्रॉमवेलच्या मृत्यूनंतर इंग्लंड देशांत जेव्हां पुन्हा राजाची स्थापना झाली तेव्हां तर हें नाटक फारच लोकप्रिय झालें. अलिकडे अलिकडे जर्मनींत ह्या नाटकाचे प्रयोग वारंवार होत असतात व नटांची कुशलता जरी सरासरीचीच असते

तरी टाळ्यांचा कडकडाट सारखा चालू असतो ह्मणून सांगतात, यावरून जर्मन लोकांसही तें प्रिय झालें आहे हें उघड आहे.

वर नाटकाच्या रचनाकालाचा निर्णय, पुढें त्याला आधारभूत ग्रंथाचा निर्देश व तत्संबंधाची माहिती, आणि शेवटीं नाटकाची लोकप्रियता वगैरे माहिती सांगून झाल्यावर, आतां प्रस्तुत नाटकाचें नांव ज्यूलियस सीझर असें आहे, तें कितपत यथार्थ आहे हें पाहूं. केवळ नाटकाच्या नांवावरून पाहतां, या नाटकाचा नायक सीझर हाच असावा असें सकृद्दर्शनीं वाटतें. परंतु तिसऱ्याच अंकांत सीझरचा खून होतो, आणि पुढील सबंद दोन अंक सीझरवांचून रंगभूमीवर आलेले प्रेक्षकाच्या नजरेस पडतात. आतां वस्तुतः पाहतां नायक संपलें कीं नाटक संपलें अशी तऱ्हा असावी. परंतु नाटक तर पुढें दोन अंक चालतें. सीझर जर नाटकाचा नायक आहे तर शेवटच्या दोन अंकांत नायकाशिवाय नाटक चाललें आहे असें ह्मणावें लागतें. तेव्हां नायकाशिवाय नाटक चालू ठेविल्याचा दोष शेक्स्पियरकडून होईल हें संभवत नाहीं. अर्थात् नाटकाचा नायक दुसरा कोणी तरी असला पाहिजे. या नाटकाचा नायक होण्याला जर दुसरें एकादें पात्र लायक असेल तर तें ब्रूटस हें होय. मग ब्रूटस हा जर नाटकाचा नायक झाला तर त्याची पत्नी पोर्शिया ही नायिका होय. आतां प्रस्तुत नाटकांत पो-

[redacted]

शियेकडे जें काम आहे तें फार थोडें आहे हें खरें. तरी ती ब्रूटस ह्याची अर्धांगी आहे त्याचप्रमाणें तिच्या अंगीं जे असामान्य गुण दाखविले आहेत त्यावरून पाहतां कवींची योजना अशीच दिसते कीं पोर्शिया हीच खरोखर नायिका आहे. मग नायक व नायिका या दोघांसही बाजूस ठेवून कोणत्या तरी तिसऱ्या एका पात्राचें नांव नाटकाला देणें योग्य आहे काय? असा प्रश्न उद्भवतो. याचें उत्तर असें आहे की नायक–नायिका–व्यतिरिक्त अन्य पात्रावरून नाटकास नांव देण्याची शेक्स्पियर कवीची रीतच आहे. उदाहरणार्थ, ‘ व्हेनिस नगरचा व्यापारी ’ या नांटकांतील तऱ्हा पहा. नायक बॅसॅनियो व नायिका पोर्शिया असून, नाटकास नांव दिलें आहे तें ॲंटोनियो या तिसऱ्याच एका प्रमुख पात्राच्या नांवावरून. एकंदरींत नाटकाला ज्याचें नांव द्यावयाचें तो त्या नाटकाचा नायक असलाच पाहिजे असा नियम शेक्स्पियर कवीच्या नाटकांत तरी नाहीं; व ज्यूलियस सीझर या नाटकाचा शेवटल्या दोन अंकांत तर ब्रूटस पोर्शिया यांच्याच कृत्यांचा मुख्यत्वेंकरून उल्लेख येतो व हींच दोन पात्रें मुख्य आहेत असें वाटूं लागतें. आणि ब्रूटस ह्यांचें स्वभावचित्र, त्याच्या धीरोदात्त चरित्राची घटना व शेवटीं त्याच्याकडे आलेला पुढाकार या गोष्टी पाहतां ब्रूटस हाच ह्या नाटकाचा नायक आहे ह्यांत बिलकूल संदेह रहात नाहीं.

आतां नायक व नायिका ह्यांचा विचार चालला असतां, असा प्रश्न उद्भवतो कीं प्रस्तुत नाटकांत शेक्स्पियर कवीचा उद्देश तरी असावा काय? हा प्रश्न विशेष महत्वाचा असल्यामुळें त्याचा खुलासा येथें करणें जरूर आहे. ब्रूटस हा नाटकाचा नायक आहे व तो धीरोदात्त ही आहे, पण तो कटवाल्यांचा पुढारी आहे इतकेंच केवळ नव्हे तर सीझरसारख्या राजसत्ताधारी पुरुषाचा खून करणारा आहे असें आपण पाहतों. सीझरचा खून ज्यांनीं ज्यांनी केला त्यांच्या त्या कृत्यांविषयीं जो थोडा बहूत आदर उत्पन्न होतो तो केवळ ब्रटस याच्या संबंधामुळेंच. असें नाटक पुढें आणून त्याच्या नायकाला इतका सद्गुणसंपूर्ण करण्यांत शेक्सपीयरचा हेतु तरी काय? त्याच्या मनांतून कट करण्याविषयीं लोकांस भर द्यावयाची होती काय? जर कोणाचा असा समज होईल तर तो अगदीं चुकीचा आहे हें येथें अगदीं स्पष्टपणें सांगितलें पाहिजे. ह्याचें प्रत्यंतर एका प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टविरूनच मिळण्यासारखें आहे. दुसरा चार्लस राजाच्या कारकीर्दींत हें नाटक अनेकवेळां रंगभूमीवर आलें, व लोक तें मोठ्या आवडीनें पाहूं लागले. परंतु या नाटकाच्या दर्शनानें लोकांच्या मनांत राजद्रोहाची किंवा अयोग्य कट करण्याची कल्पनाही शिरली नाहीं; इतकेंच केवळ नव्हे तर उलटपक्षीं कटवाल्यांविषयीं तिटकारा उत्पन्न

होऊन त्यांचीं मनें विशेष राजनिष्ठ झालीं असेंच दिसून आलें! ह्या अनुभवावरून पाहतां, प्रस्तुत नाटकाचा परिणाम प्रस्थापित राजसत्तेस अनुकूल असा झाला असें ह्मणण्यास चिंता नाहीं. कट करून राजसत्ता उलटून पाडल्यानें कसे घोर प्रसंग राष्ट्रावर ओढावतात, याचें चित्र प्रस्तुत नाटकांत जसें उत्कृष्ट वठविलें आहे तसें कदाचित् सगळ्या इंग्रजी वाङ्मयांत देखील मिळावयाचें नाही. ब्रूटससारखा धीरोदात्त व मनस्वी पुरुष पुढारी असतांही, शेवटीं कटामुळें राष्ट्राचें अपरिहार्य नुकसान झालें असें जेथें दाखविलें आहे तें नाटक राजद्रोहाचा साक्षात् निषेधच करितें; किंबहुना, सामन्येंकरून राजकर्त्या महाजनांच्या मानखंडनेचा देखील निषेध करितें असें ह्मणण्यास चिंता नाहीं. अर्थात् हें नाटक कटांना उत्तेजन देणारें नसून, सुव्यवस्थित राजसत्तेला पुष्टी देणारें व कटांचा निषेध करणारें आहे हें आपण नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे. आह्मी तर असें देखील ह्मणतों कीं जे कोणी हें नाटक सूक्ष्मपणें वाचतील व त्याचें शांतपणें मनन करतील त्यांच्या मनावर याचा फारच हितावह परिणाम होतो; व तो होईल असा आह्मांस भरंवसा आहे.

## पर्यालोचन.

येथवर जी जी अवांतर माहिती आह्मी सांगितली तीवरून प्रस्तुत नाटक कोणत्या प्रतीचें आहे याची बरीच अट-

कळ वाचकांस झाली असेल. या पुढें प्रत्यक्ष नाटकाचें पर्यालोचन करून एकेका प्रवेशांत लक्षदेण्यासारखें असें काय काय आहे तें सांगण्याचा प्रयत्न करूं. नाटकाच्या सुरुवातीलाच रोम नगरांतील हलक्याप्रतीच्या लोकांचा जमाव आणिला आहे. रोमनगर त्याकाळीं अत्यंत समृद्धी होतें व तेथील लोक समृद्धावस्थेंत प्राप्त होणाऱ्या नानाप्रकारच्या चैनींला व सुखांला लोभावलेले होते. ज्या दिवशीं वर सांगितलेला लोकांचा जमाव रस्त्यांतून चालला होता त्यादिवशीं सणाच्या निमित्तानें व स्वतःच्या राज्याभिषेकाच्या निमित्तानें सीझर ह्याच्या पक्षाची मंडळी मोठा उत्सव करून लोकांस तमाशा दाखविणार होती. या तमाशाला लोकांचे थवेच्याथवे रस्त्यानें चालले होते त्यांपैकीं एकाचें वर्णन येथें कवीनें दिलेलें आहे. तें फार खुबीदार आहे त्यांत सुतार घ्या किंवा जोडे शिवणारा मोची घ्या. तो मोठा छानछोक, हौसी थट्टेखोर व रसिक, आहे असें दाखविलें आहे. आणि समृद्ध नगरांतले हलके लोक असेच असतात. अशा उल्लासित वृत्तीच्या लोकांस दाबांत ठेवण्याच्या निमित्तानें शेवटीं दोन कोतवाल येतात व ते प्रस्तुत नाटकाचा विषय जो ज्युलियस-सीझर त्याची महत्वाकाक्षां वाढत चालल्याबद्दल संशयता प्रदर्शित करितात.

**प्रवेश २ रा**—या प्रवेशांत नाटकांतील बहुतेक मुख्य पात्रें कवीनें आणलीं आहेत, आणि थोडक्यांत त्याच्या

स्वभावाचें वळण कोणत्या मार्गानें गेलें आहे तेंही दाखविलें आहे. सीझर हा आपल्या प्रतापामुळें एवढा चढून गेगेला दिसतो कीं आपण जे जे हुकूम करूं ते ते सर्व लोक मानतीलच असें त्याला वाटूं लागलें होतें व त्याच्या भरांत आपल्या शत्रूंसही तो मित्र ह्मणून लेखूं लागला होता. हा जो दुमर्द त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाला तोच त्याच्या नाशाला कारण झाला त्याचें चिन्ह प्रथमच आपणांस येथें दिसूं लागतें. आतां अशा मनुष्याचा त्याच्या बरोबरीचे लोक हेवा करतील त्यांत काय नवल आहे? केशियस अशा प्रकारचा मनुष्य होता. त्याच्यानें सीझर याचें वैभव पाहवेना, आणि तो आपल्या हृदयांतले मत्सरी विचार कशा युक्तीनें ब्रूटस ह्याच्या कानांत ओततो हें येथें फार फार पाहण्यासारखें आहे. वस्तुतः पाहतां, प्रस्तुत नाटक ह्मणजे केशियस ह्याच्या मत्सराचाच खेळ होय असें ह्मणण्यास चिंता नाहीं.

मूळ नाटकांत पृष्ठ ११ यावर टिपेंत अर्थसादृश्य दर्शक आर्येचा एक चरण दिला आहे ती सबंद आर्या येणेंप्रमाणें आहेः—

गुणिनामपि निजरूप--प्रतिपत्तिः परत एव संभवति।
स्वमहिमदर्शनमक्ष्णोर्मुकुरतले जायते यस्मात् ॥

**प्रवेश ३ रा**—हा प्रवेश फारच मजेचा आहे. यांत संसारांतील तीन प्रकारच्या तीन मनुष्यांची शिक्षणस्थिति-परत्वें तीन चित्रें आपणांपुढें कवीनें उभीं केलीं आहेत. सीझर यानें राज्यपद स्वीकारलें त्याकाळीं सृष्टिधर्माप्रमाणें कांहीं विशेष प्रकार घडून आले त्यांस कितीएक रोमन लोक आपापल्या समजुतीप्रमाणें दुश्चिन्हें समजूं लागले व सीझर याच्या राज्यारोहणाला हे केवळ अपशकुन होत असेंही ते ह्मणूं लागले. सीझर यानें राज्यपद स्वीकारण्याचें मनांत आणिलें त्या वेळेपासूनच ह्या दुश्चिन्हास आरंभ झाला होता. आणि त्यानें राजमुकुट शिरावर धारण केला त्यावेळीं तर पराकाष्ठेचा पाऊस पडला, आकाश ढगांनीं व्यापून गेलें व दशदिशा विजांनीं वारंवार प्रकाशित होऊन प्रचंड गडगडाटानें दुमदुमून गेल्या. ह्या ज्या गोष्टी केवळ सृष्टिक्रमानें झाल्या त्यावर वेगवेगळ्या दर्जाच्या मनुष्यांनीं आपापली कल्पना कशी कशी चालविली हें येथें आपण पहातों. मागील प्रवेशांत वर्णिलेल्याप्रमाणें सीझर यानें राजपद स्वीकारल्याच्या गोष्टींनीं कास्का या पात्राचें डोकें भरून किंबहुना इतकें भणाणून गेलें होतें कीं, त्याला सीझर याच्या राज्यारोहणामुळेंच वरील गोष्टी घडून आल्या ह्मणून तीं दुश्चिन्हें व अपशकूनच होत अशी त्याची समजुत झाली. हें पात्र सामान्य प्रतीचें आहे, यास्तव सामान्य मनुष्याच्या दुश्चिन्हांसंबंधानें कशा समजुती असतात हें तो दर्शवितो. कारण

पावसाच्या धारा पडत असतांना व त्या विजांच्या चकचकाटानें अग्निसारख्या दिसूं लागल्या असतांना, तो ह्मणतोः—" वैश्वानराचा वर्षाव करणारें तुफान या घटकेपर्यंत मी पाहिलें नव्हतें." याविषयीं प्रख्यात वक्ता व तत्वज्ञ सिसरो ह्यास ह्या गोष्टीविषयीं कांहींच वाटत नाहीं. आणि "यांत काय आहे" हें एवढेंच तो ह्मणतो. याच दुश्चिन्हाविषयीं कॅशियस याचें काय ह्मणणें आहे तें ऐकण्यासारखें आहे. त्यास तर सीझर केवळ "विजा चमकविणारा, मेघगर्जना करणारा, मेलेल्या माणसांना पिशाचरूपानें पृथ्वीवर संचार करावयाला लावणारा, कॅपिटोलमधील सिंहाप्रमाणें गर्जना करणारा, आणि या भयप्रद रात्रीशीं ज्याचें साम्य आहे असा एक मनुष्य दिसतो."

**अंक २ रा**—पहिले अंकांत सीझर याच्या विरुद्ध झालेल्या कटाची प्रेरणा कशी झाली हें कवीनें दाखविलें आतां, प्रस्तुत अंकांत तीच प्रेरणा फलवती होऊन, कट अस्तित्वांत कसा आला हें दाखविलें आहे. यांत ब्रूटसखेरीजकरून बहुतेक सर्व मंडळी केवळ मत्सरानें व स्वार्थबुद्धीनें प्रेरित होऊन कटांत शिरली होती असें दाखविलें असल्यावरून असले कट किती ओंगळ असतात हें दिसून येतें. ब्रूटस मात्र निस्वार्थ बुद्धीनें-सीझर याच्या वधास अनुकूल झाला होता असें कवीनीं दाखविलें असल्यामुळें त्याची स्वदेशाभिमानबुद्धि बरीच निर्मय होती

असें दिसतें, व यामुळेंच त्याचा धिरोदात्तपणा विशेष विशद होतो. तथापि तो बिचारा काय करील? तो तर बाकींच्या मंडळींच्या मोहाला गुतून भरीं भरला होता, असेंच ह्मणावें लागतें.

पुढील प्रवेशांत, कॅपिटोल सभेमध्यें सीझर यानें जावें किंवा न जावें यायिषयीं त्याचा व त्याची स्त्री कॅल्पार्नीया हीचा संवाद दिला आहे. याची ब्रूटस व पोर्शिया याच्यामधील संवादाशीं तुलना करण्यासारखी आहे.

**अंक ३ रा.**—हा अंक सर्वांत अत्यंत महत्वाचा आहे. कॅपिटोल सभेमध्यें सर्व लोक येऊन जमले असतां, सीझर प्रवेश करितो. आतां येथें कशी मजा झाली आहे पहा, तमाम कटवाले मंडळी सावाचितपणें येऊन उभी राहिली होती व त्यांच्या कटाची भुमका सर्व नगरभर आंतून आंतून पसरली होती; तथापि निश्चित असें कोणालाच कांहीं माहीत नसून, सीझर याला तर याचा गंधही नव्हता. यामुळें कॅपिटोल सभागृह कटाच्या ध्वनीनें घुमत असतां, त्यांत एकटा सीझर मात्र समुद्रात राहून कोरडा रहावा तसा बापुडवाणा, सर्वांस दिसला असेल. व त्यावेळचा कॅपिटोल गृहाचा देखावाही फारच विलक्षण दिसला असेल यांत शंका नाहीं.

यांत सीझर याचीं जीं जीं भाषणें दिलीं आहेत तीं विषेशेंकरून लक्ष देण्यासारखीं आहेत त्यांत त्याचा स्वभाव

वर्तन देखील जुलमी होतें असें ह्मणतां येणार नाहीं. जातीनें तो दयाळू होता असें दिसतें. तथापि राज्यकारणांत जो दृढ निश्चय पाहिजे तो मात्र त्याच्या ठिकाणी पूर्णपणें वसत होता. यामुळेंच त्याच्या वर्तनांत एके प्रकारचा हट्टीपणा उत्पन्न होऊन, त्यावर क्रूरतेची झाक मारिते व एवढेंच कारण कटवाल्यांस त्याच्या वधाकारितां पुरेसें झालें होतें. याशिवाय सीझर याचा प्रताप अचल होता यामुळेंही त्याला आपल्या सामर्थ्याची घमेंड वाटूं लागली होती; इतकेंच केवळ नव्हे, पण आपण करूं व ह्मणूं तें झालेंच पाहिजे, असेंही त्यांस वाटूं लागलें होतें. या हेकेखोर स्वभावामुळेंच लोकांस तो जुलमी वाटूं लागला असें ह्मणावयास चिंता नाहीं. हद्दपार केलेल्या सिंबर याची मुक्तता करावयाची नाहीं, हेंच निमित्त त्याच्या प्रतिपक्ष्यांनीं पुढें केलें व लगेच एकामागून एक असे तलवारींचे घाय त्यांनीं त्याजवर केले. याप्रमाणें सीझर पडला त्यावेळचें तें वर्णन शेक्स्पियर कवीनें ॲन्टानीयाच्या मुखानें वर्णिलें आहे तें फारच भयप्रद व करुणोत्पादक आहे.

**प्रवेश २ रा.** यांत सीझर याचा वध झाल्यावर नागरिक जनांत जी चळवळ उत्पन्न झाली तिचें वर्णन आहे. ते कटवाल्यांचीं सीझरच्या वधाचीं कारणें ऐकावयास किती उतावीळ झाले हें आपण पहातों. मग ब्रूटस हा भाषण पीठावर उभा राहून भाषण करितो त्याचें भाषण एकंदरीनें

पाहतां फार व्यवस्थित मुद्देसूद व वक्तृत्वपूर्ण असें आहे. पण त्यांत समजदार लोकांच्या विवेकबुद्धीला मात्र समजेल असाच कोटिक्रम वक्त्यानें योजिला आहे; व भाषणसरणीही सरळ व प्रौढ अशी दिली आहे. ज्यावेळीं खुनाची चळवळ चालली आहे अशावेळीं अशा प्रकारच्या भाषणाचा काय उपयोग ? बहुधा, प्रसिद्ध वक्ता सिसरो यानें ग्रीक भाषेंत केलेलें उत्कृष्ट भाषण ऐकून, तें न समजल्यामुळें श्रोते जसे माना डोलावून व आश्चर्ययुक्त मुद्रा करून उगच राहिले असें पुढें एके ठिकाणीं वर्णिलें आहे, तसाच प्रकार ब्रूटस ह्याच्या भाषणाचाही होऊन गलबललेल्या रोमन लोकांच्या मनावर परिणाम झाला असेल; यावरून अधिक तें काय व्हावें ?

पुढें ॲटनीयाचें भाषण येतें. तेंही वक्तृत्वपूर्ण असून दगडालाही पाझर फोडणारें आहे. मग खुनामुळें खवळून गेलेल्या लोकांस त्यानें पाझर फोडला यांत काय नवल ? तथापि त्यांत फ़ारसा खोल कोटिक्रम लढविला आहे असें नाहीं. केवळ लोकांच्या मनाला घडलेल्या कृत्यांविषयीं कींव येऊन त्यांचीं मनें खवळावीं एवढाच गुण आहे. विशेषें करून आरंभींच सीझर याच्या प्रेताकडे बोट दाखवून ॲटनियानें त्याला आरण्यांतील मृगाची उपमा देऊन त्याचा खून करणारास पारध्याची उपमा; दिली आहे ती त्या प्रसंगाला

किती समर्पक आहे! सारांश ती करुण, द्वेष, वगैरे नानाविध वृत्तींचा ठसा उत्पन्न करिते, यांत शंका नाहीं.

प्रस्तुत प्रवेशांत भाषणें ऐकण्यास जमलेल्या मंडळीच्या मनाचा अस्थिरपणा कवीनें मोठ्या कुशलतेनें वर्णिलेला आहे, असें पुष्कळांचें ह्मणणें आहे; पण आमची दृष्टि ह्या प्रकरणांत वेगळी आहे ती कशी याचा खुलासा थोडक्यांत येथें करितों. ब्रूटसचें भाषण होऊं लागलें ह्मणजे त्याला श्रोतृजन माना डोलवित आहेत असें आपण पाहतों. व कोणीकोणीतर सीझर याला मारलें हें फार चांगलें केलें असेंही ह्मणूं लागतात. कितीकजण सीझर "जुलमी नव्हता तर काय?" असें ह्मणून रोमनगर त्याच्या तडाक्यांतून बचाविलें हें आपलें महद्भाग्य होय अशीही आपल्या मनाची समजूत करून घेतात; इतकेंच केवळ नव्हे तर ती उघड उघड बोलूनही दाखवितात. मग सहजच एकाचें ऐकून दुसराही बोलतो; पण सर्वच बोलतात व तेणेंकरून गोंधळ उडतो असें कांहीं येथें कवीनीं दाखविलें नाहीं. उलट पक्षीं ॲन्टनी याचें भाषण सुरू होतांच जमलेल्या मंडळींचीं मनें करुणेनें आर्द्र झालीं आहेतशीं दिसूं लागतात. पण प्रत्यक्ष ॲंटनी गादीवर आल्याचा अहिरभाव दाखवून तो शेवटीं ह्मणतोः—" बरें आहे; तुमचे डोळे पाण्यानें भरून आले असले तर आतां त्यांना खुशाल पाझर फुटूं द्या! " याप्रमाणें त्याचें भाषण चाललें

असतां व बऱ्याच मंडळींचीं अंतःकरणें भरून आलीं असतां, कितीएक जण ' सीझर याला मारिलं हें अत्यंत घातक कृत्य झालें ' असें ओरडतात. मग कितीएक जण कटवाल्यांचीं घरें दारें जाळा अशी इशारतही देतात. व कितीएक जण तर तसें करावयास निघतात; इतकें होतांच मोठा गोंधळ उडून सर्वच लोक तसें करूं लागले असें वर्णन येतें. या सर्व प्रकारावरून हे प्रकार कवीनें मुद्दाम तसे योजिले आहेत असें ह्मणावें लागतें. आणि तेथें जमलेल्या लोकांचीं मनें अस्थिर होतीं असें दाखविण्याचा कवीचा हेतु नसून, अशा भाषण प्रसंगीं कांहीं मंडळींस अनुकूल किंवा प्रतिकूळ लोकांस संकल्पित हेतु सुचवून चिडावण्याकरितां समजून उमजून लोकांचे जमावांत ठेविलेले असत व त्यांच्या चिथावणीनें व सुचनेनें इष्टकार्य सिद्धीस जाऊन वक्त्याच्या भाषणांस मोठेंच पाठबळ मिळत असेल. ही गोष्ट लोकांच्या भाषणप्रकारावरूनच स्पष्ट होते असें आम्हांस वाटतें.

**अंक ४ था व ५ वा**–सीझर मारला गेल्यावर नाटकाचें मुख्यकृत्य संपलें असें वाटतें; पण शेक्स्पियर कवीनें असें केलें नाहीं व तें समजून उमजूनच केलें नाहीं, असें दिसतें. त्यानें तिसऱ्या अंकाबरोबरच ह्मणजे सीझर याच्या वधाबरोबर जर नाटक संपविलें असतें तर सीझर याचा वध झाला ही गोष्ट योग्यच झाली असें कवीचेंही मत आहे असें ध्वनित

झालें असतें. पण कविचा हेतु तसा दिसत नाहीं. ह्मणूनच प्रस्तुत नाटकाचा विषय शोकपर्यवसायी असतांही त्यानें तो येथवरच न थांबवितां त्याला आणखीं शेवटले दोन अंक जोडून त्याचें शेंपूट बरेंच लांबविलें आहे. या दोन शेवटल्या अंकापैकीं पहिल्यांत सीझरच्या वधानंतर त्याच्या अनुयायी मंडळीला जी सूड घेण्याची इच्छा झाली तीमुळें ओढावलेल्या लढाईचें वर्णन आहे. प्रथमतः, ॲंटनी, ऑक्टेव्हिअस सीझर व लेपिडस या त्रिकुटानें काय करण्याचें योजिलें तें सांगून तिघांच्याही स्वभावाचें वर्णन कवीनें थोडक्यांतच पण खुबीदार दिलें आहे.

पुढें ब्रूटस व केशियस यांच्यामधील कलहाचें वर्णन येतें; हें वर्णन फारच मासलेवाईक आहे. ब्रूटस ह्याचा न्यायीपणा व अन्यायाविषयीं तिटकारा परंतु कार्यावर दृष्टि देऊन समेट करण्याची त्याची बुद्धि व त्याचा सौम्यपणा हे गुण येथें दाखविले आहेत.

पोर्शियेच्या निधनाची बातमी सांगतांना ब्रूटस याचा धिम्मेपणा व ती ऐकून उडालेली केशियस याच्या मनाची भांबावलेली वृत्ति वगैरे प्रकार पाहून प्रेक्षकांचे मनास द्रव आल्यावांचून कधींच रहाणार नाहीं.

याप्रमाणें या दोघां वीरांचा समेट झाल्यावर ते आपापल्या डेऱ्यांत निघून जातात. पण ब्रूटस याच्या डेऱ्यांत सीझरचें

पिशाच्च त्याला दिसूं लागतें. कवीनें येथें पिशाच्च काय आणिलें ? ही विचार करण्यासारखी गोष्ट होय. ज्या ग्रंथाच्या आधारानें हें नाटक कवीनें रचिलें ह्यांत पिशाच्च दिसल्याची गोष्ट लिहिली आहे हें खरें; पण याचा अर्थ काय हें वाचकांस सहजच विचारावेसें वाटेल. पण याच्या उत्तरासाठीं कवीनें अगोदरच एक खुबी करून ठेविली आहे असा आमचा ग्रह झाला आहे. त्यानें ब्रूटस व कॅशियस यांचें एकांतांत खलबत चाललें असतां, सिन्नाकवी जबरदस्तीनें प्रवेश करूं लागल्याचें दाखविलें आहे. हा सिन्नाकवी कोण व तो कशा करितां येतो व तो आल्याचें दाखविण्यांत कवीचा हेतु काय याचाही उलगडा निटसा होत नाहीं. ह्यासंबंधानें आह्मांस असें वाटतें कीं, शत्रुपक्षानें प्रत्यक्ष सिन्ना याला किंवा तत्सदृश सोंगाड्या मनुष्याला बहुधा त्यांच्या मसलतीचा भेद करण्याकरितां पाठविलें असावें ! अर्थात् अशा मनुष्यावर दोघेही वीर तुटून पडतात व त्याला बिलकूलही थारा देत नाहींत हेंही याच कारणास्तव असावें. या युक्तीप्रमाणेंच सीझर याचें भूत ह्मणजे शत्रुपक्षाकडून करविण्यांत आलेला हा कांहीं तरी कावा असावा असें अनुमान होतें. मुद्राराक्षस नाटकांत शत्रुपक्ष्यानें विषकन्यादि प्रयोग केल्याचें वर्णन आढळतें त्याची येथें वाचकांस सहज आठवण होईल.

पांचव्या अंकांत ब्रूटस, कॅशियस वगैरे मुख्य मुख्य पा-

त्रांनीं आत्महत्या केल्याचा देखावा आहे. यावरून शोकाची विपुलता करावी अशी कवीची योजना दिसते; परंतु पुढें पहावें तों शेवटल्या भागांत सूड उगवणाऱ्या मंडळीचा प्रमुख आणून त्याचे मुखानें जें वदविलें आहे त्यावरून थोडक्यांत शेवट गोड दाखवावा अशीहि कवीची मसलत दिसते! कारण ऑक्टेव्हिअस ह्मणतो—"ब्रूटस ह्याच्या गुणांना अनुरूप असाच त्याचा अंतविधी आपण करूं, आजची रात्र त्याचें शव मोठ्या शूर विराप्रमाणें माझ्या तबूंतच थाटमाटानें राहूं द्या. आणि रणांगणावरील सर्व लोकांनाही विश्रांति घेऊं द्या. आणि आपणही आजच्या जयश्रीचें सुख अनुभवण्यास आतां जाऊं."

## पात्रांचीं स्वभावचित्रें.

प्रस्तुत नाटकांतलें प्रमुख पात्र सीझर होय, यास्तव त्याचें ऐतिहासिक चित्र कसें आहे तें दाखवून मग कवीनें रेंखाटलेलें चित्र दाखवूं.

इतिहासांत सीझरचें मन फार थोर असल्याचें वर्णन आहे. त्याची प्रकृती फार नाजूक होती; त्याला मस्तकशूल व फेंपरें हेही विकार होते. ह्याचीं कांहीं उदाहरणें शेक्स्पियरनें आपल्या नाटकांत दिलींच आहेत. एकदां केशियस आणि सीझर स्पेन देशांत कामाला गेले असतां सीझरला ताप लागल्या-

ची हकीकत त्यानें दिली आहे. तसेंच मुकुट अर्पण करण्याचे वेळीं जनसमाजाची जी गर्दी उडाली तींत त्याला फेंफरें येऊन तो पडला असें नाटकांत वर्णिलें आहे. याशिवाय आणखी कांहीं उदाहरणें सांगण्यासारखीं आहेत. तथापि त्याच्या कार्यांत हीं देहाचीं व्यंगें कधींही आड आलीं नाहींत. कांहीं मित्रांबरोबर तो मौजेनें प्रवास करीत असतां, एकाएकीं पावसाची सर आली. तेव्हां सर्वजण जवळच्याच एका झोंपडींत शिरले. त्या झोंपडींत फक्त एकासच निजण्यापुरती जागा होती. सीझरनें तेथें निजावें असा सर्वजणांचा आग्रह पडला. पण त्यानें तसें करण्याचें साफ नाकारिलें. "सन्मान हा थोरांसाठीं परंतु सोई ही अशक्तांसाठीं" असें म्हणून त्यानें आपला मित्र ऑपिथिअस यानें तेथें निजावें असें ठरविलें व आपण इतरांबरोबर दरवाजाबाहेर एका लहानशा पडवींत पडून रात्र काढिली !

त्याच्या पूर्व वयांतच त्याच्या महत्वाकांक्षेचीं चिन्हें दिसूं लागल्याचें वर्णन आढळतें. एकदां आल्प्स पर्वतावरून प्रवास करतांना वाटेंत एक लहानसें खेडें लागलें. तेव्हां एक मित्र त्याला सहज ह्मणाला "हे लोक इतके भिकार आहेत कीं येथें मला कोणीं राजा करतों ह्मणून ह्मटलें तरी मी साफ नको ह्मणेन. त्याहून रोम नगरांत सामान्य प्रतीचा नागरीक

होणें किती तरी बरें.” यावर सीझरनें जें उत्तर केलें, तें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे तो ह्मणाला—

“ I had rather be the first man
here than the second man in Rome.”

“ बाबारे ! रोममध्यें दुसऱ्या दर्जाचा माणूस होणें सुद्धां मला आवडणार नाहीं.त्यापेक्षां या लोकांचाच राजा होणें काय वाईट? मी कोठेंही गेलों तरी पहिल्या प्रतीचा मनुष्य होईन. माझी तर अशी बुद्धि आहे.” स्पेन देशांत असतां तो फावल्या वेळांत ॲलेक्झांडरचें चरित्र वाचीत असे. तें वाचतांना त्याच्या डोळ्यांतून एकदां अश्रु वाहूं लागले. त्याचें कारण काय ह्मणून त्याच्या एका मित्रानें विचारल्यावरून तो ह्मणाला, अलेक्झांडर माझ्या वयाचा होता तेव्हां त्यानें इतके इतके देश जिंकले; पण माझ्याकडून अद्याप एकही संस्मरणीय कृत्य झालेलें नाहीं.”

सीझरच्या चारित्र्यावर सर्वांत मोठा असा डाग ह्मटला ह्मणजे स्वतःचें सामर्थ्य वाढविण्याच्या हेतूनें त्यानें आपला जांवई पांपी याच्याशीं वैर धरिलें हाच होय. पांपीनें अंतकाळीं सोफोक्लीसच्या नाटकांतील पुढील वचन उच्चारून प्राण सोडिला,

“ Seekest thou a tyrants door? Then farewell Freedom! Though Free as air before.”

परंतु सीझरवरील राज्यलोभाच्या या आरोपाचें प्लुटार्कनें समर्थन केलें आहे. तो ह्मणतो, " रोमची स्थितीच अशी होती कीं त्यावेळीं कोणीतरी कडवा सत्ताधारी तेथें पाहिजेच होता. रोमच्या राज्याला लागलेला रोग बरा करण्यास सीझर हा ईश्वरानेंच पाठविलेला धन्वंतरी होता. "

आतां ह्या नाटकांतील सीझरचें स्वभाव चित्र रेखाटण्यांत शेक्स्पियरनें आपलें चातुर्य कसें दाखविलें आहे तें पाहूं. इतिहासांतील सीझर व या नाटकांतील सीझर यांच्या स्वभावांत कांहीं बाबतींत जमीन अस्मानाचा फरक आहे. इतिहासांतरीं वर्णिलेला सीझर कुशाग्रबुद्धि, आत्मसंयमी, नियमित, दयाळु अशा स्वभावाचा आहे.

परंतु सीझरचा स्वभाव आहे तसाच दाखविल्यास इतर पात्रांचा स्वभावाचा परिपोष योग्य रीतीनें झाला नसता. इतकेंच नव्हे, पण सीझरला ठार मारणारांविषयीं प्रेक्षकांच्या मनांत अत्यंत तिटकाराच उत्पन्न झाला असता. पण तसें होणें नाटकाचा उठाव होण्यास प्रतिकूल झालें असतें. या कारणास्तव शेक्स्पियरनें सीझरचें स्वभावचित्र निराळ्या तऱ्हेनें दाखविलें आहे. या नाटकांत सीझरचा स्वभाव गर्विष्ठ व बढाईखोर असा दाखविला आहे. मृत्यूपूर्वीं सीनेटमधील त्याचें भाषण दर्पोक्तीनें ओतप्रोत भरलें आहे. व त्यामुळेंच

गर्वानें तो कसा ताठून गेला होता हें आपणास चांगलें कळून येतें. प्लूटार्क यानें तर सीझर याच्या लोकोत्तर गुणांची वाखाणणीच केली आहे. प्लूटार्क ह्मणतो—" सीझर हा मनानें मवाळ व क्रियेनें दयाळ असाच होता. तो दीन जनांचा परामर्ष घेत असे, तसाच गुणिजनांचाही बोज तो राखीत असे. परंतु त्याच्या सभोंवतालीं जें मित्रमंडळ सहकार्य-बुद्धीनें जमा झालें होतें, व जे लोक त्याच्याशीं बरोबरीच्या नात्यानें काम करण्यास सिद्ध झाले होते व ह्मणूनच जे त्याच्याशीं बरोबरीच्या नात्यानें वागत, किंबहुना कित्येक प्रसंगीं शिरजोरपणा दाखवित, त्यांशीं मात्र तो ताठ्यानें वागे. मग आपल्या कवीनें त्याच्या स्वभावांत हा जो बदल झालेला दाखविला आहे त्याचें समर्थन कसें व्हावें अशी येथें सहजच शंका येते. आतां या शंकेचें समाधान करणें कांहीं फारसें अवघड नाहीं. संपत्काळ प्राप्त झाला असतां मनुष्याचा स्वभाव पालटतो हें कोणास ठाऊक नाहीं ? अलेक्झाँडर व नेपोलियन यांच्या चरित्रांवरून तर ही गोष्ट चांगलीच स्पष्ट होते. प्रत्येक लढाईंत जयाची प्राप्ति होत गेल्यामुळें व जें ज काम हातीं घ्यावें त्यांत यशच येत गेल्यामुळें, आपण ह्मणूं ती पूर्व दिशा झालीच पाहिजे अशी मति त्याची झाली यांत कांहीं नवल नाहीं. अंमळ कोणी विरुद्ध भाषण केलें कीं तो आपला शत्रु आहे, असा त्यांचा शेवटीं

शेवटीं ग्रह होऊं लागला, व त्याचा कांटा काढून टाकण्यासही त्यांस कांहीं कठिण नसल्यामुळें त्यांनीं आपल्या शत्रूंचा विध्वंस करण्याचा क्रम धरला. व तेणेंकरून ते चढून गेले, गर्विष्ट बनले व घमेंडखोर झाले असा आपला ग्रह झाला तर यांत काय नवल आहे? सीझर याचें वर्तन पुढें पुढें तर असें होऊं लागलें कीं त्याला स्वतःच्या बुद्धिमत्तेचा व दैवानुकूल्याचा अत्यंत विश्वास व अभिमानही वाटूं लागला. याच मनुष्य–स्वभावाच्या विशेष गुणावर लक्ष देऊन, आपल्या कवीनें सीझर सरते शेवटीं घमेंडखोर व गर्विष्ट बनला असें जें दाखविलें त्यांत चूक केली नाहीं, इतकेंच नाहीं तर मनुष्याच्या मनोधर्माचें आपलें मार्मिक ज्ञानच प्रगट केलें असें ह्मटलें पाहिजे. सीझरच्या वर्तनांतले वरील दोन मुख्य गुण जे कवीनें दाखविले ते केवळ कवीच्या कल्पनासृष्टीचेंच फळ नव्हे, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. याला इतिहासांतही स्पष्ट आधार आहे. प्लूटार्क लिहितो कीं युद्धप्रसंगीं वगैरे तो आपला जीव बेफिकीरपणें धोक्यात घालीत असे व त्यांत आपणास अपेश येईल किंवा आपण प्राणास मुकूं या गोष्टी त्याच्या ध्यानींमनींही येत नसत. त्याच्या ठिकाणीं जो एक दोष ह्मणून होता तो एवढाच कीं त्याला राजा ह्मणून घेण्याची अनावर इच्छा झाली होती, व ती अक्षम्य होती. पण शेक्स्पियर कवीनें दाखविलेली सीझर याच्या स्वभा-

वांतील ही मानासिक अवनति केवळ अक्षम्यच आहे, असें कधींही कोणी ह्मणणार नाहीं.

आतां प्रस्तुत नाटकाचा नायक ब्रूटस याचें स्वभावचित्र आपल्या कवीनें कसें रेखाटलें आहे तें पाहूं. सीझरचा मित्र व कटवाल्यांचा पुढारी, ब्रूटस, हा रोमन नागरिकांपैकीं महाजनसमाजाचा अभिमान बाळगणाऱ्या केटोच्या तालमींत वाढला होता. त्यानें प्रथम पांपीचा पक्ष धरिला होता. पण फार्सेलिया येथील लढाईनंतर तो सीझरच्या पक्षास येऊन मिळाला, त्या वेळीं सीझरनें त्याला क्षमा केली इतकेंच नव्हे तर दोघांच्याही मनांत एकमेकांविषयीं सप्रेम आदर उत्पन्न झाला. असें असतांही सरते शेवटीं सीझरच्या विरुद्ध झालेल्या कटांत ब्रूटसनें पुढाकार घेतला हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

सीझर, सीझरचा वध, व त्याचा सूड हा प्रस्तुत नाटकांतील नाट्यविषय असतांही, नाटकांतील प्रधानपात्र ब्रूटस हेंच आहे. साधारण प्रसंगांतून ब्रूटस सहज पार पडला असता, परंतु सीझरच्या वधानंतर जी आणीबाणीची वेळ आली तींतून निभावणें त्याला कठिण गेलें, किंबहुना तशा वेळीं प्रमुखत्वानें काम करण्यास तो नालायक होता असेंही म्हणावयास चिंता नाहीं. त्याच्या हातून ढोबळ चुका होऊन येत, त्या झाल्यामुळें त्याच्या पक्षाचा मोड झाला. कटवाल्यांचा पुढारी

या दृष्टीनें पहातां, ॲन्टनीला जिवंत राहूं दिलें हीं त्यानें पहिली चूक केली, व त्याला सीझरचे अंत्यसंस्कार करितांना वाटेल तसें मनमुराद बोलूं दिलें ही तर त्याहूनही घातक अशी दुसरी चूक केली. फिलिपी येथील लढाईत सेनानायकाचें काम करण्यांतही त्याच्या हातून चुकाच झाल्या.

ब्रूटस विद्याव्यासंगी होता, तो कार्यक्षम नव्हता. वाचन व मनन याची त्याला फार आवड होती. कित्येक बाबतींत तर पंडितंमन्य मनुष्यासारखी त्याची वागणूक दिसते. काम करण्याची वेळ आली कीं त्याच्या मनाला उद्वेग उत्पन्न होत असे; इतका कीं त्याला झोंपसुद्धां येत नसे. त्यामुळें त्याच्या पत्नीचें मनसुद्धां वारंवार चिंतातुर होत असे.

त्याचें मन उदार होतें. सीझरची सत्ता वाढून, त्याची सुलतानी वृत्ति बनण्यापूर्वीं त्याला ठार करणें हें त्याला न आवडणारें परंतु अवश्य असें कर्तव्य वाटत होतें. सीझरची त्याच्यावर प्रीति होती व तोही सीझरवर प्रीति करीत होता. त्यानें सीझरला मारला तो रोमन राष्ट्राच्या हितासाठीं–खाजगी द्वेषानें नव्हे. कॅशिअसचें मन त्याहून नीचतर होतें. कॅशिअसनें ब्रूटसच्या उच्च व उदार वृत्तीचा आपणास पाहिजे होता तसा उपयोग करून घेतला. कपटी व दुर्वर्तनी ॲन्टनीवर भोळेपणानें विश्वास ठेवून, ब्रूटसनें आपल्या

पक्षाचा घात केला. नोकराशीं सुद्धां त्याचें वर्तन सभ्य व मायाळूपणाचेंच आहे. कॅशिअसबरोबर झालेल्या भांडणांत त्याचें औदार्य थोरपणा हीं स्पष्टपणें दिसून येतात. अशा थोर पुरुषाचा अंत देखील त्याच्या आयुष्यक्रमाला साजेसाच झाला आहे.

ह्या सर्व कटाचा सूत्रचालक, कॅशियस ह्या मूळचा शिपाईगडी असून, फार्सेलियाच्या लढाईनंतर सीझरनें त्याला दयेनें वागविलें होतें; तरीही तो शेवटीं आपल्या उपकारकर्त्याच्या जीवावर उठलाच. ज्या कटाचा पुढाकार नंतर ब्रूटसकडे आला, त्या कटाचा मूळ उत्पादक ह्मटला ह्मणजे कॅशियस; त्यानें ब्रूटसच्या मनाला भुरळ पाडून, त्याला आपल्या पक्षाकडे वळविलें. कॅशियसचे हेतु कांहीं उच्च प्रकारचे नव्हते. सीझरला नाहींसें करावें असें त्याला वाटण्याचें मुख्य कारण म्हटलें तर त्याचा मत्सर व दुष्टपणा इतकेंच दिसतें. गुण पाहूं गेलें असता त्याच्या अंगीं थोडेच आढळतील. त्याचें ब्रूटसवर मनापासून प्रेम होतें. तो एक रोमन सरदार व सिनेटर होता. रोममध्यें कोणीही एकट्यानें राजा होणें त्याला आवडत नव्हतें. अॅन्टनी पुढें मागें आपल्या पक्षाचा प्रतिस्पर्धी होईल हें त्यानें पूर्वींच ताडलें होतें. आपला हेतु साधण्यासाठीं वाटेल ते उपाय योजण्याची त्याला दिक्कत नव्हती. तो खरा कार्य-

साधु होता. सदसद्विवेकबुद्धीचें त्याच्या डोक्यावर फारसें दडपण होतेंसें दिसत नाहीं.

सीझरचा सूड उगविण्यांत पुढाकार घेणाऱ्या ॲन्टनीचें स्वभावचित्र अगदीं सार्धे आहे. त्याची सीझरवर अगदीं उघड व एकनिष्ठ प्रीति होती. कॅशियस तर त्याला 'विदूषक व खुशामत्या' म्हणतो. सीझरही त्याला एक "चैनी गडी" च समजतो. कटवाल्यांशीं संबंध आला कीं तो न्यायान्यायाची फिकीर करीत नाहीं. सीझरच्या मृत्यूनें इटली देशाचें सामर्थ्य कसें ढांसळण्यास सुरुवात होईल याची त्याला अगोदरच कल्पना होते, यापलीकडे राज्य-कारणाची त्याला फारशी माहिती नाहीं. लोकांना चिथावून देऊन तो बेलाशक चालता होतो.

एकंदरींत या नाटकांत आरंभिलेल्या ॲन्टनीच्या स्वभावाचा विकास पुढें ॲन्टनी व क्लिओपाट्रा या नाटकांत झाला आहे. त्याच्या अंगीं दोष होते, तसेंच पण त्याचें मनही मोठें होतें.

या नाटकांत फारच थोडीं—फक्त दोन स्त्रीपात्रें आहेत. त्यांपैकीं सीझरची बायको कॅलपर्निया हिचें कांम फारच थोडें आहे. दुसरी पोर्शीया. हिचें चित्र मात्र फारच मार्मिक रीतीनें वठलें आहे. साऱ्या दोन प्रवेशांतच इतक्या सुंदर चित्राचा उठाव करून, फारच थोडच्या शब्दांत आपल्यास स्त्रीस्वभाव

इतका सुंदर वठवितां येतो हें शेक्स्पियरनें दाखविलें आहे. केटोची मुलगी व ब्रूटसची पत्नी, पोर्शिया हिचा स्वभाव तिच्या थोर स्थितीस साजेसाच आहे. कोमल, ममताळू, उदार, पतिहिततत्पर, तथापि शूर, धैर्यशील व पतिनिष्ठ अशा स्त्रीचें हें चित्र फारच मोहक आहे. नाटकांत तिचें भाषण व कार्य फारच थोडें आहे, पण तिच्याविषयीं कौतुक व आदर वाटण्यास तें पुरेसें आहे. पोर्शिया ही रोमन स्त्रियांच्या अंगीं वसत असलेल्या सद्गुणांची साक्षात् मूर्तिच आहे असें ह्मटल्यास वावगें होणार नाहीं.

ज्यूलियस सीझर नाटकांतील मुख्य मुख्य पात्रांचें स्वभाववर्णन वर दिलें आहे. आतां सदरहु नाटकाशीं सदृश असें एखादें नाटक संस्कृतांत किंवा मराठींत आहे कीं काय हें पाहून त्याशीं प्रस्तुत नाटकाची तुलना करून दाखविली असतां, त्याची खुबी जास्त लक्षांत येईल हें उघड आहे. पण इतिहासांतील प्रसंग हें जर खरें नाटक आहे असें मानिलें तर अशा ह्यासंबंधानें आमच्या एका मित्राचें जें म्हणणें आहे तें त्याच्याच शब्दांनीं येथें देतों ह्मणजे झालें. त्याच्या मनांतून ह्याच विषयावर एक विस्तृत निबंध लिहावयाचा आहे, त्या निबंधाची छाया मात्र दिसून येईल असा हा त्याच्याच हातचा पुढील लेख आहे, तो येणेंप्रमाणें आहे:—

ज्याप्रमाणें रोममध्यें सीझरसारख्या राजपुरुषाचा घात करण्यांत आला, तद्वतच महाराष्ट्रांतही नारायणराव पेशव्या-चा वध करण्याचा कट होऊन तो सिद्धीसही गेला. सीझर-ला मारण्याच्या कटांत सूत्रचालक केशियस होता, त्यानें उदार मनाच्या ब्रूटसला चिथावून त्याच्या हातून सीझरला मारविलें; त्याचप्रमाणें इकडे आनंदीबाईनें सर्व कटाची जुळणी करून, भोळ्या व उदार राघोबाचे हातून नारायणरावाच्या वधाचें कारस्थान सिद्धीस नेलें. सीझरच्या मृत्यूचा सूड घे-ण्यासाठीं जसें त्रिकूट तयार झालें, तसेंच नारायणरावाच्या वधाचें प्रायश्चित्त देण्यास महाराष्ट्रांत बारभाईनीं कबर बांधली. सीझरच्या मृत्यूनंतर जसा रोमन प्रजासत्तात्मक राज्याचा नाश झाला, त्याचप्रमाणें नारायणरावाचा मृत्यु पेशवाईच्या नाशाला कारण झाला. रोम व महाराष्ट्र या दोन राष्ट्रांच्या स्थितींत या प्रकरणासंबंधानें सादृश्य दिसून येतें तें येवढेंच कीं, जेथें सर्वांचा हेतु एकच होता तेथें तो साधण्यासाठीं एकी करून कंबर कसण्यास राष्ट्रांतील जबाबदार लोकाग्रणी तयार असलेले दिसले. रोमन प्रजासत्तात्मक राज्य व पेशवाई या दोहोंमध्यें ज्या ज्या गोष्टी घडून आल्या त्या सर्व एकाच तऱ्हेनें घडून आल्या. लोकांचे त्या वेळचे पुढारी कसे कसे वागले हें लक्षांत आणिलें तर त्या सर्वांची वागणूक एकाच पद्धतीची झाली असेंच दिसून येतें. आलेल्या प्रसंगास तोंड देतांना त्यांनीं

मागें पुढें पाहिलें नाहीं. नेटानें, चिकाटीनें व जोमानेंच त्यांना आपलें कर्तव्य केलें. सीझर व नारायणराव यांच्या कर्तब गारींत जरी जमीनअस्मानाचें अंतर आहे, तरी दोन्ही राज-पुरुषांचा वध राष्ट्रांचा ऱ्हास व नाश होण्यास कारण झाला, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. सीझरचा वध हा रोमन इति-सांतील प्रसंग घेऊन शेक्सपियरनें नाटक रचिलें; त्याचप्रमाणें नारायणरावाचा वध हा प्रसंगही नाटकाचा विषय होण्यास फार योग्य आहे असें येथें स्पष्टपणें ह्मटल्यावांचून रहावत नाहीं. अलीकडे एका नाटकांत एका कुशल नाटककारानें नारायणरावाच्या वधानंतर महाराष्ट्राची स्थिति कशी झाली याचें चित्र रेखाटण्याचें श्रेय घेतलें आहे, त्यांत नारायण-रावाच्या वधासाठीं केलेल्या कटाचा नाम-निर्देशही करण्याचें कसें टाळलें आहे तें पाहण्यासारखें आहे; वस्तुतः ही त्याच्या कर्तबगारीचीच गोष्ट ह्मटली पाहिजे.

यावप्रमाणें प्रस्तुत नाटकासंबंधानें जें कांहीं आम्हांस सांगावयाचे होतें, तें सांगून झालें; आतां उपसंहारात्मक चार शब्द मात्र लिहावयाचे आहेत. ते लिहून, हें प्रकरण पुरें करतों. प्रस्तुत नाटक रचण्यांत व तें लोकांपुढें आणण्यांत शेक्सपियर कवीचा उद्देश काय होता, याचें उत्तर एका दृष्टीनें जें आम्हांला वाटलें तें वर दिलेंच आहे. वस्तुतः पहातां तिसरे अंकांत सीझर याचा वध झाल्यावर नाटक संपावें असें

वाटतें, आणि कटाचा उत्कर्ष वर्णन करावा एवढाच जर कवीचा उद्देश असता तर तसें करणें योग्यच झालें असतें. पण आपल्या कवीनें तसें केलें नाहीं; त्यानें प्रस्तुत नाटकांत आणखी दोन अंकाचें शेंपूट जोडून देऊन, त्याची लांबवण लाविली आहे. या दोन अंकांत वधापासून रोमन लोकावर व विशेषतः कट करणारावर काय प्रसंग ओढवले याचें दिग्दर्शन करून कटाविषयीं वाचकांच्या व प्रेक्षकांच्या मनांत तिटकारा उत्पन्न होईल असे त्यानें केलें आहे. हे प्रसंग दोन प्रकारचेः--एक मानसिक अवनतीचे दर्शक असून, दुसरे जगांतील व्यावहारिक दुःस्थितीचे दर्शक होत. सीझर याच्या वधामुळें तो करणारांच्या मनास ती एक व्याधिच जडल्यासारखें झालें. जिकडे जिकडे ते गेले तिकडे तिकडे त्यांच्या मागें सीझरची हत्या लागली. ब्रूटस व त्याचे अनुयायी, हे वधानंतर वेडेपिसे होऊन रोमनगराच्या तटाबाहेर भटकत आहेत--असें आढळतें, आणि पुढेंही युद्धाच्या आदले रात्रींच ब्रूटस याजला सीझर याचें पिशाच्च दिसतें व तें दृष्टीस पडतांच तो क्षणभर घाबरल्यासारखा होतो, त्याच्या सर्वांगास दरदरून घाम सुटतो व एवढा बलवान् असतांही त्याचें शरीर कंपायमान होतें. हा सर्व परिणाम कशाचा बरें ?--मानसिक अवनतीचा ! अर्थात् सीझर याच्या वधामुळें त्याचें मन त्याला खात असलें पाहिजे. आतां दुसऱ्या

पक्षीं कटवाल्यांची जगांतील व्यावहारिक स्थितिही बिघडून गेली, प्रत्यक्ष ब्रूटस याची पत्नी पोर्शिया हिनें हायहाय करून प्राण सोडला, हेंही तिच्या मानसिक अवनतीचें उदाहरण म्हणावयास चिंता नाहीं. जी स्त्री आपल्या मनावर आपलें स्वामित्व आहे म्हणून आपल्या पतीजवळ लडिवाळपणाच्या गप्पा मारते व मांडींत शस्त्र मारून घेऊन त्याच्या वेदना छपवून ठेवल्याबद्दल सोशिकपणाचा डौल घालते, तीच स्त्री दुर्धर प्रसंग येतांच सीझर याच्या हत्येला बळी पडते, याहून मानसिक अवनतीनें दुर्बळ झालेल्या मनाचा आणखी निकृष्ट नमुना कोणता पाहिजे ? बरें, ब्रूटस व केशियस हे दोघे एक ज्येष्ठ व दुसरा कनिष्ठ अशा बंधुत्वानें वागणारे असून, एकमेकावर अत्यंत प्रेम करणारे होते, असें असतांही त्यांच्या मध्यें दुजाभाव व द्वेष उत्पन्न होऊन ते कलह करूं लागतात, याहून मानसिक दौर्बल्याचें दर्शक आणखी कोणतें उदाहरण पाहिजे ? ब्रूटस याजला द्रव्यसाहाय्य पाहिजे होतें व केशियस याजलाही द्रव्याची कमतरताच होती. जे सीझर याची हत्त्या करून पळाले त्यांस द्रव्याचा पुरवठा कसा पडेल ? मग त्यांच्यात द्रव्यमूलक कलह उत्पन्न व्हावा यांत नवल काय ? पुढें युद्धांत पराजय झाल्यावर देखील त्यांची दुर्दशाच कवीनें दाखविली आहे. त्यांस आत्महत्या करून मरावें लागलें, इतकेंच केवळ नव्हे

तर ती हत्या करणारा देखील कोणी मिळेना! अशी कट-वाल्यांची दुर्दशा या नाटकांत अगदीं अखेरपर्यंत वर्णिली असल्यामुळें हें नाटक ह्मणजे कटांवर व तशा प्रकारच्या दुष्कृत्यांवर एक जालिम औषधच आपल्या कवीनें करून ठेवलें असा आमच्या मनाचा ग्रह झाला आहे. चालू सालीं युनिव्हर्सिटीच्या बी. ए. च्या परीक्षेला ज्यूलियस सीझर हें नाटक ठेवलें आहे तेव्हां त्याचा अभ्यास यथासांग होईलच. तो झाला असतां आमचा वरील ग्रह कितपत खरा आहे याचा निर्णय त्यांस सहज करतां येईल. सामान्य वाचकासही करतां यावा अशा तऱ्हेचें दिग्दर्शन आह्मीं वर केलेंच आहे.

---

# ज्यूलियस सीझर

## या नाटकाचें संविधानक.



इटली देशांतील रोमनगरच्या लोकांनीं एकेकाळीं आपलें साम्राज्य, त्यांस माहीत होता तेवढ्या पृथ्वीच्या भागावर, स्थापन केलें होतें. ते लोक मोठे शूर, पराक्रमी, व अनेक गुणांनीं संपन्न असे होते. त्यांतही, स्वदेशावरील त्यांचें प्रेम, व लोककल्याणाविषयीं त्यांची तत्परता, हे गुण अत्यंत प्रशंसनीय होते. जन्मभूमीच्या कल्याणाकारितां एक जूट करून कसें झटावें, हें त्यांस चांगलें माहित होतें. गुलामगिरीचा त्यांस अत्यंत तिटकारा होता, व त्याच मानानें स्वातंत्र्यासाठीं आपले प्राणही खर्ची घालण्यास मागें पुढें पाहाणारे ते नव्हते. अशा स्वतंत्र विचाराच्या रोमन लोकांस दडपून टाकून, गुलामगिरींत अक्षय्य जखडून टाकण्याचा जर कोणी प्रयत्न करूं लागला, तर तो त्यांस कसा खपावा ?

एकदां ज्यूलियस सीझर नामें एक शूर पुरुष त्यांच्यांत निघाला व त्यानें रोम नगरच्या लोकांस गुलामगिरीच्या स्थितीस नेऊन पोंचविण्याची मसलत मांडली. तो जात्या शूर होता, म्हणून त्यानें दूरदूरच्या देशांवर स्वाऱ्या करून, आपला पराक्रम गाजविला व अपार संपत्ती लुटून आणली. तसेंच शेकडों राजांसही पराभूत करून, आपल्या रथास बांधून आणिलें. हा त्याचा अतुल पराक्रम पाहून, रोमनगरचे लोक त्याला फार खूष झाले, व तेणेंकरून राज्यकारभारांत त्याचें प्रस्थ माजलें. तेव्हां रोमनगरचें राज्यपद आपणास मिळावें, व लोकांनीं आपणास राजा करावें, अशी इच्छा त्याच्या मनांत उद्भवली, व हळूहळू त्यामार्गानें तो खटपटी करूं लागला. त्यांत पहिली गोष्ट त्यानें ही केली कीं आपल्याच बरोबरीचे जे कित्येक लोक राज्यांत अधिकारारूढ होते, व जे त्यास अनुकूळ नव्हते, किंबहूना प्रतिकूळच होते, असें त्यास वाटलें, त्यांस आपल्या मार्गांतून त्यानें दूर केलें. राज्याचा सर्व कारभार करणाऱ्या तीन पुरुषांचें जें एक त्रिकूट असे, त्यांत क्रॅसस, ज्यूलियस सीझर, व पॉम्पी या तिघांचा समावेश होता. यांपैकीं पॉम्पी याचें घराणें पुरातन व लोकमान्य असल्यामुळें लोक त्यास फार मानित असत. परंतु ज्यूलियस सीझर हाही आपल्या पराक्रमानें नांवालौकिकास चढून, लवकरच लोकांस प्रिय झाला, मग सहजच उभयतांत स्पर्धा व वैमनस्य उत्पन्न झालें, आणि त्याचा परिणाम असा झाला कीं, सीझर हीं लढाईंत कसलेल्या आपल्या शिपायां-

साहित आला, व लष्करी थाटानें त्यानें रोमनगरांत प्रवेश केला. तेव्हां पॉम्पी यानें राज्यकारभार करणाऱ्या सेनेट सभेकडून असा हुकूम काढविला कीं, सीझर यानें जें सैन्य बरोबर आणलें आहे तें, त्यानें एकदम मोडून टाकावें, आणि तो असें न करील, तर त्यास राज्यद्रोही ह्मणून समजावें. या हुकुमामुळें सीझर याला अन्य मार्ग राहिलाच नाहीं. हुकूम मानावा आणि सैन्य मोडावें तर त्याचें सारें बळच खुंटलें असें झालें असतें, यास्तव धडधडीत पॉम्पी याच्याशीं बाकून राहाणेंच त्यास भाग पडलें. हळूहळू त्यांचें हें वैमनस्य वाढत जाऊन दोघेही निकरावर आले; दोघांमध्यें लढाई जुंपली व तींत पॉम्पी यास कांहीं अंशीं माघार घ्यावी लागली. तेव्हां तो भयाभीत होऊन नगर सोडून पळाला. आणि एवढी संधी मिळतांच, सीझर सैन्यासहित त्याजवर चालून गेला, व लवकरच एका लढाईंत त्यानें त्याचा सर्वस्वीं मोड केला; इतकेंच नव्हे तर पुढें त्यास, त्याच्या दोघां मुलांसहित, धरून ठार केलें. याप्रमाणें इकडे पॉम्पी याची विल्हेवाट लागली नाहीं, तोंच तिकडे क्रॅसस याचाही पार्थियन लोकांवरच्या मोहिमेंत नाश झाला. मग काय, सर्वच आटपलें; राज्य करणारें त्रिकूट मोडलें, व सर्व रोमराज्य सीझर याला निष्कंटक झालें. व त्यास आपली राज्यलोभाची महत्वाकांक्षा तडीस नेण्यास आयतीच उत्तम संधी मिळाली.

पुढें लवकरच मार्च महिन्याचे पंधरा तारखेला जो ल्यूपरकलचा सण आला, त्या शुभमुहूर्तावर लोकांनीं आपणास राजमुकुट व तदंग-

भूत इतर मानसन्मान अर्पण करावे, असा घाट त्यानें घडवून आणला. ह्या सर्व खटपटींत त्याचा जिवलग मित्र व अनुयायी ह्मटला ह्मणजे मार्कस अॅन्टनी हा होता. तो सीझर याच्या अत्यंत विश्वासांतला असून, त्यानेंच कॅपिटोलसभेमध्यें समस्त रोमनगरच्या लोकांच्या वतीनें सीझर याजला राजमुकूट अर्पण करण्याचा पुढाकार घेतला. परंतु सभागृहामध्यें एकदम गलबल उडाली, व लोकांच्या वर्तना वरून त्यांस ती गोष्ट पसंत पडली, असें दिसलें नाहीं. त्याच दिवशीं सकाळीं रोमनगरचे दोन कोतवाल फ्लॅव्हियस व मॅरूलस हे शहरच्या रस्त्यानें चालले असतां, हलक्या प्रतीच्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी सीझर याच्या राज्याभिषेकाचा समारंभ पाहण्यासाठीं ह्मणून चालल्या होत्या, त्या त्यांच्या दृष्टीस पडल्या. त्या लोकांस धमकावून ह्या दोघां कोतवालांनीं रस्त्यांतून हांकून दिलें, व सीझर याचे ठिकठिकाणीं पुतळे उभे केले होते, त्यांवर घातलेले शृंगारही त्यांनीं काढून टाकिले. सीझर यास राजपद मिळावें व त्यानें राजा होऊन समस्त रोमराज्यावर स्वामित्वानें अबाधित राज्य करावें, हें त्यांस बिलकूल पसंत नव्हतें. कारण पुतळ्यावरील शृंगार काढवीत असतां, फ्लॅव्हियस स्पष्टपणें आपल्या सोबत्यास ह्मणालाः—"जो सीझर अशा प्रकारें फुगून जाऊन, मनुष्याची दृष्टि न पोहोंचे, अशा मोठमोठ्या उंच भराऱ्या आज मारूं पहात आहे, व आपणा सर्वांना गुलामगिरींत जखडून टाकण्याची तयारी करित आहे, त्याचीं पिसें याच वेळीं अशीं उपटून टाकलीं, ह्मणजे

त्याची एवढी भीति राहणार नाहीं. ” आणि सीझरच्या राजपद-लोभामुळें असाच ग्रह शहरांतील बहुत लोकांचा झाला होता.

एकंदरीनें पाहातां, सीझर याच्या अशा वर्तनामुळें रोमनगरच्या लोकांत दोन तट पडले; त्याच्या लोभांतल्या लोकांचा एक तट, व त्याच्या राज्य लोभामुळें त्याला नाखूष झालेल्या लोकांचा एक तट. या दुसऱ्या तटांतल्या लोकांचा कॅशियस हा मुख्यत्वें पुढारी होता. व त्याच्याच चळवळीनें सीझर याचा वध करण्याचा कट अस्तित्वांत आला, असें ह्मणावयास चिंता नाहीं. पुढें लवकरच जे लोक या कटांत येऊन मिळाले, त्यांच्यांत दिसायला भोळसट, पण आंतल्या गांठीचा व दृढनिश्चयी कॅस्का, आणि सीझर याजकडून मानखंडना झालेला, व ह्मणूनच त्यास पाण्यांत पाहणारा तो लिगॅरस, तो तोंडपुजा डेशियस, त्याच प्रमाणें मेटेलस, ट्रेबोनियस सिन्ना वगैरे दुसरेही अनेक रोमन गृहस्थ प्रमुख होते.

याप्रमाणें सीझर याचा नाश करण्यास उद्युक्त झालेल्या मंडळीची जुळवाजुळव होऊन, त्याचा वध करण्याचा त्यांचा बेत निश्चित झाला. तथापि त्यांस एका गोष्टीची उणीव भासूं लागली. त्यांच्यामध्यें कोणी वजनदार पुढारी नव्हता. तो जर कोणी मिळेल तर उत्तम असें सर्वांस वाटलें; व असा कोण मनुष्य आहे ह्मणून ते पाहूं लागले. सर्वांची दृष्टी मार्कस् ब्रूटस याजकडे गेली. ब्रूटस हा खरोखरींच त्या कामाला योग्य होता. त्याचें घराणें कुलीन व प्रसिद्ध असून, स्वतः त्याचा स्वभावही विचारी, शांत व दयाळू

होता. प्रामाणिकपणाविषयीं व लोककल्याणबुद्धीविषयीं तर त्याची सर्वत्र ख्याति होती. तथापि अशा मनुष्याचा लाभ कटवाल्या मंडळीस व्हावा कसा, हीच कायती अडचण होती. एकदां मडळी जमली असतां, सिन्ना यानें हाच प्रश्न काढला, तेव्हां त्याला आश्वासन देऊन केशियस ह्मणतो ‘ ब्रूटस याला बहुतेक तीन हिस्से आपण आपलासा केला आहे. आणखी एकदां आपण सर्व-जण त्याला जाऊन भेटलों, कीं तो आपल्याला पूर्णपणें वश झालाच ह्मणून समजा. यावर मान डोलवून कॅस्का ह्मणतो, ‘ अहो, सर्व लोक त्याला मनापासून पूज्य मानीत आहेत, व यामुळें जी गोष्ट आपण केली तर महापातक ह्मणून समजतील, ती तो आपणाला अनुकूल झाल्यावर मोठ्या योग्यतेची ठरेल, यांत संशय नाहीं. यासाठीं त्यास आपल्या बाजूला वळवून घ्यावा हेंच योग्य आहे. ’

मग केशियस हा लागलीच ब्रूटस याजकडे जाऊन त्याला भेटला. मग त्याच्या मनाचें वळण कुणीकडे आहे, हें पाहाण्याच्या हेतूनें त्यानें आपल्या भाषणाचा प्रस्ताव केला. प्रथम इकडल्या तिकडल्या गोष्टी काढून, तो ह्मणाला, ‘ महाराज मी तुह्मांला एवढेंच विचारतों कीं, तुमचें रूप तुह्मांला कधीं पाहतां येईल काय ? खचित येणार नाहीं; त्याला पुढें आरसा धरला पाहिजे. कोणत्याही कारणामुळें तशीच झांकून राहिलेली तुमची खरी योग्यता प्रतिबिंबाच्या रूपानें तुमच्या नजरेस आणून देणारा

आरसा तुह्मांला आजपर्यंत मिळाला नाहीं, ही मोठ्या दुःखाची गोष्ट झाली. तर आतां मी तुमच्यापुढें तुमचा आरसा उभा आहें असें समजा. हा आरसा तुमच्या ठिकाणीं वसत असलेले जे गुण तुह्मांला माहित नाहींत, ते तुह्मांला दाखवील. पण महाराज, यांत मी तुमची थट्टा करतों, असें मात्र ह्मणूं नका. खोटें नाहीं सांगत, या अमर सीझरावांचून रोमनगरांतील दरोबस्त नामांकित शिष्ट व मान्य गृहस्थ हल्लींचा काळ फार वाईट आला आहे, असें ह्मणून कष्टी होतांना मी पाहिलें आहे. सर्वांचें ह्मणणें असेंच येतें कीं, या थोर ब्रूटसला आपली खरी योग्यता कळती, तर फार बरें झालें असतें!'

यावर ब्रूटस ह्मणाला, 'हा उगाच पाल्हाळ हवा कशाला? तुमच्या मनांतून मला काय सांगावयाचें आहें, तें एकदां सांगून टाका. बोला, लोककल्याणाची एखादी गोष्ट करायला तुह्मीं मला सांगत आहां काय? मग त्यांत मरण कां येईना. मला त्याची बिलकुल पर्वा नाहीं. ती मी खुशीनें करीन. त्याचप्रमाणें लोककल्याण केल्यानें नांवलौकीक होईल, मानसन्मान मिळतील, हें जरी सारें खरें आहे, तरी त्यांचीही मला फारशी पर्वा नाहीं--दोन्हीही मला सारखेच. तथापि नांवालौकीकाची चाड जर मला कांहीं असेल, तर खचित परमेश्वर माझा तो मनोरथ पूर्ण करील.'

हें भाषण ऐकून केशियस यांला अम्मळ धीर आला, व तो आणखी पुढें ह्मणाला; 'खरोखर, तुमच्या स्वरूपाची जशी बरोबर परिक्षा करितां येते, तशी या अप्रतिम गुणाची योग्यता मी जाणतों;

आणि माझ्या बोलण्याचा मुख्य विषयही पण नांवलौकिक हाच आहे. आपल्या मानवी जीविताबद्दल इतरांना व तुह्मांला स्वतः लाही काय वाटत असेल तें असो–हें मला नीटसें समजणार नाहीं हें खरें; तरी पण माझें मत विचाराल तर मी धडधडीत सांगतों कीं, माझ्यासारख्या एखाद्या मर्त्य माणसाच्या धाकांत वागण्यासाठीं जगावें, हें कांहीं बोवा आपणाला पसंत नाहीं. ' केशियस याचें हें भाषण ब्रूटस याला पटलें. तथापि विनयानें तो ह्मणालाः- ' तूं ह्मणतोस तसे गुण माझ्या ठिकाणीं आहेत, असें कांहीं मला वाटत नाहीं. ' त्यावर केशियस यानें त्यास थांबवून आपलें भाषण पुढें चालविलें. तो ह्मणालाः—" असें कां बरें ? कोणत्याही बाजूनें पाहिलें तरी तुमची योग्यता कांहीं कमी नाहीं. खरें ह्मणाल तर जन्मतः सीझराप्रमाणेंच मीही स्वतंत्र आहें, आणि तुम्हीही स्वतंत्र आहां. आपण लहानाचे मोठे झालों आहों ते सीझराप्रमाणेंच झालों आहों. आपणही त्याच्याप्रमाणेंच थंडीवाऱ्याची पीडा सहन करूं शकतों. एकदां जबरदस्त तुफान झालें, व टायबर नदी महापूरानें तुडुंब भरून चालली होती. तेव्हां सीझरनें मला ह्मटलें:- मित्रा, या महापुरांत उडया घालून पलीकडे पोहून जाऊं, येतोस का? त्यानें मला असें आव्हान केलें मात्र तोंच, माझ्या अंगांत कपडे होते त्यांसकट मी त्या पुरांत उडी टाकिली, व त्याला हाक मारून ह्मटलें ' ये माझ्या मागोमाग ये ' आणि तोही मागोमाग आलाच. केवढा जबरदस्त तो पूर ! आणि

केवढी भयंकर त्याची गर्जना ! त्याकडे काडीमात्र लक्ष न देतां, आह्मीं आवेशानें पाणी तोडित चाललों. पण ठिकाणावर पोंचलों नाहीं तोंच सीझर घाबरला व एकदम ओरडून ह्मणाला, 'मित्रा बुडालोंरे बुडालों, हात दे' त्याबरोबर मी चटकन त्याजपाशीं गेलों, आणि थकून गेलेल्या सीझरला वांचविलें. पण कसा न्याय आहे पहा. तोच सीझर आज जसा देव होऊन बसला आहे. आणि या केशियसकडे सहज नजर टाकण्याची त्याची मर्जी झाली, तर लागलीच जसा एखाद्या क्षुद्र माणसानें केला पाहिजे, तसा मीही त्याला लवून मुजरा केला पाहिजे ! अशी पाळी तूर्त आली आहे. फार काय सांगूं ? स्पेन देशामध्यें एकदां त्याला ताप लागला, आणि त्या तापांतच वायु होऊन, त्याची ह्मणजे हल्लीं जो एक मोठा देव होऊन बसला आहे त्याची बरें ! —त्यावेळीं कोण त्रेधा उडून गेली. अहो, त्याचे ओंठ पांढरे फटफटीत पडले होते, आणि ज्या वक्र दृष्टीच्या भीतीनें आज सारें जग कांपत आहे, तीच त्याची दृष्टी अगदीं निस्तेज होऊन गेली होती. --हल्लीं ज्याच्या जिव्हेनें उच्चारिलेले अहंमन्यतेचे हुकूम शिरसावंद्य मानण्याला कित्येक रोमन लोक तयार असतात, आणि ज्याच्याकडे ते अत्यंत उत्सुक नजरेनें पहात रहातात, व ज्याचीं भाषणें आपल्या टिपणवहींत ते लिहून घेतात, ती त्याची जिव्हा त्यावेळीं मृतप्राय माणसाप्रमाणें केवळ लुळी झाली होती, व त्याच्या त्या तोंडांतून कण्हणें व विवळणें

चाललें होतें--तें मी या माझ्या कानानीं ऐकलें आहे बरें ! तेव्हां एखाद्या पोरीप्रमाणें तोंड वेंगाडून तो मला ह्मणाला, ‘अरे माझ्या जिभेला अतिशय कोरड पडली आहे, थोडें पाणी तरी देरे ! ’ ईश्वरा ! असल्या क्षुद्र माणसानें आम्हां सर्वांवर सत्ता गाजवावी, आणि सर्वांच्या अगोदर एकट्यानेंच सर्व पृथ्वीभर पसरलेली राज्यलक्ष्मी कायमची बळकावून बसावें हें आश्चर्य नाहीं काय ? ” यांत सत्यापेक्षां मत्सरबुद्धिच व्यक्त होत असल्यामुळें विचारी मनुष्यांच्या दृष्टीस केवळ अग्राह्य समजलें पाहिजे, हें उघड आहे.

तथापि यावर ब्रूटस मान डोलवून उत्तर करतो, ‘ मित्रा, तूं ह्मणतोस तें अगदीं खरें आहे. तूं वर्णिलिस तशी स्थिती या नगरास सध्यां प्राप्त झाली आहे खरी. तिचा विचार केला असतां मला तर असें वाटतें कीं, रोमनगरचा एक शूर पुत्र ह्मणवून घेण्यापेक्षां, हा ब्रूटस धनगर ह्मणवून घेण्यालाही तयार आहे!’

इतकें भाषण झाल्यावर केशियस यानें ब्रूटस याचा निरोप घेतला. आपल्या भाषणानें ब्रूटस याच्या मनांत काहीं एकप्रकारची जागृती उत्पन्न झाली, हें पाहून त्याला बरेंच समाधान वाटलें. आणि ही आनंदाची गोष्ट तत्काळ त्यानें आपल्या मित्रमंडळीस जाऊन कळविली, तेव्हां त्यांस ही मोठी उमेद आली. मग ज्या दिवशीं सीझर कॅपिटोल सभागृहामध्यें यावयाचा होता, त्याच दिवशीं तो आल्या-

वर सर्वांनीं मिळून सभागृहांत जावें, व भरसभेंत त्याजवर हात टाकून, त्याचा वध करावा असें सर्वांनुमतें ठरलें.

सीझर हा एक मोठा अलौकिक मनुष्य होऊन गेला यांत शंका नाहीं. ज्या दिवशीं त्याचा वध व्हावयाचा त्या दिवशीं, किंबहुना त्यानें राजमुगुट स्वीकारण्याचें मनांत आणलें त्या दिवसापासूनच अनेक दुश्चिन्हें दिसूं लागलीं, व अपशकुन त्याला होऊं लागले. तेणेंकरून, सीझर एवढा बलाढ्य व शूर व धैर्यवान खरा, तरी त्याचेंही मन यावेळीं कच खाऊं लागलें. तो,अपशकुनांवर व भविष्यवाद्यांच्या भविष्यांवर विश्वास ठेवणारा नव्हता; व आपण विश्वास ठेवित नाहीं असेंही तो बाहेरून दाखवी. पण ह्मण आहेना, 'जो खाई त्याला खवखवे' तिला अनुसरून आपण करित आहों काय, याविषयीं त्याचें मनच त्याला खाऊं लागलें असें ह्मटलें पाहिजे. त्याची पत्नी.-ती बापडी कॅल्पर्निया ! तिच्या मनाला तर, अशा स्थितींत या दुश्चिन्हांनीं इतकें घेरलें कीं तिला दुष्ट स्वप्नें पडूं लागलीं. एके रात्रीं तिनें स्वप्नामध्यें सीझराचा पुतळा पाहिला, तों त्यांतून कारंज्याप्रमाणें शुद्ध रक्ताच्या शेंकडों धारा वाहत असलेल्या तिच्या दृष्टीस पडल्या. त्या रक्तांत कित्येक उन्मत्त झालेले रोमन लोक आपले हात माखून घेत होते. आणि या गोष्टी ह्मणजे पुढें येणाऱ्या संकटांचीं पूर्वगामी चिन्हेंच होत अशी तिची समजूत झाली होती, कारण हे निव्वळ अपशकुन होत असेंच तिच्या मनानें घेतलें आणि या अपशकुनांनीं तिचें मन एवढें गांगरून गेलें, व ती

येवढी शोकाकूल झाली कीं, सृष्टींत स्वाभाविकपणेंच रोजच्याहून वेगळ्या ज्या ज्या गोष्टी घडून आल्या त्या सर्व तिला विपरीत भासूं लागल्या आणि काय चमत्कार सांगावा? सीझर यानें ज्या दिवशीं राजमुगुट स्वीकारण्याचें निश्चित केलें, त्या सुमारास पराकाष्ठेचा पाऊस पडला व प्रचंड तुफान झालें; हें तर काय पण, किती वेळपर्यंत बरी प्रचंड गडगडाट चालला होता, आणि आकाश काळ्याकुट्ट ढगानीं भरून विजांचा सारखा चकचकाट चालू होता. ह्या सर्वांचा परिणाम कोणाच्याही मनांत भय उत्पन्न करील असाच होण्यासारखा होता, मग कॅल्पर्नियेसारख्या भाभड पण धोरणी अबलेला त्यांचें भय वाटलें, यांत काय नवल ! याशिवाय अशाच प्रकारच्या आणखीही कित्येक चमत्कारिक चमत्कारिक व विस्मय वाटण्यासारख्या गोष्टिही घडून आल्याचें तिच्या कानावर आलें. तेव्हां त्या लक्षांत आणून सीझर यानें वाड्यांतून बाहेर आऊं नये असा हट्ट धरला. कारण ती ह्मणाली:–' आपण शेंकडों विचित्र गोष्टी ऐकिल्या व पाहिल्याही; पण त्या कांहींच नव्हत अशा कांहीं भयंकर गोष्टी पहारेकऱ्यानें पाहिल्याचें तो सांगतो. अहो ! भरस्त्यांत एक सिंहीण व्याली आहे, थडगीं दुभंगलीं आहेत व त्यांतील मृत माणसें मोकळीं झालीं आहेत; रणभूमीवर आपलीं सैन्यें व्यवस्थित रीतीनें उभीं करून, भीषण स्वरूपी कोणी वीर मेघ मंडळामध्यें युद्धाला सिद्ध झाले आहेत व पुढें त्या युद्धांत वाहूं लागलेल्या रक्ताचा वर्षाव कॅपिटोल सभेवर होत आहे;

युद्धांत सोडलेल्या अस्त्रांचा ध्वनि-प्रतिध्वनि हवेंत उडून दशदिशा दणाणवून सोडीत आहे, घोडे खिंकाळत आहेत, मृत झालेलीं माणसें कण्हत आहेत, आणि भुतें रस्त्यांतून किंकाळ्या फोडीत जात आहेत, असे अद्भुत प्रकार त्यानें आपल्या डोळ्यांनीं पाहिले असें तोच सांगत आहे. ह्या गोष्टी आपल्या कल्पनेच्या पलीकडच्या नाहींत असें कोण ह्मणेल ? मला तर बाई त्यांची भारी भीति वाटते."

अशाच प्रकारचा ग्रह कास्का याचाही झाला होता. तो सिसरो नांवाच्या आपल्या एका मित्रास सांगतो-"अहो, ही अचल पृथ्वी पहा कशी एखाद्या चलपदार्थाप्रमाणें डळमळूं लागली आहे ! अहो, प्रचंड झंझावातानें महान् महान् वृक्षांना उलथून पाड-णारीं भयंकर तुफानें मीं पाहिलीं आहेत; आणि भयानक गर्ज-नेनें मेघांनीं समुद्राला भयभीत करून सोडावें, व उलटपक्षीं खवळून गेलेल्या समुद्रानें फेनयुक्त प्रचंड लाटांच्या प्रहारानें मेघांना जर्जर करून टाकावें अशी तऱ्हा मीं पाहिली आहे, पण वैश्वानराचा वर्षाव करणारें तुफान या घटकेपर्यंत मीं पाहिलें नव्हतें. मला तर वाटतें, स्वर्गांत देवांचें परस्परांशीं युद्ध चाललें असावें; किंवा उन्मत्तपणानें वागणाऱ्या या जगांतील लोकांनीं देवांना कोपविल्यामुळें तेच जगाच्या संहारास प्रवृत्त झाले असावे."

सिसरो याची दृष्टि मात्र या बाबतींत वेगळ्या प्रकारची

होती. त्याला त्या गोष्टींत कांहींच विस्मयकारक वाटलें नाहीं, ह्मणून तो ह्मणाला- "यांत काय आहे ! तरी सध्यांचा काल विपरीत आला आहे हें मात्र खरें आहे."

ह्यावर कास्का आश्चर्ययुक्त मुद्रेनें ह्मणतो "अहो, विपरीत काल आणखी कसा असतो? फार काय सांगूं?-कोणी यःकश्चित् गुलाम, तो नेहमींचा आपल्या ओळखीचा-त्यानें अग्नींत आपला हात असा लांब करून धरिला होता, आणि दहावीस मशालींप्रमाणें तो पेटून त्यांतून ज्वाला निघत होत्या, तरी त्याची त्याला शुद्धि नव्हती; बरें त्याचा तो हात होरपळून जावा तोही गेला नव्हता. शिवाय कॅपिटोल वाड्यासमोर मला आतांच एक सिंह दिसला, तो माझ्याकडे गुरकावून पाहूं लागला, आणि मला कांहीं एक इजा न करितां तो क्रुद्ध दृष्टीनें माझ्याकडे पहात निघून गेला ! तेव्हांपासून मीं आपली तलवार काढली आहे, ती फिरून कशी ती म्यानांत घातली नाहीं. आणखी पुढेंही पहातों तों लगेच भयानें घाबरून गेलेल्या बायकांचा एक थवाच्या थवा माझ्या दृष्टीस पडला. त्या सर्व भीतीनें गांगरून गेल्या होत्या. त्याही मला सांगूं लागल्या कीं किती तरी माणसें आगींतून चालून जातांना आम्हीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलीं ! आणि काल भर दिवसा कोंहो घुबड आपल्या बाजारच्या जागीं बसून, मोठमोठ्यानें रडत होतें. तेव्हां आतां इतके चमत्कार-अपशकुन एकाच वेळीं

घडून आल्यावर, ते अमक्या अमक्या कारणांनीं घडले असें कोण ह्मणेल ? तेव्हां हे चमत्कार अमक्यानें केले असें न ह्मणतां, निसर्गगुणानेंच घडून आले हें उघड आहे. कारण मला तर वाटतें, हे सर्व अपशकुन पुढें येणाऱ्या आपदेचे सूचक होत. "

यावर केशियस त्याला हंसून ह्मणालाः—"पृथ्वीच्या पाठीवर किती पाप भरलें आहे व किती अन्याय चालला आहे तो तुला ठाऊक आहे का ? तो ज्यांनीं पाहिला असेल, त्यांना अशा चमत्कारांचें कांहींएक वाटणार नाहीं. मीं तर याहुनही भयंकर अद्भुत चमत्कार पाहिले आहेत. "

यावर कास्का त्याला ह्मणतोः—'बाबारे ! असें मला भलभलतें बोलूं नको, देवांना क्रोध येईल !'

तेव्हां केशियस तिरस्कार दाखवून ह्मणतोः- " अहारे दगड्या, तूं किती मंदबुद्धि आहेस ! अरे, रोमन मनुष्यामध्यें जिवंतपणाचा जो गुण व जें ज्ञान असावयाचें, त्याचा तुझ्या ठिकाणीं शेषही दिसत नाहीं, किंवा त्याचा तूं उपयोग करीत नाहींस. कारण, तूं पहात आहेस त्या ईश्वरी क्षोभाच्या गोष्टी, ईश्वरानें केवळ रुष्ट होऊन सृष्टिक्रमांत गडबड उडवून दिल्यामुळेंच झाल्या आहेत. पण हे अग्निप्रलय, हीं इकडून तिकडे संचरणारीं पिशाच्चें, पशुपक्षी हे सर्व आपापले नैसर्गिक स्वभाव सोडून कां वागत आहेत हें तुला कळलें का ? मी तर ह्मणतों, ईश्वरानेंच या सर्वांमध्यें ही अस्वाभाविक प्रेरणा मुद्दा-

मच उत्पन्न केली आहे, व तेणेंकरून पुढें प्राप्त होणाऱ्या भयंकर संकटांचीं कारणें तो सिद्ध करून ठेवीत आहे."

याप्रमाणें सृष्टीच्या व्यापारांत दिसून आलेल्या चमत्कारांची विल्हेवाट लावून, केशियस आपल्या मनांतील मुख्य मुद्याकडे वळतो. तो पुढें म्हणालाः—' पण विजा चमकविणारा, मेघगर्जना करणारा, मेलेल्या माणसांना पिशाचरूपानें पृथ्वीवर संचार करावयाला लावणारा, कॅपिटोलमधील सिंहाप्रमाणें गर्जना करणारा आणि भयप्रद रात्रीशीं ज्याचें साम्य आहे, असा एक मनुष्य आहे, त्याचें नांव मी तुला सांगूं काय ? तो मनुष्य स्वतःच्या कर्तृत्वानें तुझ्यापेक्षां किंवा माझ्यापेक्षां कांहीं मोठा जबरदस्त आहे असें नाहीं. पण सध्यां त्याचें विलक्षण प्रस्थ माजल्यामुळें, आजच्या या भयानक रात्रीं होणाऱ्या भयंकर उत्पातांप्रमाणें तो कसा अगदीं भयंकर वाटत आहे ! '

यावर कास्का ह्मणतोः-' तो कोण ? सीझर कीं काय ? '

केशियस डोळे मिचकावून उत्तर देतो-'असेल कोणी तरी.'

केशियस यानें ज्याचें वर्णन केलें तो रोमन मनुष्य सीझर हाच होय, ही गोष्ट कास्का याच्या तत्काल लक्ष्यांत आली आणि त्याचा भ्रम नाहींसा होऊन, तो शुद्धीवर आलासें दिसलें. आणि तो म्हणालाः—' मी समजलों, आपणावर संकट

तर मोठें आलें आहे, त्यांतून सुटण्याचा उपाय आपण केला पाहिजे.'

पुढें जें भाषण झालें त्यावरून दोघांचे विचार एक झाले; व पुढें काय करावयाचें, त्याचा विचार करण्याकरितां रोम-नगरची बरीच मंडळी ब्रूटस याच्या वाड्यांत जमणार होती, त्या वेळीं आपणही जावें असें त्यांनीं ठरविलें.

नंतर जमावयाची ती मंडळी जमल्यावर, असा प्रश्न निघाला कीं, सीझर यानें राज्यपद स्वीकारून, आपणा सर्वांस गुलामगिरीच्या स्थितीस नेऊन मिळविलें, हें बरें झालें काय? या प्रश्नावर बरीच चर्चा होऊन, सर्वांचा असा विचार ठरला कीं, सीझर याचा वध झाल्यावांचून हें संकट टळणार नाहीं. यास्तव त्याचा वध करून, स्वातंत्र्याची पुन्हां प्राप्ति करून घ्यावी. या कार्यांत कोणीही माघार घेऊं नये; एकदिलानें सर्वांनीं इष्ट कार्य सिद्धीस न्यावें, व तें नेण्यांत विघ्न येऊं नये, ह्मणून हा बेत कोणींही फोडूं नये अशी सर्वांनीं आणभाक करावी.

आणभाक करून शपथ घेण्यासंबंधानें ब्रूटस याचें ह्मणणें वेगळें पडलें. तो म्हणाला, "अशी शपथ वाहण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण आपण जी गोष्ट करीत आहों ती चांगली आहे, अशी जर आपली खात्री आहे, तर ती करण्याकरितां शपथ घ्यावयाला ती कशाला हवी? चांगल्या कामांत जर आपणास

एक होतां येत नाहीं,व त्यासाठीं शपथा घेण्याचें अगत्य जर वाटत आहे, तर मग हा खटाटोप मुळीं करतां कशाला ? घरीं निघून जावें आणि ताणून निजावें, हें बरें नाहीं काय? मग जें व्हावयाचें असेल, तें ज्याचा त्याच्या दैवानुसार त्याचें होईल, असें ह्मणून स्वस्थ बसावें." या भाषणानें जमलेली मंडळी चुप झाली. तथापि त्यांची चित्तवृत्ति स्वस्थ झाली असें मात्र दिसलें नाहीं. हें पाहून ब्रूटस पुढें म्हणाला:- "पण मित्रहो, तसें नाहीं; मला खास वाटतें कीं, भित्र्यांचीं मनें देखील प्रक्षुब्ध व्हावीं, आणि स्त्रियांच्या कोमल हृदयांत देखील शौर्य उत्पन्न व्हावें, असा कांहीं विलक्षण तेजस्वी गुण आपण हातीं घेतलेल्या कार्यांत आहे; आणि हा गुण जर त्या कार्यांत आहे, तर मग हे देशबांधवहो, प्रतिकार करण्याच्या कामीं अन्य गोष्टींची टोंचणी लावून घेण्याचें आपणाला काय प्रयोजन आहे ? एकदां वचन दिलें म्हणजे दिलें, मग रोमन गृहस्थ तें कधींही मोडावयाचा नाहीं. असें असतांना आपल्याला अंगीकृत कार्यामध्यें दुसऱ्या कोणत्या बंधनाची जरूरी आहे ? आणि आह्मीं अमुक कृत्य करूं असें ह्मटलें, एवढेंच नाहीं तर त्यांत आपला शेवट झाला तरी बेहेत्तर असेंही आश्वासन देऊन सांगितलें-असें भाषण सज्जन ह्मणविणाऱ्या एका रोमन गृहस्थानें सज्जन ह्मणविणाऱ्या दुसऱ्या रोमन गृहस्थाशीं केलें, तर पुरे झालें नाहीं काय ? आणखी शपथ ती कशाला

हवी? शपथा वहात बसणें, भटाभिक्षुकांचें, क्लीबांचें, शठांचें ज्यांच्यामध्यें वीर्याचा अभाव झालेला आहे असल्या दुर्बळांचें व अन्याय सोसण्याचें अंगवळणीं पडून गेल्यामुळें, जे कोण-त्याही जुलुमाला नेहमीं आपण होऊन पाचारण करितात, असल्या लोकांचें हें काम. यांत शपथेच्या बंधनाची अट घालून, अशा श्रेष्ठ कार्याला काळीमा लावूं नका,—मनाला उन्नति देणारा त्यांतला गुण काढून टाकूं नका, व हिंमत खचवूं नका. कारण असें कराल तर तुम्हीं आपल्याच तोंडानें आपल्या कर्माची निंदा केली, असें होईल. आपण जें एकदां बोललों, त्यांतून एक अक्षरही जर अपूर्ण राहिलें, किंवा खोटें ठरलें, तर ज्या रोमन रक्ताच्या शुद्धत्वाविषयीं आपणा सर्वांना मोठा अभिमान आहे, त्या रोमन रक्तापासून हा भिन्न रक्ताचा आहे, अर्थात् हा दोषी व पापी आहे असेंच म्हणावें लागेल."

एकंदरीनें पाहातां, जमलेल्या मंडळीमध्यें आपण रोम नगरचे आहों, या गोष्टीचा मोठा अभिमान उत्पन्न झाला असें दिसलें. त्याचप्रमाणें कोणतेंही नीच कृत्य आपल्या हातून होऊं द्यावयाचें नाहीं, असाही त्यांनीं निश्चय केला. जें वधाचें कृत्य करण्यास ते उद्युक्त झाले होते, त्यांत पाप नव्हतें, त्यांत स्वार्थबुद्धि नव्हती, किंवा मत्सराचा गंधही नव्हता, अशी त्यांची खात्री होती. केवळ सीझर राजा झाला असतां आपणावर गुलामगिरीचा शिक्का बसेल, अशा केवळ काल्प-

निक समजुतीनेंच ते सर्वजण हें कृत्य करण्यास उद्युक्त झाले होते, यांत शंका नाहीं. याचप्रमाणें सीझर याचा वध केल्या-वरून लोकापवादाचें दूषण आपणास लागूं नये, व तरुणपणच्या उच्छृंखलपणानें आपण कांहीं तरी केलें असेंही लोकांनीं ह्मणूं नये, अशी त्यांची फार इच्छा होती. व यासाठीं त्यांनीं थोरथोर लोकांस आपल्या कटांत ओढण्याची खटपट केली होती.

सिसरो नांवाचा वक्ता त्यावेळीं प्रसिद्ध होता, त्याला आपले कटांत घ्यावें कीं न घ्यावें, याविषयीं जमलेल्या मंडळींत बराच खल झाला; त्यांत मेटेलस ह्मणालाः–“ सिसरो याला आपल्यामध्यें घेतलेंच पाहिजे; कारण असें केलें म्हणजे लोक आपणाला नांवें ठेवणार नाहींत; किंबहुना वाखाणणीच कर-तील. मला तर वाटतें, तरुणपणच्या आपल्या उच्छृंखलपणावर त्याच्या गंभीर वृत्तीनें पांघरूण पडेल. आणि त्याच्याच आज्ञे-वरून आपण सर्व गोष्टी केल्या असें लोक ह्मणूं लागतील. ” या गोष्टीस ब्रूटस याची अनुमति पडली नाहीं. तो ह्मणालाः “ छे, छे, तें नाहीं कामाचें. त्याचें नांव अगदीं घेऊं नका. आपले बेत त्याला कळतां कामा नयेत बरें; कारण इतरांनीं आरंभिलेल्या कोणत्याही गोष्टींत तो शिरावयाचा नाहीं. ”

यानंतर सीझरचा मित्र ॲन्टनी याचें नांव निघालें. केशि-यस यानें स्पष्टपणें आपलें मत मंडळीस सांगितलें. तो ह्मणालाः ‘ सीझरचा अत्यंत प्रिय मित्र ह्मटला ह्मणजे मार्क ॲन्टनी–मग

त्यास तरी मागें ठेवून काय करावयाचें आहे?-- त्यानेंही मागें रहावें असें मला वाटत नाहीं.--पक्का आंतल्या गांठीचा आहे बरें. पक्कें लक्षांत ठेवा कीं, आपण काय करणार आहों, कसें करणार आहों, कशा रीतीनें करणार आहों, या गोष्टींचा वास जर का त्याला लागला, तर त्याचा छडा तो आपल्यापर्यंत आणून पोंचवील, आणि मग आपणास जड गेल्यावांचून रहाणार नाहीं. हा त्रास चुकवावयाचा असेल, तर मी म्हणतों कीं, सीझराबरोबर त्यालाही लोळवावें म्हणजे झालें. ''

परंतु ब्रूटस यास केशियस याचें हें मत मान्य झालें नाहीं. आपल्या करणीपासून कोणाचाही छळ होईल तर ती त्यास मान्य नव्हती--जें कृत्य करणें तें मर्दुमकीनें करावें, त्यांत भ्याडपणाचा गंधही असूं नये, असा त्याच्या वर्तनांत त्याचा कटाक्ष असे. यास्तव केशियस याच्या भाषणाचा निषेध करून तो म्हणालाः--' आपण घातकीपणाचें कृत्य करूं नये. अगोदर डोकें उडवावयाचें आणि मागाहून एकेक अवयव तोडावयाचा--हें खाटकाचें काम, तें आपण पत्करून क्रोधानें सीझरला अगोदर ठार केलें आणि लगेच त्याच्या अनुयायी मनुष्यालाही उडविलें तर, हें तसेंच झालें नाहीं काय ? कारण ॲन्टनी हा त्याचा अवयवच आहे. तेव्हां खाटीक म्हणवून घेण्यापेक्षां, सत्कार्यासाठीं देवतांस बळी देणारे उपासक ह्मणवून घेणें बरें नव्हे काय ? आपण जें हत्यार उपसलें आहे तें केवळ

सीझराचा प्रभाव म्हणजे सीझरशाही नाहींशी करण्याकरितां उपसलें आहे; इतर साधारण माणसांना नाहींसें करण्याकरितां नव्हे. खरोखर, सीझर याचें शरीर छिन्नभिन्न न होतां, त्याची तेजस्विता मात्र लोपवून टाकतां येईल तर किती बरें होईल ? ' येथें हा वाद मिटला.

पण दुसरे दिवशीं सीझर कॅपिटोल सभेमध्यें येईल किंवा नाहीं, व न आला तर काय करावयाचें, हा प्रश्न निघाला. त्यासंबंधानें केशियस ह्मणालाः-" पण आज सीझर बाहेर पडेल कीं नाहीं याची शंका वाटते. कारण अलीकडे ते अगदीं थोतांड माजविणारा व अधार्मिक असा होत चालला आहे. रात्रीं जीं भयानक दुश्चिन्हें आपण पाहिलीं, तशीं पूर्वीं कधींही कोणाच्या पाहण्यांत आलीं नसतील; त्यामुळें व शकुन सांगणाऱ्याच्या भाषणावरून, तो उद्यां कदाचित् कॅपिटोलकडे येणारही नसेल. " पण यावर डेशियस आवेशानें सर्वांस धीर देऊन म्हणालाः " त्याची तर तुम्हांला मुळींच धास्ती नको. त्याचा जर असा बेत ठरला असला, तर मी तो फिरवून टाकीन. अहो ! झाडाच्या आड उभें राहून गेंड्यांना, आरशाच्या योगानें अस्वलांना, खळगे खणून ठेवून हत्तींना, जाळ्याच्या योगानें किंवा पिंजऱ्याच्या योगानें सिंहांना, त्याचप्रमाणें तोंडपुजे-पणानें कुरेंबाज माणसांना सहज फसवितां येतें. आतां अशा प्रकारच्या गोष्टी ऐकण्याची त्याला फार हौस आहे, तेव्हां

'आपण तोंडपुजांचा तिरस्कार करतां' असें जेव्हां मी त्याला सांगतों, तेव्हां 'होय, मी तसें करतों खरेंच.' असें त्यावर तो ह्मणतो. पण असें म्हणतांनाच मुळीं तोंडपुजेपणाला भुलून कसा फसतो हें त्याला कळत नाहीं. तेव्हां या बाबतींत मी आपला उद्योग सुरू ठेवितों, हें माझें काम आहे." परंतु पुढें बराच वादविवाद होऊन असें ठरलें कीं, सर्वांनीं मिळूनच सीझर याच्या घरीं त्याला आणण्याकरितां जावें.

इकडे कटवाली मंडळी जी ब्रूटस याच्या वाड्यांत जमली होती, ती घरोघर निघून गेली. परंतु ही कसली गडबड आहे, अशी शंका ब्रूटस याची स्त्री पोर्शिया इच्या मनांत उद्भवल्यावांचून राहिली नाहीं. मंडळी निघून जातांच, तिनें ब्रूटस यास मोठ्या नम्रपणें प्रश्न केला कीं, 'महाराज, आज ही कसली गडबड आहे? कांहीं गुप्त गोष्ट असली तर ती मला समजूं नये काय? मी स्त्री आहें,-नाहीं ह्मणत नाहीं. तरी पण ब्रूटस-महाराजांनीं भार्या म्हणून जिचा अंगिकार केला आहे, अशी स्त्री मी आहें. महाराज, मी एक अबला आहें हें तर खरेंच, तरीही पण मी केटोची कन्या आहें. आणि सद्गुणी म्हणून माझी सर्वत्र ख्याति आहे. अशा गृहस्थाच्या पोटीं जन्म घेतला असून, व आपल्यासारख्या गृहस्थानें माझें पाणिग्रहण केलें असून, माझ्याबरोबरीच्या इतर अबलांहून मी फार श्रेष्ठ आहें, असें आपल्याला वाटत नाहीं काय? म्हणून मी म्हणतें कीं,

आपले जे बेत असतील, ते आपण बिनदिक्कत मला सांगावे, ते मी कोणाला कळू द्यावयाची नाहीं.'

पोर्शिया ही एक अत्यंत सद्गुणी म्हणून गाजलेली स्त्री होती. व यामुळेंच आपले पतीशीं तिचें फार वजन होतें. यास्तव तिच्या प्रश्नाला एकाएकीं त्याच्यानें झिडकारतां आलें नाहीं, व तिचें समाधान कसें करावें हें त्याला एक संकट येऊन पडलें. ती जशी सद्गुणी होती तशीच धूर्त होती. आपल्या पतीचें चित्त ठिकाणावर नाहीं ही गोष्ट तत्काळ तिच्या लक्षांत आली. आणि जों जों ती त्याजकडे लक्ष लावून पाहूं लागली तों तों त्याच्या वर्तनांत फरक पडला आहे, असें तिला आढळून आलें. तेव्हां ती त्यास ह्मणाली:–' काल रात्रीं पाहिलें तों जेवणाच्या वेळींही आपण एकाएकीं मधूनच उठलां, व छातीवर आपले हात असे धरून, आपण विचारांत निमग्न झालां, व उसासे टाकीत इकडून तिकडे हिंडूं लागलां; आणि असें कां करतां ह्मणून त्या वेळीं मीं आपल्याला विचारिलें, तेव्हां आपण माझ्याकडे नुसतें रागानें पाहूं लागला. पण त्या वेळीं आपण आपलें मस्तक खाजविलें, व अतिशय उत्कंठेनें पाहून आपण जोरानें पाय आपटला. इतकें झालें तरीही मीं पुन्हां आपल्याला आग्रहानें विचारिलें असतां, आपण कांहीं एक उत्तर न देतां, रागानें मला झिडकारल्यासारखें करून मीं तेथून निघून जावें म्हणून हातानें खूण केली.

मग आपला राग कदाचित् अतिशयच विकोपाला जाईल अशा भीतीनें मी तेथून निघून आलें. पण माणसाची प्रकृति कधीं कधीं कारणावांचूनही अतिशय तापते; तशीच आपलीही तप्त झाली असेल असें त्या वेळीं मला वाटलें. असला राग आपल्याला खाऊं देणार नाहीं, बोलूं देणार नाहीं, कीं झोंपही घेऊं देणार नाहीं. अशा रागानें आपल्या मनाला जसें व्यापिलें आहे, तसाच आपल्या शरीरावरही जर त्याचा परिणाम झाला, तर महाराज, माझ्यानें बाई आपल्याला ओळखवणार देखिल नाहीं; म्हणून म्हणतें, 'प्राणनाथ, आपण मला आपल्या दुःखाचें कारण काय तें कळूं द्यावें!' यावर ब्रूटस यानें इतकेंच मोघम उत्तर दिलें कीं, 'माझी प्रकृति बरी नाहीं.' तेव्हां त्या धूर्त स्त्रीनें म्हटलें कीं, 'आपली प्रकृति बरी नसेल, पण रात्रीं कोण अनोळखी गृहस्थ आपल्या इकडे आले होते, व गडबड कसली चालली होती?' यावर ब्रटस यानें कांहीं तरी टाळाटाळीचें उत्तर दिलें. तें ऐकून ती ह्मणाली:–'तुमचें मजवरील प्रेम कमी झालें आहे, असें यावरून ह्मटलें पाहिजे. नाहीं तर कोणतीही गोष्ट मजपासून लपविली नसती. मी आपले बेत कोणास कळवीन अशी धास्ती आपणास नसावी. माझ्या सोशिकपणाचें प्रत्यंतर आपणास ठाऊक आहेना? मीं स्वतःच माझ्या हातानें या माझ्या मांडीला जखम करून घेतली असून, तुमच्या व माझ्यामधील ही गोष्ट तिसऱ्याचे कानीं जाऊं

दिली नाहीं.' याप्रमाणें त्यांचें भाषण चाललें आहे इतक्यांत कोणीं दार ठोठावलें, आणि लगेच कटवाल्यांपैकीं एक इसम ब्रूटस यास भेटावयास आल्यामुळें त्यांचें बोलणें येथें थांबलें.

दुसरे दिवशीं कॅपिटोल सभागृहामध्यें सदस्य मंडळी जमली. व बराच वेळ झाला तरी सीझर आला नाहीं असें पाहून याला आणावयाकरितां ह्मणून कटवाल्यांपैकीं कांहींजण त्याच्या घरीं गेले. त्यांस पहातांच सीझरच्या चित्तालाही स्फुरण चढलें व तो त्यांजबरोबर यावयास सिद्ध झाला.

मग सीझरसहित सर्वजण कॅपिटोल सभागृहांत आल्यावर, सीझर सिंहासनरूढ झाला, व त्याजपुढें अर्जदार लोक येऊन त्यांनीं आपापले अर्ज रुजू करण्यास सुरुवात केली. त्यांच्यांत मेटेलस सिंबर यानें आपला अर्ज पुढें आणला. सीझर यानें त्याच्या भावाला हद्दपारीची शिक्षा केली होती, ती माफ व्हावी ह्मणून हा अर्ज होता. तो अर्ज पहातांच सीझर यानें झिडकारून त्याला सांगितलें कीं:–' मीं जो हुकूम एकदां केला तोच कायम; तो फिरावयाचा नाहीं. एक वेळ ध्रुवाचा तारा ढळेल, पण माझा निश्चय कधीं ढळावयाचा नाहीं.' यावर ब्रूटस सीझरला ह्मणालाः–' हे महाबाहो सीझर! याच्या भावास परत बोलाव, व त्याला त्याच्या अपराधाची क्षमा कर.' ब्रूटस याचें बोलणें सीझर यानें अमान्य केलें. त्याचप्रमाणें आणखी कित्येकजणांनींही विनवण्या केल्या, त्या अ-

मान्य झाल्या. असें पाहून कास्का यास मोठा आवेश आला व त्याच्या भरांत तो म्हणालाः—‘ या अर्जाचा निकाल माझे हातच करतील. ’ असें ह्मणून त्यानें आपल्या कट्यारीनें सीझरवर एक जबरदस्त घाय केला. लगेच ब्रूटस यानें व ब्रूटस याच्या मागून बाकीच्यांनींही त्याजवर घाय केले. ब्रूटस हा आपला प्रिय मित्र, तोही आपणावर फिरला असें जेव्हां सीझर यानें पाहिलें, तेव्हां तो घाबरला, त्याचे हातपाय गळाले, आणि झग्याखालीं आपलें तोंड गुरफटून घेऊन, जेथपावेतों रक्ताचा लोट वहात गेला होता, अशा त्या पॉम्पीच्या पुतळ्याच्या पायथ्याशीं गडगडत जाऊन, तो धाडकन् पडला !

याप्रमाणें बलिष्ट सीझराचा दुःखकारक अंत झाला. त्याबरोबरच जगांतून पारतंत्र्याचा व जुलुमाचा अंत झाला, असें क्षणभर कटवाले मंडळीस वाटलें. पण हा त्यांचा केवळ भ्रम होता ! सीझर याच्या बाजूची मंडळीही बरीच होती, तिला कटवाल्यांच्या या खुनी कृत्याचा त्वेष आला व त्यांनीं सूड उगविण्याची खटपट चालविली. एके पक्षाला कटवाल्यांपैकीं ब्रूटस व केशियस हे दोघे प्रमुख होते. उलटपक्षाला ॲन्टनी हा मुख्य असून, त्यानें ऑक्टेव्हियस सीझर व लेपिडॅस यांना आपल्या पक्षाला मिळवून घेतलें.

मग या तिघांनीं रोम नगरांतील लोकांस उत्तेजित करून, त्यांचीं मनें कटवाल्यांचा सूड घेण्यास प्रवृत्त केलीं. कोणालाही

काय, हत्या प्रिय नसते. सीझर याच्या हत्येमुळें लोकांचीं मनें अगोदरच द्रवलीं होतीं. तशा स्थितींत, आगींत तेल ओतल्या प्रमाणें तीं सूड घेणाऱ्या मंडळीच्या प्रयत्नानें एकदम भडकून गेलीं. तेव्हां ब्रूटस व केशियस यांस नगरांतून पळून जावें लागलें. नगरांत त्यांस कोठें थारा मिळेना. ते शहर सोडून निघाले, ते सार्डिस व फिलिप्पी या प्रांतांकडे गेले. तेथें त्यांच्या अधिकाराच्या नेमणुका होत्या. तेथें गेल्यावरही त्यांस सुरक्षितपणा वाटेना. ॲन्टनी हा लवकरच आपल्यावर चालून येईल, व त्यास रोम नगरच्या लोकांचें चांगलें पाठबळ मिळेल, अशी त्यांस भीति होती, ती खोटी नव्हती. ॲन्टनी याच्या सैन्यापुढें आपला टिकाव निघणार नाहीं, असेंही त्यांस वाटत होतें. पुढें लवकरच तसा प्रसंग आला, व त्यांस तोंड देण्यास ब्रूटस व केशियस यांनीं तयारी केली.

पण ह्मणतातना—कोणत्याही कार्यास विघ्नेंहीं पुढें पुढें करीत असतात. या अनुभवास अनुसरून, रोम नगरच्या स्वातंत्र्यरक्षणासाठीं ह्मणून, खुनासारखें भयंकर कृत्य करण्यास जे प्रामाणिक बुद्धीनें सिद्ध झाले, व पुढें त्याचे दुर्धर परिणाम भोगावयास लागावयाचे, त्यांचा प्रतिकार करण्यासही जे एकदिलानें सिद्ध झाले, त्यांच्या आपापसांत कलागति सुरू झाल्या. त्यांतही ब्रूटस व केशियस या दोघां प्रमुख कटवाल्यांचें भांडण विशेष महत्वाचें होतें. ब्रूटस हा सुवि-

चारी व दयाशील ह्मणून नांवाजलेला होता. पण केशियस हा विशेष बाणेदार व व्यवहारचतुर होता असें ह्मणावयास चिंता नाहीं. केशियस याच्या सैनिकांनीं सार्डिस येथील लोकांवर जुलूम करून त्यांजपासून पैसे काढले, व या कामांत स्वतः केशियस याचेंही अंग होतें, ही गोष्ट ब्रूटस याच्या कानावर गेली, तेव्हां त्याला केशियस याचा फार राग आला. लवकरच या दोघांची समक्षासमक्ष भेट झाली, व त्या भेटींत ब्रूटस यानें केशियस याची चांगली कानउघाडणी केली. आणि केशियस याचा स्वभावही तापट असल्यामुळें त्यानेंही दोन कमीजास्ती उत्तरें देण्यास कमी केलें नाहीं. होतां होतां भांडण निकरावर आलें; परंतु ब्रूटस याचें मन थोर होतें. तसेंच त्याजकडे ज्येष्ठबंधुत्वाचें नातें असल्यामुळें त्यानें आलेल्या प्रसंगाकडे नजर देऊन माघार घेतली; व भांडण मिटविलें.

अगोदरच ब्रूटस याचें हृदय दुःखानें भरून गेलें होतें, व त्यांतच आणखी या कलहाची भर पडली असती तर परिणाम फारच वाईट झाला असता. आतां केशियस हा जरी कांहींसा तापट होता, तरी तितकेंच त्याचें मन मृदु होतें. यामुळें भांडण मिटतांच, त्यानें ममतेनें घराकडील समाचार काय ह्मणून चौकशी केली. तेव्हां ब्रूटस याची सुशील स्त्री पोर्शिया हिनें हाय हाय करून प्राण सोडला ही दुःखकारक

बातमी सांगणें ब्रूटस याला भाग पडलें. तेणेंकरून केशियस याला पराकाष्टेचा शोक प्राप्त झाला. आधीं क्रोधानें त्याचें मन जेवढें तप्त झालें होतें, तेवढेंच तें आतां मृदु झालें. व इतः-पर आपल्या वडील बंधूला न दुखविण्याचा त्याचा निश्चय झालासा दिसला.

मग अपरात्र झाल्यामुळें व दुःखाच्या तप्ततेमुळें त्यांचे घसे कोरडे पडले, त्यांस ओलावा आणण्याकरितां ह्मणून त्यांनीं मद्य मागविलें, व तें परस्परांच्या दुःखाचा विसर पडावा ह्मणून प्रेमभावानें प्राशन केलें. आणि विश्रांति घेण्याकारितां केशियस आपल्या तंबूंत निघून गेला.

याच रात्रीं केशियस निघून गेल्यावर सीझर याचें पिशाच्च ब्रूटस यास दिसूं लागलें. व त्यानें ब्रूटस यास बजावून सांगितलें कीं, 'मी तुला फिरून भेट देईन.' सीझर याच्या पिशाच्च-रूप दर्शनानें ब्रूटस याच्या मनावर काय संस्कार घडला असेल तो सांगतां येणें कठिण आहे. तथापि पिशाच्च पाहतांच त्याच्या सर्वांगाला घाम सुटला, व रोमांच उभे राहिले. मग धैर्यानें 'बरें आहे; भेट घे, मीही भेट देईन' असें उत्तर ब्रूटस यानें दिलें, तथापि त्याचें मन त्याला खात असल्याचें स्पष्ट दिसून आलें. पहा, हत्त्येचें पातक कसें घोर आहे तें !

पुढें लवकरच दोहों पक्षांकडून युद्धाची सिद्धता झाली. ब्रूटस आणि केशियस हे दोघेही आपापलीं सैन्यें घेऊन फिलिपी येथील सपाट मैदानावर उभे राहिले. प्रथम त्यांनीं जवळच टेंकड्या होत्या त्यांजवर चढून त्यांचा आश्रय केला. तिकडून आक्टेव्हियस वगैरे शत्रुपक्षाकडील सरदार येऊन मैदानावर दाखल झाले. त्यांस पाहतांच कटवालेही खालीं उतरून आले. मग दोहोंपक्षांकडील प्रमुखांचीं भाषणें करण्याची इच्छा दिसल्यावरून, त्यांनीं आपापले घोडे जवळ आणिले. ते जवळ येतांच ब्रूटस यानें प्रथम भाषणास सुरुवात केली. तो ह्मणाला, "आधीं शब्द आणि मागाहून ठोसे, हें असेंचना ?" आक्टेव्हियस त्याला ह्मणतो, "तुह्मांला शब्द प्रिय असतील आह्मांला ठोसेच प्रिय आहेत. अरे ब्रूटस, निष्ठुरपणें दुसऱ्यावर घाला घालतांना तूं चांगलें गोड गोड बोलतोस, नव्हे का ?" या प्रमाणें दोहोंपक्षाकडील महावीरांची परस्परांविषयीं उणीं उत्तरें चाललीं असतां दोन्हीं सैन्यें आपापलीं शस्त्रें बाहेर काढून लढूं लागलीं; त्यांत केशियस याच्या सैन्यानें जबर हल्ला करून सरशी केली, परंतु ब्रूटस यास माघार घ्यावी लागली. तेव्हां त्याचा काय समाचार आहे तो काढण्यासाठीं स्वार पाठविला. त्यास शत्रूंनीं पकडून घायाळ केलें. हा सर्व प्रकार केशियस टेंकडीवर चढून पाहात होता. इतक्यांत ॲन्टनी आपल्या लोकांसहित त्याच्या तंबूत येऊन दाखल झाला व लगेच

त्यानें तो घेरून घेतला. झालें, युद्ध आटोपलें ! पुढें केवळ शोधाशोध व धरपकड चालली; आणि तिकडे ब्रूटस व त्यांच्या पक्षाकडील लोकांस शत्रूंनीं पकडून कबज्यांत घेतलें.

आतां फारच थोडें सांगण्यासारखें राहिलें आहे. पकडल्या ठिकाणींच ब्रूटस वगैरे मंडळींनीं आपणास कसें मारून घेतलें व कोणीं तरी आपली हत्या करावी ह्मणून आपल्या नोकरां-च्या कशा विनवण्या केल्या—तो प्रकार ऐकून व पाहूनही कोणास त्या बिचाऱ्याची करुणाच येईल. सारांश ज्यांनीं ज्यांचीं सीझर याच्या वधांत पुढाकार घेतला किंवा त्यास परंपरेनें उत्तेजन दिलें त्यांचा असा अंत झाला !

---



कॅस्का--ॲन्टनीनें मुकुट त्याला देण्याकरितां पुढें केला. हो ! तो मुकुट कशाचा ? तें एक भिकार किरिट आणलें होतें कुठूनसें.

ज्यूलियस सीझर--अंक. १ प्र. २ पृ. २३

Art Printing Works, Fort.

(3)

# ज्यूलियस सीझर

या नांवाचें नाटक.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

स्थळः--रोमनगरामधील एक रस्ता.

( फॅलव्हियस, मॅरूलस, हे दोघे पुढारी आणि कित्येक सामान्य प्रतीचे लोक प्रवेश करतात ).

**फ्लॅव्हियस**—चला, चालते व्हा ! निरुद्योगी लोक हो ! घरोघर निघून जा. आज काय सणवीण आहे कीं काय? अरे, तुह्मी तर चांगले उद्योगधंदा करणारे दिसतां; मग अशा कामाच्या दिवशीं, हत्यारें पात्यारें न घेतां, खुशाल हात हलवीत, असे इकडून तिकडे भटकतां काय ह्मणून? [ जमावांतून एकजणाकडे बोट करून ] अरे ए ! तुझा कोणता धंदा ?

**एकजण**—कां बरें, महाराज ? मी सुतार आहें.

**मॅरूलस**—मग तुझें तें मळवस्त्र कोठें दिसत नाहीं ? आणखी तो तुझा गुण्याबिण्या कोठें आहे ? आज तूं हा चांगला पोशाख कां केला आहेस ? [ दुसऱ्या एकजणाकडे पाहून ] कायहो, तुमचा हो काय धंदा ?

**दुसराजण**—खरें सांगूं, महाराज, बरावाईट कसाही समजा, पण ज्याला तुह्मी साधारणपणें पट्टया देणारा ह्मणाल तसला मी एक आपला आहें.

**मॅरूलस**—अरे तुझा धंदा काय तो स्पष्ट सांग; सरळ उत्तर दे.

**दुसराजण**—धंदा होय, महाराज ? आपल्याला खरें सांगावयाला त्यांत लाजबीज कांहीं नाहीं; बिघडलेल्यांना तळ देऊन ताळ्यावर आणणारा मी एक आहें, महाराज.

**मॅरूलस**—ए गुलामा, तुझा धंदा सांगशील कीं नाहीं ? अरे हरामखोरा, मीं काय ह्मटलें ?

**दुसराजण**—हें पहा, महाराज, मेहेरबानी करून असे फाटूं नका; नाहीं तर मी चांगलें ठिगळ मारीन.

**मॅरूलस**—काय पाजी आहे हो ! अरे तूं ह्मणतोस तरी काय ? ठिगळ मारीन ह्मणतोस ?

**दुसराजण**—महाराज, जोड्याला पुस्ती मारीन ह्मणतों.

**फ्लॅव्हियस**—एकूण तूं चांभार आहेस तर ?

**दुसराजण**—होय महाराज, माझें पोट कायतें माझ्या आरीवरच भरतें. आरीवांचून भलत्यासलत्या कोणत्याही धंद्याच्या भानगडींत मी पडत नाहीं; म्हणजे, मी म्हणतों महाराज, आपणाला अेररावांची खटपट नको आणि अरीबाईची किंवा अगबाईचीही नको. आपली आरी बरी व आपण बरे ! खरोखरी महाराज, जुन्या जोड्यांचा मी एक आपला शस्त्रवैद्यच आहें म्हणाना. ते जेव्हां अतीशय बिघडतात तेव्हां मी त्यांना नीट करतों. रोमनगरींतील बहुतेक ऐटबाज लोकांचे जोडे मीच नीट केले आहेत.

**फ्लॅव्हियस**—बरें पण, आज तूं आपल्या दुकानांत रे कां बसला नाहींस? आणखी ह्या लोकांना रस्त्यांतून कोठें घेऊन चालला आहेस? ह्यांत तुझा हेतु काय ?

**दुसराजण**—काय म्हणजे, महाराज? त्यांचे जोडे अधिक झिजून फाटावे हा ! मग आपोआपच मला जास्त काम मिळेल. आतां खरें सांगूं, महाराज? सीझर महाराज जय मिळवून आले आहेत, तेव्हां त्यांचें दर्शन घ्यावें व आनंदानें त्यांचा जयजयकार करावा म्हणून आज आम्ही सुटी घेतली आहे.

**मॅरूलस**—मग त्यांत आनंद तो कसला? व जयजयकार

कशाचा करतां ? असा कोणता दिग्विजय करून तो आला आहे ? असे कोणते राजे पादाक्रांत करून त्यानें बरोबर आणले आहेत ? व युद्धांत जिंकलेले लोक तरी कितीसे रथाला बांधून आणले आहेत ? अरे टोणप्यानों, दगडानों, तुम्हांला कांहीं अक्कल तरी आहे ? अरे निर्दयानों, साऱ्या रोम नगरांत तुमच्या इतके पाषाणहृदयी कोणी नसतील ! कायरे, पाम्पी महाराजांची आठवण तुम्ही येवढ्यांतच विसरलां ? अरे, रोम नगरच्या रस्त्यांतून, पाम्पी महाराजांना मोठ्या कौतुकानें पाहण्यासाठीं तुम्ही सर्व लोक अनेक वेळां घरांच्या भिंतीवर, तटांवर, थोरल्या दरवाज्यावर, उंच उंच घुमटांवर, उंच उंच इमारतींच्या जाळ्यांतून,खिडक्यांतून,फार तर काय पण धुरांड्यांवरून सुद्धां, पोराबाळांना खांद्यावर घेऊन, सबंद दिवसाचा दिवस बसत नव्हतां काय ? आणि पाम्पी महाराजांचा विजयी रथ रस्त्यामधून चालला असतांना, तुम्ही सर्वजण प्रचंड जयघोषानें, ह्या रोम नगरींतून वाहणाऱ्या नदीचें खोल पात्र दणाणून टाकीत नव्हतां काय ? आणि तेच तुम्ही आज उंची उंची पोशाख अंगावर घालून नटलां आहां व हा मोठा सणाचा दिवस समजून, जिकडे तिकडे फुलें उधळीत, पाम्पी महाराजांच्या मुलांवर जय मिळविणाराचें तुम्ही थाटानें स्वागत करण्यास

:कार असो तुम्हांला ! चला एकदम

आपापल्या घरोघर चालते व्हा; तुमचा हा केवढा कृतघ्न-पणा ! ह्याचें फळ तुम्हांला निःसंशय भोगावें लागेल, तें न लागावें म्हणून वेळींच प्रायश्चित्त घ्या–परमेश्वराची प्रार्थना करा, त्याच्यापुढें गुढघे टेंका व नाकें घासा.

**फ्लॅव्हियस**—तर भले गृहस्थ हो ! चला, एथून चला, आणि तुमच्या हातून हा दोष घडला ह्मणून तुह्मी सर्व गरीब लोकांना नदीच्या वाळवंटावर जमवून तेथें अश्रु ढाळा, आणि त्या खोल नदीला एवढा पूर आणून सोडा कीं, तिचें पाणी उंच कांठाला जाऊन भिडेल !

( सर्व लोक निघून जातात. )

माझ्या भाषणाचा अगदीं सामान्य प्रतीच्या माणसांवर देखील काय परिणाम झाला हो ! पहा, आपली चुकी लक्षांत येतांच, तोंडांना अगदीं कुलपें घातल्याप्रमाणें, हे सर्वजण निमूटपणें निघून गेले ! तर आतां तूं या रस्त्यानें कॅपिटोलकडे जा, आणि मी त्या रस्त्यानें येतों. पुतळ्यांवर श्रृंगार व अलंकार घातले असले तर ते काढून टाक.

**मॅरूलस**—असें करायाला कांहीं चिंता नाहीं ना ? आज ल्युपरकलचा सण आहे, ह्मणून ह्मणतों.

**फ्लॅव्हियस**—चिंता कशाची ? कोणत्याही पुतळ्यावर सीझरच्या विजयाचीं चिन्हें दृष्टीस पडतां कामा नयेत. मी असाच एथें अम्मळ फिरतों व रस्त्यांतून जमलेल्या

दरोबस्त हलक्या लोकांना घालवून देतों आणि तूं ही तिकडे असेंच कर. लोकांचा कोठें जमाव दृष्टीस पडला तर त्यांना हांकून लाव. जो सीझर अशा प्रकारें फुगून जाऊन, मनुष्यांची दृष्टी न पोहोंचे अशा मोठमोठ्या उंच भराऱ्या आज मारूं पहात आहे व आपणा सर्वांना गुलामगिरींत जखडून टाकण्याची तयारी करीत आहे, त्याचीं पिसें याचवेळीं अशीं उपटून टाकलीं ह्मणजे त्याची एवढी भीती राहणार नाहीं.

( जातात. )

## प्रवेश २ रा.

**स्थळ**–रोम नगरांतील एक सार्वजनिक जागा.

( मिरवणूक निघाली असून, ते वेळीं वाद्यें वाजत आहेत, जयजयकार होत आहे, अशा थाटांत सीझर, अन्टनी, कॅल्पर्निया, पोर्शिया, डेशियस, सिसरो, ब्रूटस, केशियस, कॅस्का हीं सर्व प्रवेश करितात; व त्यांच्या मागोमागच लोकांचा घोळका येऊन, त्यांत एक भविष्यवादीही प्रवेश करितो. )

**सीझर**—कॅल्पार्निये!

**कॅस्का**—ऐका हो. अम्मळ, थांबा. सीझर महाराज बोलत आहेत.

( वाद्यें वाजावयाचीं बंद होतात. )

**सीझर**—कॅल्पर्निये !

**कॅल्पर्निया**—काय महाराज !

**सीझर**—हें पहा, आजच्या मंगलसमारंभाच्या समयीं अन्टोनियस जेव्हां नग्न स्थितींत, हातांत वादी घेऊन, रस्त्यानें धांवत सुटेल तेव्हां तूं त्याच्या वाटेंत उभी रहा.

( अन्टोनियसकडे वळून )

**ॲन्टोनियस**—महाराज, काय आज्ञा ?

**सीझर**—अशा तऱ्हेनें रस्त्यानें धांवत सुटलां ह्मणजे तुह्मी घाईमध्यें, कॅल्पर्नियेला स्पर्श करायाला विसरूं नका बरें. ह्या प्रसंगीं वांझ बायकांना स्पर्श झाला म्हणजे त्यांचा वांझपणा नाहींसा होतो असें आपले वाडवडील सांगत आले आहेत हें ठाऊक आहेना ?

**ॲन्टोनियस**—नाहीं विसरणार बरें. अमूक कर म्हणून सीझर महाराजांनीं म्हटलें कीं तें व्हावयाचेंच म्हणून समजा.

**सीझर**—हं, जा तर मग. कोणताही विधि करायाला चुकूं नका बरें.

( वाद्यें वाजूं लागतात. )

**भविष्यवादी**—( गर्दीतून मोठयानें ओरडून ) सीझर महाराज !

**सीझर**—काय हो ? मला कोण हाक मारितो ?

**कॅस्का**—अरे, कसलाही गलबला होऊं देऊं नका–आणखी कमी करा–बिलकुल बंद ठेवा.

**सीझर**—ह्या गर्दीतून मला कोणी हाक मारली? सर्व वाद्यांत अतीशय उच्च स्वरानें 'सीझर' म्हणून हाक मारलेली मी ऐकली. सीझरला कोणी तरी हाक मारली–बोला काय म्हणतां ? तो ऐकायाला तयार आहे.

**भविष्यवादी**—महाराज, मार्च महिन्याच्या १५ व्या तारखेची आठवण ठेवा.

**सीझर**—अरे कोण रे तो ?

**ॲन्टोनियस**—महाराज. हा भविष्यवादी आपल्याला मार्च महिन्याच्या १५ व्या तारखेची आठवण ठेवायाला सांगत आहे.

**सीझर**—त्याला माझ्या समोर आणा. मला त्याचें तोंड पाहूंद्या.

**कॅस्का**—ए गृहस्था असा इकडे ये. महाराजांच्या समोर उभा राहा.

**सीझर**—तुम्ही काय म्हणालां ? पुन्हां बोला.

**भविष्यवादी**—मार्च महिन्यांतील पंधरावीची आठवण ठेवा.

**सीझर**—जाउंद्या, त्याशीं आपल्याला काय कारायाचें आहे! तो स्वप्नांत कांहीं तरी बरळत आहे—जारे, बाबा.

( सर्व जातात; ब्रूटस व कॅशियस हे मात्र मागें राहतात ).

**केशियस**—कायहो ! मंगल समारंभ कसा काय मिरवत जात आहे तो पहायाला जात आहां काय ?

**ब्रूटस**—छे नाहीं. मी तर नाहीं जाणार.

**केशियस**—जाजा हो ! आपणाला एवढी माझी प्रार्थनाच आहे.

**ब्रूटस**—मी कांहीं इतका हौशी नाहीं, खरेंच सांगतों अन्टोनियस याच्या ठिकाणीं जो रंगेलपणा आहे तसा माझ्या ठिकाणीं नाहीं. बरें, मी आपला जातों. तूं पहा, तुझ्या इच्छेआड मी येत नाहीं.

**केशियस**—काय हो ! पूर्वीं तुमची मजवर जशी कृपादृष्टी होती तशी अलिकडे पहातों तों दिसत नाहीं तसाच लोभही अलिकडे कमी झाला आहे—असें कां बरें ? जो तुमचा स्नेही ह्मणवतो व तुमच्यावर प्रेम करतो त्यांशीं तुह्मी अलिकडे फारच परकेपणा धरून कठोरपणा करीत आहां असें मला ह्मणावें लागतें.

**ब्रूटस**—तसें नव्हे हो. तुम्ही अशी भलतीच समजूत करून घेऊं नका. माझी वृत्ती जर मी बदलली असली तर

ती माझी मजपाशींच; तिजपासून इतरांना काडीमात्र पीडा व्हावयाची नाहीं. अलिकडे माझ्या मनांत परस्परविरोधी विकार उद्भवत असतात; त्यांनीं मी पराकाष्ठेचा पिडलों आहें. तथापि या विकारांचा किंवा कल्पनातरंगांचा संबंध इतरांशीं नाहीं. आतां त्याचा कांहीं परिणाम माझ्या वागणुकीवर झाला असेल–नाहीं असें नाहीं; पण तेवढ्यावरून मनांत जळफळत असलेला हा ब्रूटस पूर्वीप्रमाणें इतरांशीं प्रेमानें वागण्यास विसरला असें मात्र होणार नाहीं. निदान तुझ्यासारख्यांनीं तरी या पलिकडे माझ्या या बदललेल्या वृत्तीचा भलताच अर्थ करूं नये.

**केशियस**—मग, माझें कांहीं ह्मणणें नाहीं. यांत माझीच चुकी झाली असें म्हटलें पाहिजे. तथापि माझ्या मनांत उत्पन्न झालेले महत्वाचे कांहीं विचार या चुकीमुळें मी जसेच्या तसे दाबून धरले आहेत. त्यांची अवश्य चर्चा तुह्मांसमोर झाली पाहिजे. तर महाराज, मी तुम्हांला एवढेंच विचारतों, तुमचें रूप तुम्हांला कधीं पाहतां येईल काय ?

**ब्रूटस**—मित्रा, कसें येईल ? नुसत्या डोळ्यांनीं आपलें रूप आपल्याला कधींही पाहतां येणार नाहीं. त्यासाठीं दुसऱ्या कोणत्या तरी वस्तूचें साहाय्य घेऊन प्रतिबिंब पाहिलें पाहिजे.

**केशियस**—तुम्हीं अगदीं खरें म्हटलें महाराज, कोणत्या

तरी कारणामुळें तशीच झांकून राहिलेली तुमची खरी योग्यता प्रतिबिंबाच्या रूपानें तुमच्या नजरेस आणून देणारे आरसे तुम्हांला आजपर्यंत मिळाले नाहींत, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे.* खरेंच सांगतों या अमर सीझरावांचून रोम नगरांतलि दरोबस्त नामांकित व लोकमान्य गृहस्थ हल्लींचा काळ फार वाईट आहे असें ह्मणून कष्टी होतांना मी पाहिले आहेत. सर्वांचें म्हणणें असेंच येतें कीं, ह्या थोर ब्रूटसाला आपली खरी योग्यता कळती तर फार बरें झालें असतें.

**ब्रूटस**—शाबास, आज कोणत्या संकटांत आम्हांला

* अर्थसादृश्यार्थ मूळ इंग्रजीशीं पुढील संस्कृतांतील उद्गार ताडून पाहण्यासारखा आहे. इंग्रजींतील मूळ असें—

*Cassius*—Tell me, good Brutus, can you see your face?
*Brutus*—No, Cassius; for the eye sees not itself.
But by reflection, by some other things.
*Cassius*— . . . . . . . . . . . 'Tis just:
And it is very much lamented, Brutus,
That you have no such mirrors as will turn
Your hidden worthiness into your eye,
That you might see your shadow.

याशी समानार्थक उद्गारः—

गुणिनामपि निजरूपातिपत्तिः परत एव संभवति ।
( या आर्येची दुसरी ओळ उपोद्घातांत दिली आहे तीं पहा. )
वासवदत्तायां सुबंधु.

घालण्याचा आपला बेत आहे ? खरोखरींच माझ्या ठिकाणीं ज्याचा पूर्ण अभाव असा कोणता गुण माझ्या अंगीं लावण्याची तुमची ही खटपट चालली आहे ?

**केशियस**—असेंच तुम्हांला वाटत असलें तर मी सांगतों त्याकडे तरी लक्ष द्या. प्रतिबिंब पाहिल्यावांचून आपलें रूप आपणाला पाहतां येत नाहीं ही गोष्ट जर तुम्हांला ठाऊक आहे तर मीच तुमच्या पुढें तुमचा आरसा उभा आहे असें समजा. हा आरसा तुमच्या ठिकाणीं वसत असलेले जे गुण तुम्हांला माहीत नाहींत, ते तुम्हांला दाखवील. पण महाराज, मी तुमची थट्टा केली असें मात्र म्हणूं नका किंवा माझें तुमच्यावर जें प्रेम आहे त्या प्रेमामुळें हा ज्याच्याशीं त्याच्याशीं त्याच त्याच शब्दांनीं माझ्या एखाद्या सामान्य गुणाचेंही वर्णन करीत सुटतो, अशी मात्र निरर्थक शंका घेऊं नका. आतां मी लोकांची हांजी हांजी करितों व प्रेमानें त्यांना कडकडून भेटतों आणि पाठीवर त्यांची निंदा करीत असतों, किंवा ते माझे जिवलग मित्र आहेत असें भासवून मी त्यांच्याबरोबर मेजवान्या झोडितों असें जर तुम्हांला वाटत असेल तर मात्र मी एक भयंकर मनुष्य आहें असें पाहिजेतर तुम्ही खुशाल समजा.

(पडद्यांत वाद्यें वाजतात व जयघोष होतो).

**ब्रूटस**—कायहो हा कसला जयघोष चालला आहे ? लोकांनीं सीझरला राज्याभिषेक केला कीं काय ? मला तर हीच धास्ती पडली आहे.

**केशियस**—अशी धास्ती पडली असली तर ही गोष्ट तुम्हांला मुळींच पसंत पडत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे.

**ब्रूटस**:—हें पहा, मित्रा, ही गोष्ट जरी मला आवडत नाहीं हें खरें आहे, तरी तो मला आवडतो हें कांहीं खोटें नाहीं. पण मला येथें येवढा वेळ तुम्ही खोळंबवून कां धरलें आहे ? मला काय सांगतां ! बोला, लोककल्याणाची एखादी गोष्ट करावयाला तुम्ही मला सांगत आहां काय ? मग त्यांत मरण कां येईना. मला त्याची बिलकुल पर्वा नाहीं. ती मी खुशीनें करीन. त्याचप्रमाणें लोककल्याण केल्यानें नांवलौकिक होईल. मानसन्मान मिळतील पण याचीही मला पर्वा नाहीं—दोन्हींही मला सारखींच. तथापि नांवलौकिकाची चाड जर मला कांहीं असेल तर खाचित परमेश्वर माझा तो मनोरथ पूर्ण करील.

**केशियस**—खरोखर, तुमच्या स्वरूपाची जशी मला बरोबर परीक्षा करितां येते तशीच तुमच्या या अप्रतीम गुणाची योग्यता मी जाणतों. आणि माझ्या बोलण्याचा मुख्य विषयही पण नांवलौकिक हाच आहे. आपल्या या मानवी जीविताबद्दल इतरांना व स्वतः तुम्हांलाही

काय वाटत असेल तें असो. हें मला नीटसें समजणार नाहीं हें खरें. तरी पण माझें मत विचाराल तर मी धडधडीत सांगतों कीं, माझ्यासारख्या एखाद्या मर्त्य माणसाच्या धाकांत वागण्यासाठीं जगावें हें काहीं बोवा आपणाला पसंत नाहीं. खरें ह्मणाल तर जन्मतः सीझराप्रमाणेंच मीही स्वतंत्र आहें, आणि तुम्हीही स्वतंत्र आहां. आपण लहानाचे मोठे झालों आहों ते सीझराप्रमाणेंच झालों आहों. आपणही त्याच्याप्रमाणेंच थंडीवाऱ्याची पीडा सहन करूं शकतों. एकदां जबरदस्त तुफान झालें व टायबर नदी महापुरानें तुडुंब भरून चालली होती. तेव्हां सीझरनें मलीं ह्मटलें " मित्रा, या महापुरांत उडया घालून पलीकडे पोंहून जाऊं येतोस का?" त्यानें मला असें आव्हान करितांच माझ्या अंगावर कपडे होते त्या कपड्यांसकट मी पुरांत उडी टाकिली व त्याला हाक मारून म्हटलें " ये माझ्या मागोमाग ये " आणि तोही मागोमाग आलाच. केवढा जबरदस्त तो पूर ! आणि केवढी त्याची भयंकर गर्जना ! त्याकडे काडीमात्र लक्ष न देतां आह्मीं आवेशानें पाणी तोडीत चाललों. पण ठिकाणावर पोंचण्या आधींच सीझर घाबरून जाऊन एकदम ओरडून ह्मणाला, "मित्रा बुडालों रे बुडालों हात दे" त्याबरोबर मी चटकन त्याजपाशीं गेलों आणि ट्रॉयनगराला ग्रीक लोकांनीं अग्नी दिला असतां आपल्या महाप्रतापवान् ईनियस

पूर्वजानें अॅन्चिसिस नामें आपल्या एका मित्राला ज्याप्रमाणें खांद्यावर वाहून नेलें व संकटांतून त्याचे प्राण वांचविले, त्याप्रमाणेंच मीही थकून गेलेल्या सीझरला वांचविलें. पण कसा न्याय आहे पहा. तोच सीझर आज जसा देव होऊन बसला आहे ! आणि या केशियसकडे सहजें नजर टाकण्याची त्याची मर्जी झाली तर लागलीच जसा एखाद्या क्षुद्र माणसानें केला पाहिजे तसा मीही त्याला लवून मुजरा केला पाहिजे ! स्पेन देशामध्यें एकदां त्याला ताप लागला, आणि त्या तापांतच वायू होऊन, त्याची—म्हणजे हल्लीं जो एक मोठा थोरला देव होऊन बसला आहे त्याची बरें !—त्यावेळीं कोण त्रेधा उडून गेली ! अहो, त्याचे ओंठ पांढरे फटफटीत पडले होते; आणि ज्या वक्रदृष्टीचे भीतीनें आज सारें जग कापत आहे, तीच त्याची दृष्टी अगदीं निस्तेज होऊन गेली होती. हल्लीं ज्याच्या जिव्हेनें उच्चारिलेले अहंमन्यतेचे हुकूम शिरसावंद्य मानण्याला कित्येक रोमन लोक तयार असतात, आणि ज्याच्याकडे ते अत्यंत उत्सुक नजरेनें पहात राहतात, व ज्यांचीं भाषणें आपल्या टिपण वहींत ते लिहून घेतात, त्याचीं जिव्हा त्यावेळीं मृतप्राय माणसाप्रमाणें केवळ लुली झाली होती व त्याच्या त्या तोंडांतून कण्हणें व विवळणें चाललें होतें तें मी ऐकलें आहे. तेव्हां एखाद्या पोरीप्रमाणें तोंड वेंगाडून

तो मला ह्मणाला, "अरे, माझ्या जिभेला अतिशय कोरड पडली आहे, थोडें पाणी तरी दे रे!" परमेश्वरा! असल्या क्षुद्र माणसानें आह्मां सर्वांवर सत्ता गाजवावी, आणि सर्वांच्या अगोदर एकट्यानेंच सर्व पृथ्वीभर पसरलेली राज्यलक्ष्मी कायमची बळकावून बसावें हें आश्चर्य नाहीं काय?

( पडद्यांत वाद्यें वाजतात व जयघोष होतो ).

**ब्रूटस**—अरे! हा जयघोष फिरून झाला! खचित राज्यारोहणसंबंधाचे नवे नवे आदरसत्कार व नवे नवे मानसन्मान सीझराला लोक अर्पण करीत आहेत असें वाटतें.

**केशियस**—काय सांगावें? प्रचंड कलासस् पुतळ्याप्रमाणें या आकुंचित जगाला दोन पायांनीं जणूं आक्रमण करून तो उभा आहे; आणि त्याच्या ढेंगाखालीं आपण सर्वजण यःकश्चित प्राण्याप्रमाणें वावरत आहों, आणि असलें हें तिरस्करणीय जिणें कधीं संपेल म्हणून मरणाची वाट पहात बसलों आहों. अहो! आपण दुबळे होऊन रहावें हा कांहीं आपल्या ग्रहांचा दोष नव्हे; तो आपल्या स्वतःचाच आहे. कारण माणसांना आपल्या प्रारब्धावरही कधीं कधीं सत्ता चालवितां येते. काय म्हणे ब्रूटस आणि सीझर—एक लहान आणि एक थोर! पण मी म्हणतों त्या सीझरमध्येंच

असें अधीक तें काय आहे ? तुमच्या नांवापेक्षां त्याचेंच नांव कां अधिक ऐकूं यावें ? तीं दोन्हीं नांवें जवळ जवळ लिहून पहा; तुमचें नांव त्याच्या नांवा इतकेंच सुंदर आहे. बरें दोन्हीं नांवाचा उच्चार केला तरी तुमचें नांव त्याच्या इतकेंच कर्णमधुर आहे. दोन्हीं नांवें तोलून पाहिलीं तरी वजनानें तीं सारखींच भरतील. बरें भूत पिशाच्चांना हुकूम करण्यासाठीं तीं उच्चारिलीं तरी दोहोंचा सारखाच उपयोग होईल. असें असतांना हा सीझर जो एकाएकीं एवढ्या मोठ्या पदवीस चढला तो अशा कोणत्या विशेष प्रकारच्या अन्नावर पोसल्यामुळें चढला. हें कोणी मला सांगेल काय ? धिःकार असो या निंद्य काळ-गतीला ! रोमनगरा, तूं तुझ्या अतुल पराक्रमी पुत्रांची परंपरा सांप्रत मोडून टाकावीसना ! खचित, तुला ह्याची लाज वाटावी ! धिःकार असो तुला ! प्रलयकाळा-पासून आज मितीपर्यंत पाहिलें तर वेळोवेळीं येथें एकापेक्षां एक विख्यात व प्रतापवान् पुरुष होऊन गेले आहेत. ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून रोमचें वर्णन केलें आहे, त्यांतून कोणी तरी असें ह्मटलें आहे काय ?—कीं ह्या रोम नगरांत कायतो एकच विख्यात पुरुष आज जन्मास आला आहे. जेथें आज एका पुरुषावांचून इतरांना जागाच नाहीं असें हेंच तें रोमनगर काय ? तुह्मांला ठाऊकच असेल कीं एके काळीं आपल्यामध्यें ब्रूटस या नांवाचाही

एक मोठा शूर पुरुष होऊन गेला. त्याला देखील रोम नगरामध्यें राजाप्रमाणें आपली श्रेष्ठ पदवी प्रस्थापित करतां आली असती, व त्यासाठीं वाटेल तेवढे कष्ट करतां आले असते. पण—

**ब्रूटस**—मी समजतों, तुमचें माझ्यावर प्रेम आहे याची मला काडीइतकी देखील शंका नाहीं. मला तुह्मी कोणती गोष्ट करावयाला लावणार आहां याबद्दलही मला थोडीशी कल्पना आली आहे. परंतु तुमच्या या बोलण्याचा माझ्या मनावर काय परिणाम झाला आहे; व सांप्रतच्या काळासंबंधानें मला काय वाटत आहे, तें मी तुह्मांला पुढें केव्हां तरी सांगेन. तरी आजच तुम्ही मला कोणताही आग्रह करूं नका. अशी मी तुह्मांला विनंती करितों. तुह्मी मला जे जे कांहीं सांगितलें त्याचा मी नीट विचार करीन; आणि त्याहूनही आणखी कांहीं सांगावयाचें असलें तर तेंही मी धीराधीरानें ऐकून घेईन; ह्मणजे या सर्व गोष्टींचा नीट विचार करतां येईल व त्याचें आपणाला काय वाटतें तें आपल्या मनाशीं निश्चितपणें ठरवितां येईल. मी ह्मणतों त्याप्रमाणें तुह्मांला वागावयाचें असलें तर मित्रा तोंवर याच गोष्टीचें तुह्मी नीटपणें मनन करा. सध्यांच्या स्थितीमध्यें आपणावर जे प्रसंग येणार आहेत, त्यांचा विचार केला असतां मला तर असें वाटतें

कीं, अशा स्थितींत रोमनगरचा एक शूर पुत्र म्हणवून घेण्यापेक्षां हा ब्रूटस धनगर म्हणवून घेण्यालाही तयार आहे.

**केशियस**—बरें, माझ्या एवढ्या सौम्य भाषणानें देखील तुमच्या मनामध्यें थोडी तरी जागृती उत्पन्न झालेली पाहून मला समाधान वाटतें.

**ब्रूटस**—तिकडचा सर्व समारंभ आटोपून सीझर इकडून परत जात आहे, तो पहा.

**केशियस**—ते इकडून चालले ह्मणजे कॅस्काचा हात धरून त्याला तुम्ही ओढा म्हणजे आज काय काय हकीकत घडली त्याचें तो आपल्या नेहमींच्या रडक्या वाणीनें वर्णन करील.

( सीझर अनुयायी मंडळींसह अंतरावर प्रवेश करितो ).

**ब्रूटस**—ठीक आहे. तुह्मी म्हणतां तसें करितों. पण काय-हो, सीझर क्रोधानें लाल झालेला दिसत नाहीं का ? आणि त्याजबरोबरचे सर्व लोक कसे घाबरून गेलेले दिसत आहेत. कालपर्नियेचें तोंड कसें उतरून गेल्यासारखें दिसत आहे; आणि मागें एकदां कॅपिटोल सभागृहामध्यें लोकांनीं सिसरोचा अपमान केलेला आपण पाहिला होता तेव्हांप्रमाणेंच त्याचे डोळे कसे इंगळासारखे लाल होऊन गेले आहेत.

**केशियस**—कॅस्का आपल्याला सर्व कांहीं सांगेल.

**सीझर**—कायहो अन्टोनियस !

**ॲन्टोनियस**—काय म्हटलें महाराज ?

**सीझर**—माझ्याबरोबर चांगले धष्टपुष्ट व रात्रभर घोरत पडतील असे मठ्ठ डोक्याचे लोक असूं द्या. कृश आंगाचा तो केशियस पहा. त्याची मुद्रा कशी भेसुर दिसत आहे. तो नेहमीं एकसारखा चिंतेंत असतो. असले मनुष्य म्हणजे मोठे भयंकर.

**अन्टोनियस**—महाराज, त्याचें आपल्याला भय वाटण्याच काय कारण ? तो कांहीं भयंकर नाहीं. तो एक थोर मनाचा व चांगल्या स्वभावाचा रोमन गृहस्थ आहे.

**सीझर**—तो आहे त्याहून अंमळ लठ्ठ असता तर बरें झालें असतें बुवा. तरीपण मी ह्मणजे त्याला भितों असें समजूं नको. शौर्याविषयीं व धैर्याविषयीं जें माझें नांव सर्व जगांत प्रसिद्धी पावलें आहे, त्या माझ्या नांवाबरोबर भीतीचा संबंधही कोणी जोडूं नये. केवळ भीतीकरितां ह्मणून सीझर कोणाचीही भेट घेण्याला कचरत असेल तर ती एका केशियसची. हा केशियस सदोदित वाचनांत निमग्न असतो. जगांतील सर्व गोष्टींचें तो नेहमीं सूक्ष्म निरीक्षण करीत असतो; आणि लोकांचीं सर्व बरींवाईट कृत्यें त्याला चांगलीं समजतात. कायहो ॲन्टनीय तुम्हांला

खेळ फार आवडतात पण त्याला आवडत नाहींत बरें. त्याला गाणें बजावणें आवडत नाहीं. बिचाऱ्याचें हास्यमुख तर कधींच कोणी पाहिलें नसेल. बरें, चुकून माकून एखाद वेळ तो हासलाच तर आपली ही मोठी चुकी झाली असें समजून जणूं स्वतःलाच हसून वेडावीत आहे अशा प्रकारचें तो हांसतो. अशा माणसांना स्वतःहून थोर कोणी दिसला म्हणजे त्यांच्या चित्ताची खळबळ उडून जाते; आणि ह्मणूनच असले लोक मोठे भयंकर होत असें मी ह्मणतों. अहो मी सीझर आहे हें लक्षांत ठेवा; तेव्हां मला स्वतःला कशाची भीती वाटते हें सांगण्यापेक्षां भीती कशापासून उत्पन्न होते हें मी तुह्मांला सांगतों ह्मणजे झालें. माझ्या डाव्या कानानें मला नीटसें ऐकूं येत नाहीं, म्हणून तुम्हीं असे माझ्या उजव्या बाजूला या; आणि त्याच्याविषयीं तुह्मांला काय वाटतें तें मला सांगा.

( वाद्यें वाजतात. सीझर व त्याच्या बरोबरचे सर्व लोक जातात; कॅस्का मात्र मागें राहतो ).

**कॅस्का**—तुम्हीचना आतां मला ओढलेंत ? तुमचें मनांतून काय सांगावयाचें आहे ?

**ब्रूटस**—कायरे, सीझराचा चेहरा आज उतरलासा दिसतो; तो कां बरें ? असें आज काय बरें घडलें ?

**कॅस्का**—हें विचारितां काय ? मला तर वाटतें तुह्मीं त्याजबरोबर होतां; नव्हे का ?

**ब्रूटस**—अरे मी त्याजबरोबर असतों तर आजची हकी-कत तुला मी विचारली असती का ?

**कॅस्का**—कां म्हणजे लोक त्याला मुकुट अर्पण करीत होते. पण त्यानें तो असा झिडकारून टाकला; आणि तेव्हां लोकांनीं मोठा गोंगाट चालविला.

**ब्रूटस**—बरें पण दुसऱ्यानें जो गलबला ऐकूं आला तो रे कशाचा ?

**कॅस्का**—अहो तोच तो.

**ब्रूटस**—लोकांनीं ओरडून तीनदां गोंधळ केला पण तिसऱ्यानदां रे कां म्हणून ?

**कॅस्का**—अहो, तेवढ्याचकरितां.

**ब्रूटस**—मुकुट काय लोकांनीं त्याला तीन वेळां अर्पण केला ?

**कॅस्का**—हो, हो, हो, आणि तितक्याही वेळां त्यानें तो झिडकारला; पण प्रत्येक वेळीं नको नको म्हणतांना तो किंचित् अनमान करीत होता असें दिसलें; आणि लोकही तितक्याच वेळां मोठ्यानें ओरडले.

**ब्रूटस**—बरें त्याला तो कोणी अर्पण केला ?

**कॅस्का**—अहो, अॅन्टनीनें.

**ब्रूटस**—तर मग, कॅस्का, ती सर्व हकीकत मला सांग पाहूं ?

**कॅस्का**—हें पहा, तें सांगत बसण्यापेक्षां मी मेलों तरी पत्करलें. अहो, तो सारा मुळीं मूर्खपणाचा बाजार; मी त्याकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. मार्क ॲन्टनीनें तो मुकुट त्याला देण्याकरितां पुढें केलेला मी पाहिला—हो पण तो मुकुट कशाचा. तें एक भिकार किरीट आणिलें होतें कुठूनसें ! आणि मी मघाशीं सांगितल्याप्रमाणें त्यानें तें आपल्या हातानें दूर सारिलें. पण मला तर त्यावेळीं असें वाटलें कीं सीझराच्या मनांतून तें घ्यावयाचें होतें. ॲन्टनीनें पुन्हा तें सीझराच्या पुढें केलें; व पुन्हा त्यानें तें घेण्याचें नाकारिलें. तरी पण त्याचा हात त्याच्यावरून कांहीं एकदम निघेना. मग ॲन्टनीनें सीझराला देण्याकरितां तिसऱ्यानें पुढें केलें; पण त्यावेळींही सीझरानें तें घ्यावयाचें नाकारिलें. हें पाहतांच जमलेले सर्व लोक टाळ्या वाजवून मोठमोठ्यानें ओरडूं लागले; व त्यांनीं आपल्या घामानें भरलेल्या टोप्या काढल्या. आणि सीझरानें मुकुट नको म्हणतांच त्यांच्यामध्यें अशी कांहीं गलबल झाली कीं तिनें सीझराला गुदमरल्यासारखें होऊन घेरी आली व धाडकन तो मुकुटावर पडला. आतां मजविषयीं विचाराल

तर हा प्रकार पाहून मला तर हांसें आलें असतें परंतु मी तें आवरलें. नाहीं तर तोंडावाटे वाईट हवा माझ्या घशांत खचित गेली असती.

**केशियस**—बरें थांब पण. सीझराला एकाएकीं मूर्छा आली ह्मणतोस ती कां बरें ?

**कॅस्का**—भर बाजारांत तो मूर्छा येऊन पडला. तोंडाला फेंस आला, वाचा बंद झाली.

**ब्रूटस**—तसें झालें असेल म्हणा. घेरी येऊन पडण्याची त्याला संवयच आहे.

**केशियस**—छे हो. सीझराला तशी संवय मुळींच नाहीं. घेरी येऊन पडण्याची ही संवय फक्त तुम्हांला, मला व या सरळ मनाच्या कॅस्काला मात्र लागली आहे खरी.

**कॅस्का**—तुम्हीं हें काय म्हणतां तें मला समजत नाहीं. पण त्यावेळीं सीझर पडला हें मात्र खोटें नाहीं. नाटकगृहांत जमलेले लोक रंगभूमीवर येणाऱ्या पात्रा-संबंधानें जसें आचरण करितात त्याप्रमाणेंच त्यावेळीं जमलेल्या अलबत्यागलबत्या लोकांतून ज्यांना सीझराचें करणें बरें वाटलें त्यांनीं टाळ्या वाजविल्या; आणि ज्यांना बरें वाटलें नाहीं त्यांनीं धिःकारयुक्त शब्दांनीं आपली नापसंती प्रगट केली. माझा तर असा ग्रह झाला, तो खोटा असला तर मला कळत नाहीं म्हणा.

**ब्रूटस**—बरें तो शुद्धीवर आल्यावर तरी काय बोलला ?

**कॅस्का**—त्याला घेरी आली नव्हती तेव्हांच असें घडलें कीं आपण मुकुटाचा अंगीकार करीत नाहीं यामुळें जमलेल्या लोकांना मोठा आनंद झाला असें जेव्हां त्याच्या दृष्टीस पडलें तेव्हां त्यानें अंगांतील कपडे काढले आणि अगदीं उघडा झाला, व आपली मान पुढें करून तो म्हणाला, " ही घ्या माझी मान तोडा. " मी जर धंदेवाईक मनुष्य असतों तर त्यानें असें म्हणतांच मी तसेंच केलें असतें; आणि खचित सांगतों तसें केलें नसतें तर धंदेवाईक लोकांना जसे आज आपण पाजी म्हणूं त्याप्रमाणेंच मलाही पाजी समजून माझी छी थू केली असती तर त्याचें मला काडीइतकेंही वाईट वाटलें नसतें. कांहीं असो; झालें, तो पडला. मग शुद्धीवर आल्यावर तो म्हणाला, " सज्जनहो, मी जर कांहीं भलतें बोललों असेन किंवा भलत्याच रीतीनें वागलों असेन तर केवळ माझ्या व्याधीमुळेंच वागलों असेन, असें समजून त्याची मला क्षमा करा. " माझ्या शेजारींच दोघी तिघी वेसवा उभ्या होत्या. त्या म्हणतात काय ?—" अरेरे गरीब बिचारा ! " असें त्या ओरडल्या, आणि खोटें नाहीं सांगत त्यांना दया आली असें दिसलें. पण असल्या लोकांकडे काय

लक्ष द्यावयाचें आहे. कारण सीझरानें जरी त्यांच्या आयांना ठार मारलें असतें, तरीही त्यांनीं असेंच ह्मटलें असतें.

**ब्रूटस**—इतकें झाल्यावर तो खिन्नवदन झाला व इकडे आला; आम्हांला जो दिसला, तो याचवेळीं दिसलाना ?

**कॅस्का**—हो हो. याच वेळीं.

**कोरियन**—बरें पण सिसरो होता तो कांहीं बोलला का ?

**कॅस्का**—हो, पण तो ग्रीक भाषेंत बोलला.

**केशियस**—त्याचा आशय काय ?

**कॅस्का**—छे बोवा, तें सांगावयाचें म्हणजे उगीच कांहीं तरी खोटें सांगावें लागणार. आणखी उगीच खोटें बोलणें हें मला कांहीं बरें वाटत नाहीं. पण ज्यांना ज्यांना ह्मणून सिसरोचें बोलणें समजलें ते एकमेकांकडे पाहून हासले व त्यांनीं आपल्या माना डोलविल्या. मला काय समजलें ह्मणून विचाराल तर मला त्यांतलें कांहींएक कळलें नाहीं. बरें याशिवाय आणखीही थोडीशी हकीकत मी तुह्मांला सांगतों; ती अशी कीं, सीझराच्या प्रतिमांवरील वस्त्रालंकार काढून टाकून त्यांना विद्रूप केल्याबद्दल मॅरूलस व फ्लॅव्हियस यांना चांगली समज देऊन, त्यांचीं तोंडें बंद करण्यांत आलीं. बरें तर आता

मी जातों. तेथें आणखी पुष्कळ मूर्खपणाच्या गोष्टी घडल्या; पण त्या आतां माझ्या ध्यानांत असतील तर.

**केशियस**—बरें कॅस्का, आज रात्रीं माझ्या येथें जेवावयाला येशील का ?

**कॅस्का**—आज होय, छे, मला दुसऱ्या एके ठिकाणीं जावयाचें आहे.

**केशियस**—बरें उद्यां तरी येशील ?

**कॅस्का**—हें पहा, उद्यांपर्यंत मी जिवंत राहिलों, तुमची मर्जी उद्यांपर्यंत अशीच असली, आणखी तुमच्या घरचें जेवण खरोखरीं चांगलें असलें तर उद्यां येईन बोवा.

**केशियस**—ठीक आहे, ये तर मग. मी तुझी वाट पहात बसतों.

**कॅस्का**—बरें ( नमस्कार ) येतों आतां मी.

( जातो. )

**ब्रूटस**—हा माणूस अलीकडे किती तरी मुर्दाड झाला आहे हो ! लहानपणीं शाळेंत असतांना कसा चलाख व पाणीदार असे.

**केशियस**—हें पहा, एखादें मोठें धाडसाचें काम करावयाचें असलें म्हणजे तो अजूनही कमी नाहीं. पण आपण बावळट आहों असें वरवरून मात्र दाखवितो;

आणि या त्याच्या आडाणीपणामुळें त्याच्या चलाख वृत्तीला विशेषच महत्व येऊन त्याचें बोलणें लोक अधीकच उत्सुकतेनें ऐकतात.

**ब्रूटस**—तसें असावयाचेंच. बरें पण मला आतां गेलें पाहिजे. आणखी तुला कांहीं बोलावयाचें असलें तर मीच तुझ्याकडे येईन; किंवा तूं माझ्या घरीं आलास तरी चालेल; मी तुझी वाट पाहत बसतों.

**केशियस**—बरें, तसें कां होईना पण तोंवर तुह्मीं जगांत काय चाललें आहे आणि करावयाचें काय याचा विचार करून ठेवा.

(ब्रूटस जातो.)

**केशियस**—वाहवा धन्य आहे! मित्रा तूं फार थोर आहेस! मला खचित असें वाटतें कीं तुझ्या थोर मनाचा ओघ जिकडे वहात आहे, तिकडून तो वळवितां येईल; आणि अशा थोर मनाला नेहमीं स्वतःचे सारख्याचा समागम आवडावा हेंही ठीकच आहे. पण ज्याचें मन वळणार नाहीं, असा दृढनिश्चयी मनुष्य तरी कोण सांपडेल ? सीझर माझा नेहमीं तिरस्कार करितो; ब्रूटस मात्र त्याला आपला प्रिय वाटतो. यावेळीं मी जर ब्रूटस असतों आणि तो जर केशियस असता तर मला भीड घालून वळविणें त्याला खचित साधलें असतें. या रोम

नगरांतील लोकांच्या मनांत त्याजविषयीं जी आदर-बुद्धि वसत आहे ती व्यक्त करून दाखविणारे पुष्कळसे स्तुतीपर लेख लिहवून ते वेगवेगळ्या लोकांच्या हातून त्याच्या खिडक्यांमधून आंत टाकविण्याची मी आज रात्रीं खटपट करितों. अशा प्रकारच्या निरनिराळ्या लेखांतून सीझराच्या काळ्या-कुट्ट महत्वाकांक्षी स्वभावाचेंही क्वचित् स्थळीं वर्णन केलें जाईल आणि इतकें झालें म्हणजे सीझरानें त्याला पाहिजे तितका आपळासा करून ठेविला तरी हरकत नाहीं. कारण आम्ही हे त्याला वळविणारच; इतकें करूनही तो वळला नाहीं तर याहूनही खडतर काळ आला तर बेहत्तर !

( जातो. )

## प्रवेश ३ रा.

स्थळ–रोम नगरांतील एक सार्वजनिक जागा–एक रस्ता.
( आकाशांत मेघांचा गडगडाट होऊन विजा चमकत आहेत. कॅस्का हा आपली तलवार उपसून प्रवेश करितो व समोर सिसरोही प्रवेश करितो. )

**सिसरो**—नमस्कार ( कॅस्का यास उद्देशून ) कायरे, सीझराला त्याच्या वाड्यांत आणून पोंचविलेंसना ? अरे पण इतका घामाघुम रे कशानें झाला आहेस ? आणखी मजकडे असा एकसारखा डोळे वटारून कां पहात आहेस ?

**कॅस्का**—काय ? तुह्मांला कांहींच वाटत नाहीं ? अहो, ही अचल पृथ्वी पहा कशी एखाद्या चल पदार्थाप्रमाणें डळमळूं लागली आहे ! अहो, प्रचंड झंझावातानें महान् महान् वृक्षांना उलथून पाडणारी भयंकर तुफानें मी पाहिलीं आहेत; आणि भयानक गर्जनेनें मेघानें समुद्राला भयभीत करून सोडावें, व उलटपक्षीं खवळून गेलेल्या समुद्रानें फेनयुक्त प्रचंड लाटांच्या प्रहारानें मेघांना जर्जर करून टाकावें अशी तऱ्हा मी पाहिली आहे. पण वैश्वानराचा वर्षाव करणारें तुफान या घटकेपर्यंत मी पाहिलें नव्हतें. मला तर वाटतें स्वर्गांत देवांचें परस्पराशीं युद्ध चाललें असावें; किंवा उन्मत्तपणानें वाग-

णाऱ्या या जगांतील लोकांनीं देवांना कोपविल्यामुळें तेच जगाच्या संहारास प्रवृत्त झाले असावे.

**सिसरो**—कां ? असें कां म्हणतोस, यांत काय आहे. याहून आणखी विस्मयकारक तूं कांहीं पाहिलें आहेस कीं काय ?

**कॅस्का**—अहो, कोणी यःकश्चित् गुलाम, तो नेहमींचा आपल्या ओळखीचा-त्यानें अग्नींत आपला हात असा लांब करून धरिला होता, आणि दहावीस मशालीं-प्रमाणें तो पेटून त्यांतून ज्वाला निघत होत्या, तरी त्याची त्याला शुद्ध नव्हती; बरें त्याचा तो हात होरपळून जावा तोही गेला नव्हता. शिवाय कॅपिटोल वाड्यासमोर मला आतांच एक सिंह दिसला. तो माझ्याकडे गुरकावून पहात होता; आणि मला कांहींएक इजा न करितां तो क्रुद्ध दृष्टीनें माझ्याकडे पहात निघून गेला. तेव्हांपासून मी आपली तलवार काढली आहे ती फिरून कशी ती म्यानांत घातली नाहीं. आणखी पुढें पहातों तों लगेच भयानें घाबरून गेलेल्या बायकांचा एक थवाच्या थवा माझ्या दृष्टीस पडला. त्या सर्व भीतीनें गांगरून गेल्या होत्या. त्याही मला सांगूं लागल्या किती तरी माणसें आगींतून चालून जातांना आम्हीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलीं; आणि काल भरदिवसा

कांहीं घुबड आपलें बाजारच्या जागीं बसून मोठमोठ्यानें रडत होतें. तेव्हां आतां इतके चमत्कार-अपशकुन एकाच वेळीं घडून आल्यावर ते अमक्या अमक्या कारणांनीं घडले असें कोण ह्मणेल ? तेव्हां हे चमत्कार कोणी केले असें न म्हणतां निसर्गगुणानेंच घडून आले हें उघड आहे. कारण मला तर वाटतें हे सर्व अपशकुन पुढें येणाऱ्या आपदेचे सूचक होत.

**सिसरो**—खरोखरीच बुवा, सध्यांचा काळ तर मोठा विपरीत आला आहे. पण हल्लीं घडणाऱ्या गोष्टींचा आपापल्या मताप्रमाणें वाटेल तसा अर्थ घ्यावा. मग वस्तुस्थितीशीं त्याचा मेळ बसो कीं न बसो. सीझर महाराज उद्यां कॅपिटोल सभेमध्यें येणार आहेत, नाहीं बरें ?

**कॅस्का**—होय, येणार आहेत तर. मी उद्यां कॅपिटोल सभेला येणार आहें असा ॲन्टोनी याच्या हातीं त्यानें तुह्मांला निरोपही पाठविला आहे.

**सिसरो**—असें काय बरें. नमस्कार, आतां आह्मीं येतों तर. या रात्रीं असल्या या धामधुमींत हिंडण्याची कांहीं सोय उरली नाहीं.

**कॅस्का**—बरें आहे, नमस्कार महाराज.

( सिसरो जातो. )

( केशियस प्रवेश करतो. )

**केशियस**—कोणरे आहे तो तिकडे ?

**कॅस्का**—एक रोमन गृहस्थ.

**केशियस**—आवाजावरून तर तूं कॅस्का असावास.

**कॅस्का**—तुमचे कान तर बुवा तिखट दिसतात. अहो केशियस कसलीहो बुवा आजची भयंकर रात्र ही ?

**केशियस**—खऱ्याखऱ्या माणसांना तर आजच्या सारखी मोठी मजेची रात्र कधींच आली नसेल.

**कॅस्का**—असला हा ईश्वरी कोप कोणी कधीं पाहिला होता काय ?

**केशियस**—अरे हो. पृथ्वीच्या पाठीवर किती पाप भरलें आहे व किती अन्याय चालला आहे, हें ज्यांनीं पाहिलें आहे, त्यांनीं अशा ईश्वरी कोपाच्या गोष्टी खचित पाहिल्या आहेत. आणि मीच पहाना ! असल्या भयंकर रात्रीच्या सपाट्यांत सांपडलों असतांही तूं मला पहात आहेस असाच मी अगदीं उघडा बोडका विजांच्या कडकडाटांतून व भयंकर मेघगर्जनांतून सर्व रात्रभर रस्त्यानें हिंडत आहें; आणि अंतरिक्षांत देदीप्यमान तेजानें सर्व नभोमंडळाचा अंतर्भाग प्रकाशित झाला असतां जेथून चमक निघे तेथवर देखील जावयाला मी कमी केलें नाहीं.

**कॅस्का**—अहो पण तुम्ही देवांची अशी परीक्षा काय

म्हणून पाहिली ? अहो, आपणाला चकित करून सो- डण्यासाठीं सर्व शक्तिमान परमेश्वर अगोदर अशीं चिन्हें उत्पन्न करितो व येणाऱ्या संकटांची सूचना देतो. आणि अशा वेळीं मनुष्यांनीं घाबरणें व भीतीनें कापणें हें अ- गदीं स्वाभाविक आहे.

**केशियस**—अहारे दगड्या तूं किती मंदबुद्धी आहेस. अरे रोमन मनुष्यांमध्यें जिवंतपणाचा जो गुण व जें ज्ञान असावयाचें त्याचा तुझ्या ठिकाणीं लेशही दिसत नाहीं, किंवा त्याचा तूं उपयोग करीत नाहींस. तूं असा अगदीं निस्तेज व कळाहीन कां दिसतो आहेस; आणि असा एकसारखा टक लावून काय पाहतो आहेस. तूं खचित जबर भीती घेतली आहेस ! व आश्चर्यात बुडून गेला आहेस, दुसरें कांहीं नाहीं. कारण तूं पाहत आहेस त्या ईश्वरी क्षोभाच्या गोष्टी ईश्वरानें केवळ रुष्ट होऊन सृष्टिक्रमांत गडबड उडवून दिल्यामुळेंच झाल्या आहेत. पण हे अग्निप्रलय, हीं इकडून तिकडे संचर- णारीं पिशाच्चें, पशुपक्षी हे सर्व आपापले नैसर्गिक स्वभाव सोडून कां वागत आहेत; म्हातारे कोतारे, भोळे भावडे व लहान लहान पोरें कोणती गोष्ट सुचवीत आहेत; आणि ज्या कांहीं विशिष्ट हेतूनें ईश्वरानें या सर्व वस्तु निर्माण केल्या आहेत, तो हेतु कोणता हें पाहिलें

असतां सध्या दिसून येणारें सर्व गोष्टींचें विचित्र स्थित्यंतर कशामुळें घडून आलें आहे, याचा तूं नीट विचार कर, ह्मणजे तुला असें आढळून येईल कीं ईश्वरानेंच या सर्वांमध्यें ही अस्वाभाविक प्रेरणा उत्पन्न केली आहे. व तेणेंकरून पुढें प्राप्त होणाऱ्या भयंकर संकटाचीं कारणें तो सिद्ध करून ठेवीत आहे. बरें तें असो. पण विजा चमकविणारा, मेघ गर्जना करणारा, मेलेल्या माणसांना पिशाचरूपानें पृथ्वीवर संचार करावयाला लावणारा, कॅपिटोलमधील सिंहाप्रमाणें गर्जना करणारा, आणि या भयप्रद रात्रीशीं ज्याचें साम्य आहे असा एक मनुष्य आहे त्याचें नांव मी तुला सांगूं काय ? तो मनुष्य स्वतःच्या कर्तृत्वानें तुझ्यापेक्षां किंवा माझ्यापेक्षां कांहीं मोठा जबरदस्त आहे असें नाहीं. पण सध्यां त्याचें विलक्षण प्रस्थ माजल्यामुळें आजच्या या भयानक रात्रीं होणाऱ्या भयंकर उत्पातांप्रमाणें तो कसा अगदीं भयप्रद वाटत आहे.

**कॅस्का**—कोण तो ? सीझर कीं काय ?

**कॅशियस**—असेल कोणी तरी. अरे सध्यांच्या रोमन लोकांचें सामर्थ्य व त्यांच्या शरिराचे अवयव हे सर्व त्यांच्या पूर्वजांच्या प्रमाणेंच आहेत, नाहीं काय ? पण शिवशिव कसा काळ प्राप्त झाला पहा ! अरेरे आपल्या

वाडवडलांच्या मानसिक शक्तींचा ऱ्हास झाला असून आज सर्व गोष्टी केवळ स्त्रियांच्या वृत्तीला अनुसरून घडून येत आहेत. आज आपल्या मानेवर पारतंत्र्याचें जोखड येऊन बसलें आहे; आणि तें आपण निमुटपणें सहन करीत आहों. यानें आपली बायकी वृत्ती व्यक्त होत नाहीं काय ?

**कॅस्का**—खरें खरें तुम्हीं म्हणतां तें अगदीं खरें. कॅपिटोल सभेंतील लोकांच्या मनांतून उद्यां सीझराला राजा करून त्याची सिंहासनावर स्थापना करावयाची आहे. मग राजमुकुट त्याला प्राप्त होऊन त्याची सत्ता हा इटली देश खेरीज करून दरोबस्त भूमीवर व समुद्रावर चालू होईल. लोकांत बोलवा तर अशी आहे.

**कॅशियस**—असें झालें ह्मणजे मग माझा हा खंजीर कोठें ठेवावयाचा कळलें का ? मला तर हें चांगलें माहीत आहे. ऐकलेंस ?—हा कॅशियस स्वतःला या गुलामगिरींतून मुक्त करील. आणि त्या कार्यांत हे देवतांनो, तुह्मी अशक्त माणसांनां शक्तिमान करा. या कार्यांत हे देवतांनो, तुह्मी जुलमी राजाचा पराभव करा. आणि आत्म्यानें एकदां स्वतंत्रपणानें राहण्याचा निश्चय केला ह्मणजे मग कसाही दगडी किल्ला असो,

याच्या भिंती पितळेच्या पत्र्यानें मढवून कितीही मजबूत केलेल्या असोत, आंत हवा येण्याला बिलकुल वाव नाहीं असा भयंकर तुरुंग असो, तसाच अतिशय मजबूत दांडगा लोखंडी साखळदंड असो, यांतून कोणाच्यानेंही त्याच्या शक्तीचा निरोध करवणार नाहीं; आणि माणसांनीं निर्माण केलेल्या असल्या प्रतिबंधांचा वीट एकदां आत्म्याला येऊन गेला ह्मणजे, पाहिजे तेव्हां निसटून जाण्याला त्याला शक्तीची उणीव भासणार नाहीं. मी तर ही गोष्ट जाणूनच आहें, आणि सर्व जगानेंही ती नेहमीं लक्षांत ठेवावी, हल्लीं मी जो जुलूम सहन करीत आहें त्याचा शेवट मला पाहिजे तेव्हां सहज करून टाकतां येईल.

( मेघ गर्जना होते. )

**कॅस्का**—आणि काय ह्मणतां ? मला नाहीं तसें करतां यावयाचें ? आणि गुलामगिरीची स्थिती नाहींशी करण्याची ही शक्ती कोणत्या गुलामाच्या हातीं नाहीं ?

**केशियस**—हें जर खरें तर सीझरानें सर्वांवर जुलुम काय ह्मणून करावा ? सीझर हा कोण बिचारा यःकश्चित् प्राणी. परंतु सर्व रोमन लोक मेंढ्या झालेले तो पहात आहे; नाहींतर मला ठाऊक आहे, सीझर कांहीं लांडगा बनला नसता. रोमन लोक जर गाय बनले आहेत तर तो सिंह बनला त्यांत काय नवल. अरे अग्नीचा अफाट

लोळ जिकडे तिकडे पसरावा असें ज्यांच्या मनांत असतें ते बारिकसारिक पाचोळ्याला प्रथम आग लावून आरंभ करीत नाहींत काय? अरे या सीझरासारख्या घाणेरड्या वस्तूला प्रकाशित करण्यापलीकडे ज्याअर्थी या रोम-मधील लोकांचा दुसरा कांहींच उपयोग नाहीं त्या-अर्थी हें रोमनगर ह्मणजे केवळ दुर्गंधीयुक्त घाणीचा उकिरडा होऊन राहिलें आहे. पण हायहाय, हे माझ्या दुर्दैवा, मला असें भलतीकडेच कोठें घेऊन चाललेंस? आपखुषीनें पारतंत्र्य पतकरणाऱ्या एखाद्या गुलामापुढें तर कदाचित हें मी बोलत नसेनना! असें असलें तर मग याचा जाब मला द्यावा लागेल हें मी जाणून आहें. पण मी सशस्त्र आहें; व संकटाची तर मला मुळींच पर्वा नाहीं.

**कॅस्का**—हें पहा, मी समजलों, तुह्मी हें कॅस्का याजला उद्देशून बोलत आहां; आणि मित्राशीं विश्वासघात करण्यांत आनंद मानून खिदिखिदि हसतो तो मनुष्य नव्हे. तर मग थांबा, हा घ्या माझा हात. आणि इतरांना आपल्याकडे वळविण्याच्या खटपटीला लागा; ह्मणजे सर्व दुःखांचें परिमार्जन होईल. या कामीं सर्वांहून अघाडी मारण्याला हा पहा मी एका पायावर उभा आहें.

**केशियस**—अरे तें तर ठरून चुकलें आहे. हें पहा,

कॅस्का तुला ठाऊकच असूं दे कीं या कृत्याचा शेवट सर्वांनीं माना डोलवाव्या असाच होईल. पण हें कृत्य थोडेंसें भयंकर आहे खरें व तें अत्यंत साहसाचेंही आहे. तथापि त्यांत माझ्या बरोबरीनें कंबर बांधून मदत करावयाला या रोमनगरांतील थोर मनाच्या कित्येक गृहस्थांना मी आपलेंसें करून घेतलें आहे. आणि मला वाटतें, ते यावेळीं पाम्पी महाराजांच्या वाड्याच्या देवडीवर जमून वाट पहात असतील. कायहो आजची रात्र भयंकर ही ! रस्त्यानें कोणी जात येत नाहीं, किंवा कसलीही हालचाल नाहीं, आणि अशा प्रसंगीं आह्मीं हातीं घेतलेल्या कृत्याप्रमाणेंच आकाशाचा वर्णही आह्मांला अगदीं अनुकूळ असा ह्मणजे आरक्तलाल व प्रज्वलीत झाला आहे.

**कॅस्का**—हें पहा, अंमळ अलीकडे लपून बसा. हा पहा, मोठ्या गर्दीनें इकडेच कोणी तरी येत आहे.

**केशियस**—अरे हा सिन्ना ! त्याच्या चालण्यावरूनच मीं त्याला ओळखला. तो तर आपला मित्र. ( सिन्ना प्रवेश करितो )

**केशियस**—सिन्ना, अरे इतक्या लगबगीनें चाललास तरी कोठें ?

**सिन्ना**—कोठें ह्मणजे तुह्मांला शोधावयाला. बरें पण तो कोण, मेटेलस सिंबरना ?

**केशियस**—छे, तो कॅस्का. आपल्या पैकींच तो एक आहे. आपण हातीं घेतलेल्या कामाला साहाय करणाऱ्या मंडळीं-पैकींच तो एक आहे. कायरे सिन्ना, मंडळी माझी वाट पाहत असतील, नाहीं ?

**सिन्ना**—वाः! कॅस्का आपल्या पैकींच आहे, हें पाहून मला आनंद वाटतो. कोणहो विचित्र रात्र आज ही. आज आम-च्यापैकीं दोघांतिघांनीं तर फारच अद्भुत चमत्कार पाहिले.

**केशियस**—पण आपले लोक माझी वाट पाहत आहेत कीं काय, मला सांग.

**सिन्ना**—होय. ब्रूटस याला जर तुह्मी आपल्या बाजूला वळवाल तर किती बहार होईल !

**केशियस**—सिन्ना हें पहा, तूं अगदीं स्वस्थ रहा. हा कागद घे आणि तो प्रेटरच्या खुर्चीवर नेमका पडेल अशा रीतीनें तो तेथें नेऊन टाक ह्मणजे तेथें तो ब्रूटसलाच सांपडेल; आणि हा त्याच्या खिडकींतून आंत टाक, आणखी हा जुन्या ब्रूटसच्या पुतळ्यावर मेणानें चिकटवून ठेव. इतकें केलेंस कीं लागलीच तूं पाम्पीच्या देवडीकडे जा. तेथें आह्मीं तुला भेटूं. बरें पण डेशियस ब्रूटस व ट्रेबोनियस हे दोघे तेथें आहेत काय ?

**सिन्ना**—हें पहा मेटेलस सिंबरवांचून सर्वजण तेथेंच

आहेत. तो मांत्र तुह्मांला शोधावयाला तुमच्या घरीं गेला आहे. बरें तर तुह्मीं सांगितल्याप्रमाणें या कागदांची नीट व्यवस्था करण्याकरितां मीं तिकडे जलदीनें चाललोंच.

( जातो. )

**केशियस**—कॅस्का चल, तूं व मी दिवस उगवण्यापूर्वींच ब्रूटसच्या घरीं जाऊन त्याला भेटूं. त्याला बहुतेक तीन हिस्से आपण आपलासा केला आहे. आणखीं एकदां आपण त्याला भेटलों कीं तो आपल्याला पूर्णपणें वश झालाच ह्मणून समजा.

**कॅस्का**—अहो सर्व लोक त्याला मनापासून पूज्य मानीत आहेत, व यामुळें, जी गोष्ट आपण केली तर महापातक ह्मणून समजतील ती तो आपणाला अनुकूल झाल्यावर मोठ्या योग्यतेची ठरेल.

**केशियस**—हें पहा, तो, त्याची योग्यता, व आपल्याला त्याची किती गरज आहे याचें महत्व या गोष्टी तुला अगदीं बरोबर समजल्याशा दिसत आहेत. चल तर आतां. ही पहा मध्यरात्र उलटून गेली, तर चांगलें उजाडलें नाहीं तोंच आपण त्याजकडे जाऊन त्याला जागा करूं ह्मणजे त्याच्या अनुकूलतेची किंवा प्रतिकूलतेची आपली खात्री होईल.

( जातात. )



पोर्शिया--आपले बेत आपण बिन दिक्कत मला सांगावे, ते मी कोणाशींही फोडणार नाहीं.

ज्यूलियस सीझर--अंक २ प्र. १ पृ. ६४

The Bombay Art Printing Works, Fort.

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—रोम नगर—ब्रूटस याची फळबाग.

( ब्रूटस प्रवेश करितो. )

**ब्रूटस**—काय! अरे ए ल्यूशियस, या ताऱ्यांवरून बोवा रात्र किती उरली हें मला कांहीं समजत नाहीं. अरे ए ल्यूशियस, हें पहा तुझ्यासारखें मला जर निष्काळजीपणानें घोरत पडतां आलें असतें तर किती छान झालें असतें. अरे ए ल्यूशियस, अरे तूं आतां उठणार तरी केव्हां? ए ल्यूशियस, हें पहा अरे जागा तरी झाला आहेस का?

**ल्यूशियस**—( प्रवेश करून ) मला तुह्मीच का हाका मारल्या?

**ब्रूटस**—अरे ल्यूशियस, जा, अगोदर माझ्या खोलींत मेणबत्ती लावून ठेव, पाहूं. आणखी ती ठेवलीस ह्मणजे इकडे येऊन मला सांग.

**ल्यूशियस**—ठेवतों महाराज. ( जातो. )

**ब्रूटस**—हो, तेव्हांच हें घडेल. तो मेला तरच रोमला पुन्हा स्वातंत्र्य प्राप्त होईल. आतां स्वतःच्या हिताच्या

दृष्टीनें जर पाहिलें तर मला यांत शिरण्याचें कारण दिसत नाहीं. मी जो ह्या भानगडींत शिरतों आहे तो लोकांच्या हिताकरितांच शिरतों आहें; नाहीं तर त्याच्याशीं माझें स्वतःचें वैर असण्याचें कारण कांहीं दिसत नाहीं. आपणाला राज्याभिषेक व्हावा अशी त्याची फार इच्छा आहे. पण तसें झालें तर त्याच्या स्वभावामध्यें कितपत फरक पडतो हें पहावयाचें. अहो लख्ख ऊन पडलें म्हणजे सर्प आपल्या बिळांतून बाहेर येतो; तेव्हां फार भिऊन वागावें लागतें; व त्याच्या आसपास वापर करणें झाला तर जपून करावा लागतो. सीझर याला राज्याभिषेक होणार आहे, आणि तो झाला ह्मणजे तो देशावर कांहींतरी भयंकर संकट आणील. ह्मणजे त्याला राज्याभिषेक केल्यानें दंश करण्याचें एक साधनच आपण होऊन त्याच्या हातीं दिल्यासारखें होणार नाहीं काय? मोठेपणाच्या घमेंडीखालीं अधिकाराचा दुरुपयोग होऊं लागला ह्मणजे सत्ता आणि दयाळूपणा यांची फाटाफूट होते; ती तशी होऊं देऊं नये हेंच उत्तम. आतां खरें ह्मटलें तर सीझरची वागणूक आजपर्यंत कधीं वाईट नाहीं. त्याच्या मनोविकारांचा समंजसपणावर पगडा बसला आहे, असेंही कधीं माझ्या पाहण्यांत नाहीं. हें जरी खरें आहे, तरी महत्वाकांक्षा मनांत उद्भवूं लागली ह्मणजे मनुष्यें प्रथम मोठी लीनता दाखवूं लागतात. म्हणजे लीनता ही नूतन महत्वा-

कांक्षेची शिडीच होय असें ह्मटलें तरी चालेल. तिच्यावर चढत जातांना चढणाराचें तोंड वर होतें. पण एकदां तो अगदीं शेवटल्या पायरीवर चढून गेला ह्मणजे लागलीच तो आपलें तोंड फिरवितो, व आकाशांतील मेघ मंडळाकडे दृष्टी फेंकून, आतांपर्यंत चढून गेलेल्या शिडीच्या पायऱ्यांकडे धिःकारयुक्त मुद्रेनें पाहूं लागतो. ही गोष्ट तर सर्वांसच ठाऊक आहे; आणि सीझरचें तरी असेंच होणार नाहीं ह्मणून कशावरून ? यासाठीं त्याचें असें होऊं नये ह्मणून आधींपासून सावधगिरी ठेवली पाहिजे असें आमचें ह्मणणें आहे. आह्मी जी कुरकुर करितों ती सीझर याची स्थिती आजच तशी आहे अशाविषयीं मुळींच नाहीं. ह्या प्रकरणाचा आह्मी अशा दृष्टीनें विचार करतों कीं आजची त्याची सत्ता जर अशीच वाढूं दिली तर तिचे असे असे परिणाम होतील व तिजपासून अशा अशा प्रकारचे अनर्थ या रोमराज्यावर गुदरतील. यासाठीं तो एक काळसर्पच होय असें समजून चाललें पाहिजे. अद्याप तो अंड्यांतच आहे हें खरें, तथापि अंडें फोडून बाहेर आला ह्मणजे आपल्या जातिधर्माप्रमाणें तो अपकारक होईल, यासाठीं त्याला अंड्यांतल्या अंड्यांतच मारून टाकावें हें चांगलें.

**ल्यूशियस**— ( पुनः प्रवेश करून ) महाराज आपल्या खोलींत मेणबत्ती लावून ठेविली आहे. खिडकीमध्यें चक-

मक शोधीत होतों तेव्हां हा लखोटा असाचे असाच बंद केलेला माझे हाताला लागला; आणि माझी खात्री आहे कीं मी निजावयाला गेलों त्यावेळीं हा कागद कांहीं तेथें नव्हता.

( त्याला लखोटा देतो. )

**ब्रूटस**—बरें, तूं जा, आणि पुन्हा हवा तर जाऊन नीज. अजून कांहीं उजाडलें नाहीं. कायरे मार्च मधील 'इडीज' सण उद्यांच नाहीं का ?

**ल्यूशियस**—मला ठाऊक नाहीं सरकार.

**ब्रूटस**—तर जा पंचांगांत पहा आणि मला येऊन सांग.

**ल्यूशियस**—होय जी सरकार. ( जातो. )

**ब्रूटस**—आकाशांतून उल्का पडत आहेत त्यांचा हा केवढा तरी प्रकाश ! त्याच्या प्रकाशांत मला हें पत्र खचित वाचतां येईल ( पत्र फोडून वाचूं लागतो. ) "अरे ब्रूटस ! तूं अजून निजून कसा राहिला आहेस ! जागाहो. तूं कोण आहेस हें नीट पहा तरी " " हे रोम नगरा बोल, ठोक, निवारणाचा उपाय काढ, अरे ब्रूटस असा निजून काय राहिला आहेस, जागा हो " अशा प्रकारचे लेख मला भर देण्याकरितां किती वेळां तरी माझ्या खोलींत टाकलेले मला सांपडले आहेत. " हे रोमनगरा बोल, ठोक, निवारणाचा उपाय काढ ..............." यापुढें सोडलेल्या

वाक्याची पूर्णता कशी करावी ? --मी तर अशी करितों. रोमनगराचें स्वामित्व ह्यापुढें एकाच माणसाच्या हातीं जाऊन, त्याच्या दराऱ्याखालीं तें चळचळां कांपत राहणार काय ? हे रोमनगरा ! टारकिन याला जेव्हां रोमनगराचा राजा ह्मणूं लागले, तेव्हां माझ्या पूर्वजांनीं त्याची भररस्त्यानें धिंड काढून त्याला हांकून लाविलें नाहीं काय ? " बोल, हाण, निवारणाचा कांहीं तरी उपाय काढ " अशी मलाच यांत स्पष्ट विनंति केलेली दिसत नाहीं काय ? असें असेल तर हे रोमनगरा, मी तुला वचन देतों कीं या गोष्टीला जर कांहीं तोड निघाली तर ब्रूटसच्या हातून जेवढें होईल तेवढें तो करण्यास सिद्ध आहे.

**ल्यूशियस**—( पुन्हा प्रवेश करून ) महाराज, मार्च महिन्याचे चवदा दिवस झाले.

(आंत दार कोणी ठोकतात.)

**ब्रूटस**—ठीक आहे. बरें दिंडीकडे जाऊन पहा, दार कोणी तरी ठोठावीत आहे. ( ल्यूशियस जातो.) केशियस यानें जेव्हां पहिल्यानें माझ्या मनांत सीझर याजविषयीं वैरभाव उत्पन्न केला तेव्हांपासून झोंप कशी ती मला माहीत नाहीं. अमुक एक भयंकर कृत्य करावयाचें असें मनानें घेतलें ह्मणजे तें घडे तोंपर्यंत मधला जो काळ जातो, तो विलक्षण आभासाप्रमाणें किंवा एखाद्या

भयंकर स्वप्नांत असल्याप्रमाणें जातो. अशा वेळीं मनुष्याचे मनोविकार व ईश्वर प्रेरित बुद्धि यांची गट्ठी जमते; आणि तेणेंकरून बंडाळी माजलेल्या लहानशा राज्याप्रमाणें मनुष्याची स्थिती होऊन जाते.

**ल्यूशियस**—( पुन्हा प्रवेश करून ) सरकार, आपले बंधु केशियस दरवाज्याजवळ उभे आहेत; व आपल्याला भेटण्याची त्यांची इच्छा आहे.

**ब्रूटस**—तो एकटाच आला आहे काय ?

**ल्यूशियस**—नाहीं सरकार, त्यांच्याबरोबर दुसरेही कोणी लोक आहेत.

**ब्रूटस**—ते कोण बरें असावे ? तुला ओळखतां येतात का ?

**ल्यूशियस**—नाहीं सरकार, त्यांनीं आपल्या टोप्या कानापर्यंत ओढलेल्या आहेत, आणि झग्यांनीं त्यांनीं आपलीं तोंडें अर्धीं मुर्धीं झांकून घेतलीं आहेत, यामुळें ते कोण हें मला सांगतां येत नाहीं.

**ब्रूटस**—बरें, तर त्यांना आंत येऊं दे.

( ल्यूशियस जातो. )

हे तर आमचे कटवाले. अरे हे गुप्त मसलत करणाऱ्या कटा! तुझें भयंकर वक्त्र तरी किती अकटोविकट आहे! ज्या रात्रीच्या वेळीं पृथ्वीच्या पाठीवर भयंकरपणा मूर्तिमंत

संचरत असतो, त्या रात्रीच्या वेळींही तुला आपलें हें भयंकर स्वरूप दाखवावयाला शरम वाटते काय ? असें आहे तर मग भरदिवसा तुझें हिडिस असें काळेंकुट्ट स्वरूप लपवून ठेवायला तुला निबिड अंधकाराची दरी तरी कोठून सांपडेल ? म्हणून अशा तऱ्हेची जागा धुंडीत न बसतां तूं आपलें हें हिडीस स्वरूप स्मितवदनानें व सौजन्यानेंच झांकून न्यावेंस हेंच बरें. कारण तूं आपल्या स्वाभाविक स्वरूपानेंच जर इकडे तिकडे वावरूं पाहशील तर तुझे बेत तुला कसे तडीस नेतां येतील ?

( केशियस, कॅस्का, डेशियस, सिन्ना, मेटेलस सिंबर व ट्रेबोनियस वगैरे कटवाले प्रवेश करितात. )

**कॅस्का**—आपण निजला होता, आणि आम्ही आपणाला उठवून त्रास दिला याबद्दल आम्हांस माफी असावी. नमस्कार हो ब्रूटस महाराज. आमच्या येण्यानें आपल्याला त्रास झाला असेल, नाहीं बरें ?

**ब्रूटस**—छेहो तसें कांहीं नाहीं मी तर सरासरी तासभर उठून बसलों आहें; व सर्व रात्रभरही जागाच आहें म्हणाना. तुमच्याबरोबर आलेली ही सर्व मंडळी माझ्या माहितीची आहेत काहो ?

**केशियस**—होय. त्यापैकीं प्रत्येक इसम आपल्या माहितीचा असून, आपल्या मोठेपणाबद्दल सर्वांच्या मनांत आदर-

बुद्धि वसत आहे. हें तर काय पण प्रत्येक रोमन गृहस्थ आपली जशी प्रशंसा करितो तशी यांतून प्रत्येक जणासही करावीशी वाटत आहे. हा पहा ट्रेबोनियस.

**ब्रूटस**—याचें स्वागत असो.

**केशियस**—आणि हा डेशियस ब्रूटस.

**ब्रूटस**—त्याचेंही स्वागत असो.

**केशियस**—हा कॅस्का, हा सिन्ना, आणि हा मेटेलस सिंबर.

**ब्रूटस**—त्या सर्वांचें स्वागत असो. कायरे बाबांनों, आजच्या या रात्रीं तुमच्या झोंपेमध्यें व्यत्यय आणणारी अशी कोणत्या प्रकारची काळजी उत्पन्न झाली आहे ?

**केशियस**—आपल्याला थोडी विनंती करूं काय ?

( ब्रूटस व केशियस एकमेकांच्या कानाशीं लागतात. )

**केशियस**—हीच पूर्व. इकडेच सूर्य उगवायचा; नाहीं काय ?

**कॅस्का**—छे.

**सिन्ना**—अहो गृहस्थ, माफ करा. इकडेच बरें उगवावयाचा. ते पहा पलीकडे पांढुरक्या प्रकाशानें ढग कसे चित्रविचित्र झालेले दिसत आहेत; तेच दिवसाचे पूर्वगामी दूत होत.

**कॅस्का**—तुह्मी दोघेही फसलांत असें तुह्मांला कबूल करावें लागेल. तो पहा, मी तलवार केली आहेना, या बाजूला

सूर्य उगवतो, आणि वर्षाच्या पहिल्या ऋतूला नुकताच आरंभ झाला असल्यामुळें तो दक्षिण दिशेकडे बराच वळलेला आहे. आतां येथून सरासरी दोन महिन्यांनीं वर उत्तरेच्या बाजूला त्याचीं किरणें दिसूं लागतील. ह्मणून मी तलवार धरिली आहेना ?—इकडे ह्मणजे कॅपिटोलच्या बाजूलाच खरी पूर्व दिशा आहे.

**ब्रूटस**—बरें, आतां तुम्ही सर्वजण एकामागून एक मला आपलीं वचनें द्या पाहूं.

**केशियस**—आणि आपणही आपला निश्चय असल्याबद्दल शपथा घेऊं.

**ब्रूटस**—छे, हो, शपथ कशाला ? ( दीनवाणी मुद्रा करून ) लोकांच्या चर्येवर खिन्नता पसरली आहे, जीवाला नाना प्रकारच्या यातना होत आहेत, सध्यां सर्वत्र शिष्टाचार सोडून जीं अनन्वित कृत्यें होऊं लागलीं आहेत—ह्या सर्व गोष्टी आपण डोळ्यांनीं धडधडीत पहात असतां, जर आपणास एक होतां येत नाहीं किंवा सर्वांचें एकमत होत नाहीं व एक व्हावयाला शपथा घ्याव्या लागत आहेत, तर मी म्हणतों आपण सर्वांनीं वेगवेगळेच असावें हें बरें नाहीं काय ?—मग एकत्र होतां कशाला ?—सांप्रतच्या जुलमाच्या प्रतिकाराची गोष्ट हवी कशाला ? तेव्हां मी ह्मणतों, आतां प्रत्येक-

जणानें आपापल्या घरीं जाऊन स्वस्थ निजावें आणि सांप्रत सुरू असलेला दांडगाईचा जुलूम खुशाल पाहिजे तसा चालूं द्यावा; मग ज्याच्या त्याच्या नशिबाप्रमाणें त्याचें जें काय होणार असेल तें होईल; परंतु मला खास वाटतें कीं भित्र्यांचीं मनें देखील प्रक्षुब्ध व्हावीं आणि स्त्रियांच्या कोमल हृदयांत देखील शौर्य उत्पन्न व्हावें असा कांहीं विलक्षण तेजस्वी गुण आपण हातीं घेतलेल्या कार्यांत आहे; आणि हा गुण जर त्या कार्यांत आहे, तर मग, हे देशबांधवहो, प्रतिकार करण्याच्या कामीं अन्य गोष्टीची टोंचणी लावून घेण्याचें आपणाला काय प्रयोजन आहे ? एकदां वचन दिलें ह्मणजे दिलें; मग रोमन गृहस्थ तें कधींही मोडावयाचा नाहीं. असें असतांना आपल्याला अंगीकृत कार्यामध्यें दुसऱ्या कोणत्या बंधनाची जरूर आहे ? आणि आम्ही अमुक अमुक कृत्य करूं असें म्हटलें एवढेंच नाहींतर त्यांत आपला शेवट झाला तरी बेहेत्तर असेंही आश्वासन देऊन सांगितलें—असें भाषण सज्जन ह्मणविणाऱ्या एका गृहस्थानें सज्जन म्हणविणाऱ्या दुसऱ्या गृहस्थाशीं केलें तर पुरे झालें नाहीं काय ? आणखी शपथ ती कशाला हवी ? शपथा वाहत बसणें भटाभिक्षुकांचें, क्लीबाचें शठांचें, ज्यांच्यामध्यें वीर्याचा अभाव झालेला आहे असल्या दुर्बळांचें, व अन्याय सोसण्याचें आंगवळणी पडून गेल्यामुळें जे को-

२।।९९।

णत्याही जुलुमाला नेहमी आपण होऊन पाचारण . करितात असल्या लोकांचें हें काम. ज्यांच्याविषयीं लोकांच्या मनांत नेहमीं संशय असतो तीं माणसें मात्र वाईट कर्मैं करावयास प्रवृत्त होऊं लागलीं म्हणजे बिनदिक्कत शपथा घेऊं लागतात. परंतु आपण जें हें धाडसाचें कृत्य शिरावर घेत आहों त्याची गोष्ट अशी नाहीं. हें कृत्य स्वभावतःच चांगलें आहे, पुण्यकारक आहे, मनाला उत्साह देणारें आहे, त्यांत शपथेच्या बंधनाची अट घालून त्याला काळीमा लावूं नका.—मनाला उन्नति देणारा त्यांतला गूण काढून टाकूं नका, हिंमत खचवूं नका; असें कराल तर तुम्ही आपल्याच तोंडानें आपल्या कर्माची निंदा केली असें होईल. आपण जें एकदां बोललों त्यांतून एक अक्षरही जर अपूर्ण राहिलें किंवा खोटें ठरलें, तर ज्या रोमन रक्ताच्या शुद्धत्वांविषयीं आपणा सर्वांस मोठा अभिमान आहे, त्या रोमन रक्तापासून हा भिन्न रक्ताचा आहे, अर्थात हा दोषी व पापी आहे असेंच समजलें पाहिजे.

**केशियस**—बरें, पण सिसरोविषयीं काय ? त्याचा कल कोणीकडे आहे हें पहावयास पाहिजे किंवा नको ? मला तर वाटतें तो आपलीच बाजू धरून राहील ?

**कॅस्का**—आपण त्याला वगळूं नये हें बरें.

**सिन्ना**—छे, छे, वगळूं नयेच.

**मेटेलस**—त्याला आपल्यामध्यें घेतलेंच पाहिजे; कारण असें केलें ह्मणजे लोक आपणाला नांवें ठेवणार नाहींत; किंबहुना वाखाणणीच करतील. मला तर वाटतें तरुणपणच्या आपल्या उच्छृंखल पणावर त्याच्या गंभीर वृत्तीनें पांघरूण पडेल. आणि त्याच्याच आज्ञेवरून आपण सर्व गोष्टी केल्या असें लोक ह्मणूं लागतील.

**ब्रूटस**—छे, छे, तें नाहीं कामाचें. त्याचें नांव अगदीं घेऊं नका. आपले बेत त्याला कळतां कामा नयेत बरें; कारण इतरांनीं आरंभिलेल्या कोणत्याही गोष्टींत तो शिरावयाचा नाहीं.

**केशियस**—हें खरेंच मग राहूंद्या त्याला.

**कॅस्का**—खरेंच बुवा, तो कांहीं आपल्या उपयोगाचा नाहीं.

**डेशियस**—काय काय काय म्हणालां ? सीझरवांचून आणखी कोणालाही स्पर्श करावयाचा नाहीं कीं काय ?

**केशियस**—वा: ! ठीक बोललास. सीझराचा अत्यंत प्रिय मित्र म्हटला म्हणजे मार्क ॲन्टनी. मग त्याला तरी मागें ठेवून काय करावयाचें आहे ?—त्यानेंही मागें रहावें, असें मला वाटत नाहीं—पक्का आंतल्या गांठीचा आहे

बरें. पक्कें लक्षांत ठेवा कीं आपण काय करणार आहों, कसें करणार आहों, कशारीतीनें करणार आहों, या गोष्टींचा वास जर का त्याला लागला तर त्याचा छडा तो आपल्या पर्यंत आणून पोंचवील, आणि मग आपणास जड गेल्यावांचून राहणार नाहीं. मग हा त्रास चुकवावयाचा असेल, तर मी म्हणतों, कीं सीझरा बरोबर त्यालाही लोळवावा म्हणजे झालें.

**ब्रूटस**—( केशियस यांस उद्देशून ) छे तूं म्हणतोस तसें केलें तर तें फारच घातकीपणाचें कृत्य होईल. अगोदर डोसकें उडवावयाचें आणि मागाहून एकेक अवयव तोडावयाचा—हें खाटकाचें काम; तें आपण पत्करून, क्रोधानें सीझराला अगोदर ठार केला आणि लगेच त्याच्या अनुयायी मनुष्यालाही उडविलें, तर हें तसेंच झालें नाहीं काय? कारण अॅन्टनी हा त्याचा अनुयायी आहे.किंबहुना त्याचा अवयवच आहे. तेव्हां खाटीक ह्मणवून घेण्यापेक्षां सत्कार्यासाठीं देवतांना बळी देणारे उपासक ह्मणवून घेणें बरें. आपण जें हत्यार उपसलें आहे तें केवळ सीझराचा प्रभाव ह्मणजे सीझरशाही नाहींशी करण्याकरितां उपसलें आहे; इतर साधारण माणसांना नाहींसें करण्याकरितां नव्हे. खरोखर, सीझर याचें शरीर छिन्न भिन्न न होतां, त्याची तेजस्विता मात्र लोपवून टाकितां येईल तर किती बरें

होईल! पण हाय हाय ! असें कोठून होईल ? तेवढ्याकरितां सीझरच्या शरीरांतून रक्त वाहिलेंच पाहिजे. तर भले मित्र हो, क्रोधास चढून, आवेशानें त्याचे तुकडे तुकडे न करितां, आपण शौर्यानें दोन हात करून, त्याला ठार करूं; आणि त्याचें प्रेत कुत्र्यांकडून न फाडवितां, आपण देवतांना त्याचा बळी देऊं ह्मणजे व्यवहारचतुर धनी जसा आपल्या चाकरांना कांहींएक त्वेषाचें काम आधीं करावयास लावतो, आणि मागाहून तुह्मी असें केलें ह्मणून त्याजवर चडफडतो व आपणाकडे वाईटपणा येऊं देत नाहीं; त्याचप्रमाणें त्या तुमच्या हृदय वृत्तींनांही करूंद्या; ह्मणजे त्यांचे नोकर जे शरीराचे अवयव त्यांना चेतवून त्यांजकडून त्या वृत्ति हें वधाचें कृत्य करवितील आणि स्वतः त्या दोषां पासून व त्या नीचपणापासून मुक्त राहतील. याच न्यायानें आपण वागलों, ह्मणजे घेतलेलें कार्य आपण कांहीं मत्सरबुद्धीनें केलें नाहीं, तर केवळ अत्यंत जरूरी मुळेंच आपल्याला तें करावें लागलें असें सर्वांस वाटेल; आणि आपण खून करणारे नाहीं तर जी गोष्ट योग्य आहे तीच करणारे आहों असें ते समजतील. ह्यासाठीं मी ह्मणतों, आतां मार्क ॲन्टनीची गोष्ट अगदीं सोडून द्या. अहो, सीझरचें डोकें तुटून गेल्यावर त्याच्या ह्या हातानें काय व्हावयाचें आहे ?

**केशियस**—तरी मला बोवा, त्याची भीति वाटते. कारण, सीझरच्या ठिकाणीं त्याचें अत्यंत प्रेम जडलें असल्यामुळें—

**ब्रूटस**—छे हो ! त्याच्यासंबंधानें तुह्मी मुळींच कांहीं मनांत आणूं नका. सीझरावर त्याचें कितीही प्रेम असलें व त्याचे भरांत त्यानें कांहीं केलें तरी त्यांत कांहीं अर्थ नाहीं. फार झालें, तर, खिन्न होऊन, हायहाय करीत सीझरसाठीं तो प्राण सोडील; आणखी काय ? अहो, मला पुरे ठाऊक आहे कीं तो वाईट लोकांच्या संगतींत, ऐष-आरामांत व बदफैलींत शिरलेला मनुष्य आहे.

**ट्रेबोनियस**—त्याची मुळींच धास्ती नको. त्याला मारून काय करावयाचें आहे ?

( घड्याळ वाजतें. )

**ब्रूटस**—ऐका, किती वाजले हे ?

**केशियस**—तीन वाजले.

**ट्रेबोनियस**—तर आतां आपल्याला गेलें पाहिजे.

**केशियस**—तें खरें, पण आज सीझर बाहेर पडेल कीं नाहीं याची शंका वाटते. कारण अलीकडे तो अगदीं थोतांड माजविणारा व अधार्मिक असा होत चालला आहे. विचित्र चमत्कार, स्वप्नें आणि शकून यासंबंधानें त्याचा पूर्वीं जो ग्रह होता तो पालटला असून, त्यांजवर तो विश्वास ठेवूं लागला आहे. रात्रीं जीं भयानक

दुश्चिन्हें आपण पाहिलीं तशीं पूर्वीं कधींही कोणाच्या पाहण्यांत आलीं नसतील; त्यामुळें व शकुन सांगणाऱ्या भाषणावरून तो आज कदाचित् कॅपिटोलकडे येणारही नसेल.

**डेशियस**—त्याची तर तुम्हांला मुळींच धास्ती नको. त्याचा जर असा बेत ठरला असला तर मी तो फिरवून टाकीन. अहो झाडाच्या आड उभें राहून गेंड्यांना, आरशाच्या योगानें अस्वलांना, खळगे खणून ठेवून हत्तींना, जाळ्यांच्या योगानें किंवा पिंजऱ्याच्या योगानें सिंहांना, त्याचप्रमाणें तोंडपुज्यांच्या कुर्रेबाज सहाय्यानें माणसांना सहज फसवितां येतें. आतां अशा प्रकारच्या गोष्टी ऐकण्याची त्याला फार हौस आहे; " परंतु आपण तोंडपुजांचा तिरस्कार करतां " असें जेव्हां मी त्याला सांगतों, तेव्हां " होय मी तसें करितों खरेंच. " असें त्यांवर तो म्हणतो, पण असें म्हणतांनाच मुळीं तोंडपुजेपणाला भुलून कसा फसतो हें त्याला कळत नाहीं. तेव्हां ह्या बाबतींत मी आपला उद्योग सुरू ठेवितों मग सहजच तो आपल्या मूळच्या वळणावर जाऊन कॅपिटोलकडे येईल. हें माझें काम आहे.

**केशियस**—असें नको. आपणच सर्वजण जाऊन त्याला घेऊन येऊं.

**ब्रूटस**—बरें, तर आठ वाजतांच आपण जाऊं—पण सकाळीं त्यावेळीं म्हणजे फार उशीर तर नाहींना होणार ?

**सिन्ना**—उशीरां कां होईना ! पण त्या वेळीं तरी चुकूं नका म्हणजे झालें.

**मेटेलस**—लिगॅरस यानें पाम्पी महाराजांना चांगलें म्हटलें, एवढ्यावरून सीझर त्याला फार रागें भरला; तेव्हांपासून लिगॅरस हा सीझरला पाण्यांत पाहतो, हें तुमच्या कोणाच्या लक्षांत नाहीं वाटतें ? त्याच्याविषयीं तुम्ही कोणीं कांहींच विचार केला नाहीं, किंवा कांहीं बोलत नाहीं याचें मला आश्चर्य वाटतें.

**ब्रूटस**— हें पहा, तूं ह्मटलेंस तें खरें. माझ्यावर त्याचें चांगलें प्रेम आहे; आणि तसें असण्याला कारणेंही आहेत; तेव्हां तूं त्याचे घरीं जा आणि त्याला माझ्याकडे पाठवून दे; ह्मणजे मी त्याला चांगला तयार करीन.

**केशियस**—हें पहा उजाडलेंच. तेव्हां आह्मीं आतां येथून जातों. मित्रांनों, आतां आपापल्या उद्योगाला लागा. पण तुह्मीं सर्वांनीं काय वचन दिलें आहे याची मात्र नीट आठवण ठेवा, व खऱ्या रोमन गृहस्थाला शोभेल अशाच रीतीनें वागा.

**ब्रूटस**—सदगृहस्थहो, आतां चांगलें हुशारीनें व आनंदवृत्तीनें रहा, आपल्या चेहऱ्यावरून आपल्या मनांतील हेतू

समजूं देऊं नका. तर नाटकगृहांत नटांच्या मुखचर्येवर ज्याप्रमाणें आनंदवृत्ति व चित्ताची स्वस्थता दिसून येते त्याप्रमाणेंच तुह्मीही ती दाखवा. ठीक आहे, तर आतां सर्वांनीं यावें.

( ब्रूटस् वांचून सर्व मंडळी जातात. )

**ब्रूटस**—हा पहा ल्यूशियस, इकडे खुशाल घोरत पडला आहे. बरें, चिंता नाहीं; तूं प्रातःकाळीं मिळणाऱ्या साखर झोंपेच्या मधुर कणांचें यथास्थित सेवन कर. चित्ताला सदोदित व्यग्र करणाऱ्या चिंतेनें मनुष्यांच्या मनांत उद्भवणारे कल्पना तरंग व विलक्षण भावना यांचा तुला गंधही नाहीं, म्हणूनच तुला इतकी गाढ निद्रा आली आहे.

( पोर्शिया प्रवेश करिते. )

**पोर्शिया**—प्राणनाथ !

**ब्रूटस**—प्रिये, तुझें काय ह्मणणें आहे बरें ? इतक्या लवकर तूं कां बरें उठलीस ? अग अशा या सकाळच्या गारठ्यांत बाहेर पडणें हें कांहीं तुझ्या नाजुक प्रकृतीला सोसणार नाहीं.

**पोर्शियां**—आपल्या प्रकृतीला तरी सोसवेल का ? महाराज, मला नकळत आपण बिछान्यावरून इकडे निघून कां आलां ? तर मजवर ही अशी अवकृपा कां केली ? आणि पाहिलें तों काल रात्रीं जेवणाच्या वेळींही आपण

एकाएकीं मधूनच उठलां, व छातीवर आपले हात असे धरून, आपण विचारांत निमग्न झालां, व उसासे टाकीत इकडून तिकडे हिंडूं लागलां; आणि असें कां कारितां असें त्यावेळीं मी आपल्याला विचारलें तेव्हां आपण माझ्याकडे नुसतें रागानें पाहूं लागलां. मी पुन्हा आपल्याला विचारलें, पण त्यावेळीं आपण आपलें मस्तक खाजविलें, व अतीशय उत्कंठेनें पाहून आपण जोरानें पाय आपटला. इतकें झालें तरीही मी पुन्हा आपल्याला आग्रहानें विचारिलें असतां, आपण कांहींएक उत्तर न देतां, रागानें मला झिडकारल्यासारखें करून, मीं तेथून निघून जावें ह्मणून हातानें खूण केली. मग आपला राग कदाचित अतिशयच विकोपाला जाईल अशा भीतीनें मी तेथून निघून आलें. पण माणसाची प्रकृती कधींकधीं कारणावांचूनही अतिशय तापते; तशीच आपलीही तप्त झाली असेल असें त्यावेळीं मला वाटलें. असला राग आपल्याला खाऊं देणार नाहीं, बोलूं देणार नाहीं, कीं झोपही घेऊं देणार नाहीं, आणि अशा रागानें आपल्या मनाला जसें व्यापलें आहे तसाच आपल्या शरिरावरही जर त्याचा परिणाम झाला, तर महाराज, माझ्यानें बाई आपल्याला ओळखवणार देखील नाहीं. ह्मणून, म्हणतें प्राणनाथ, आपण मला आपल्या दुःखाचें कारण कायतें कळूं द्यावें.

**ब्रूटस**——अग कारण कशाचें आलें आहे? त्यांत माझी प्रकृति बरी नाहीं येवढेंच कायतें.

**पोर्शिया**——महाराज आपली प्रकृती बरी नसेल हें खरें; पण ती सुधारण्यासाठीं काय काय उपाय करणें जरूर आहे, तें महाराज जाणत नसतील असें नाहीं.

**ब्रूटस**——होय, तें सर्व मी जाणतों. आतां तूं जाऊन नीज जा.

**पोर्शिया**——महाराज आपली प्रकृती बरी नाहीं असें असतांना, अंगांतल्या कपड्याचे बंद वगैरे न बांधतां, उघड्यावर हिंडणें व असली ही गारठ्याची हवा अंगावर घेणें, हितावह आहे का? महाराजांची प्रकृती बिघडलेली असतांना, हितकर शय्येवरून उठून, रात्रीच्या या अशुद्ध रोगट हवेंत फिरून, प्रकृती अधीकच बिघडून घेणें चांगलें का? छे, छे, महाराज हें कांहीं बरें नाहीं. मला तर वाटतें कीं आपल्याला कांहीं तरी मानसिक व्यथेपासून पीडा होत आहे. आणि आपणाशीं माझा जो संबंध आहे, त्याचा विचार केला असतां, व त्यावरून जो हक्क मला प्राप्त होतो त्याचाही विचार केला असतां, आपणाला अशी कोणती पीडा होत आहे, तें मला कळलें पाहिजे. माझ्या सौंदर्याची आपण केलेली प्रशंसा, मजवरील आपल्या प्रीतीविषयीं आपण घेतलेली

शपथ, व ज्याच्या योगानें आपले उभयतांचे जीव एकरूप झाले आहेत अशाविषयीं वेळोवेळीं बोललेलीं भाषणें, या सर्वांची आपल्याला आठवण देऊन, मी दोन्हीं हात जोडून, शपथ घालून विचारतें कीं आपण असे उद्विग्न कां झालां ? आपणाकडे आज रात्रीं कोण लोक आले होते ? येवढें आपण कृपा करून आपल्या प्राणाला—आपल्या या अर्धांगीला सांगाल काय ? अशा या काळोख्या रात्रीं आपलीं तोंडें झांकून घेऊन सात आठजण कोणी तरी येथें आले होते खरे.

**ब्रूटस**—अहाग प्रिये, येवढ्यासाठीं हात जोडावयाला ते कशाला हवेत ?

**पोर्शिया**—आपणाला मी जर खरोखर प्रिय असतें, तर मला हात जोडण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें. विवाह संबंध झाला म्हणजे आपल्या संबंधाच्या गोष्टी मला कळूं नयेत, असा त्याचा अर्थ झाला कीं काय ? मीं आपली झालें, म्हणजे आपला प्राण झालें, अर्थात् केवळ आपल्या बरोबर खाणें, आपल्या बरोबर पिणें व आपल्याला शय्यासुख देणें, व कधीं कधीं आपल्याशीं बोलणें येवढीच कायती माझ्या अधिकाराची सीमा समजावयाची काय ?

**ब्रूटस**—प्रिये, तूं माझी मान देण्यास योग्य अशी धर्मपत्नी असून, माझ्या शोकाकुल हृदयांत धडधड शब्द

करणारें लालरक्त जसें माझ्या जीवनाला आवश्यक आहे तशीच तूंही आहेस.

**पोर्शिया**—आपणम्हणतां हें जर खरें, तरमग ही गुप्त गोष्ट मला समजूं नये काय? मीं स्त्री आहें,-नाहीं म्हणत नाहीं,तरी पण ब्रूटस महाराजांनीं भार्या म्हणून जिचा अंगिकार केला आहे अशी स्त्री मीं आहें. महाराज मीं एक अबला आहें हें तर खरेंच, तरीही मी केटोची कन्या आहें. आणि सद्गुणी म्हणून माझी सर्वत्र ख्याति आहे. अशा गृहस्थाच्या पोटीं जन्म घेतला असून व आपल्या सारख्या गृहस्थानें माझें पाणिग्रहण केलें असून, माझ्या बरोबरीच्या इतर अबलांहून मी फार श्रेष्ठ आहें, असें आपल्याला वाटत नाहीं काय ? म्हणून मी म्हणतें कीं आपले जे बेत असतील ते आपण बिनदिक्कत मला सांगावे, ते मी कोणालाही कळूं द्याव- याची नाहीं. मी स्वतःच माझ्या हातानें या माझ्या मां- डीला जखम करून घेतली. तिचें दुःख मी स्वस्थ चित्तानें कसें सोशीत आहें हें आपणाला ठाऊक आहे ना ? तेव्हां माझ्या स्थिर मनाचें व धैर्याचें हें एक प्रत्यंतरच आपल्या- समोर असतांना माझ्या प्राणनाथाचीं कारस्थानें माझ्यानें गुप्तपणें राखवणार नाहींत काय ?

**ब्रूटस**—स्वर्गस्थ देवतांनों, या माझ्या सुशील व थोर म- नाच्या भार्येला मी शोभेन अशीच वागणूक मजकडून क-

रवा. ( आंतून कोणी दार ठोठावतें. ) ऐकलेंस ? कोणी तरी दार ठोठावीत आहे, तेव्हां सध्यां तूं क्षणभर आंत हो. थोड्याच वेळांत माझ्या अंतःकरणांत वास करीत असलेलें रहस्य तुला कळेल. माझ्या मनाला व्यापून टाकणारे सर्व विचार, माझ्या चर्येवरील शोकाचीं चिन्हें, ह्या सर्वांचा उलगडा मीं तुला लवकरच करीन. जा; चटकन आंत जा कशी. ( जाते. ) कायरे ल्यूशियस, दार कोण ठोठावीत आहे ? पहावें.

**ल्यूशियस**—( लिगॅरियस याला बरोबर घेऊन येऊन प्रवेश करितो. ) हा एक अजारी मनुष्य आहे; आपल्याशीं दोन शब्द बोलावे अशी त्याची इच्छा आहे.

**ब्रूटस**—मेटेलस म्हणत होता तोच हा लिगॅरियस काय? बरें तर असा इकडे एका बाजूला ये. कायहो कसें काय आहे ?

**लिगॅरियस**—महाराज, या दुर्बल झालेल्या जिव्हेनें उच्चारलेला माझा 'राम राम' आपण स्वीकारावा.

**ब्रूटस**—अरेरे अजारी पडून रुमालानें डोकें बांधायला तूं ही अशी भलतीच वेळ बरी शोधून काढलीस !

**लिगॅरियस**—छे हो, तसें कांहीं नाहीं. महाराजांनीं पराक्रम करून नांव गाजविण्याची कामगिरी हातीं घेतली असेल, तर मात्र मी मुळींच आजारी नाहीं.

**ब्रूटस**—मी काय म्हणतों तें ऐकण्याला तुझें कर्णेंद्रिय सशक्त माणसाप्रमाणें जर चांगलें शाबूत असलें, तर मी सांगतों कीं तसें एक काम मी खरेंच हातीं घेतलें आहे.

**लिगॅरियस**—ज्यांना ज्यांना म्हणून रोमनलोक प्रणाम करितात, त्या त्या देवांची शपथ घेऊन मी सांगतों कीं, हें पहा माझें दुखणें संपलें. अहो महाराज, ह्या तमाम रोम नगरीला प्राणभूत झालेले जे पुरुष आहेत, त्या सर्वांत आपण श्रेष्ठ आहां; ह्या रोमनगरीचे आपण एक प्रतापवान सत्पुत्र आहां. आपण उत्तम कुळांत जन्म घेतला आहे. काय सांगावें महाराज! आपण एखाद्या महामांत्रिकाप्रमाणें माझ्या हताश झालेल्या हृदयाला स्फुरण देऊन, मृतप्राय शरिरांमध्यें क्षणांत कीं हो चैतन्य आणलें! आतां आपण वाटेल ती आज्ञा करा, ती शिरसावंद्य करून, कितीही अवघड गोष्ट असली तरी ती करून दाखवावयाला मी तयार आहें. तयारचसा काय ती केलीच म्हणून समजा. काय करूं, बोला?

**ब्रूटस**—आणखी तें काय करावयाचें? जेणेंकरून रोगग्रस्त माणसें रोगमुक्त होतील असें करावयाचें.

**लिगॅरियस**—पण जे कोणी चांगले सदृढ, निरोगी, धट्टेकटे, धटिंगण असतील त्यांना आजारी पाडून टाकावयाचें नाहीं का?

**ब्रूटस**—होहो, आपल्याला तसेंही करायचें आहे. आतां ज्याच्यावर हा प्रयोग करावयाचा, त्याच्याकडे जातांना आपण काय काय केलें पाहिजे हें मी तुला सर्व उघड करून सांगेन.

**लिगॅरियस**—ठीक आहे; चला तर. माझ्या अंगीं नवी-नच प्रगट झालेल्या उत्साहानेंच मीही पण आपल्या मागो-माग येतों. चला कोणतें कृत्य करावयाचें तें मला न कळेना, मला त्याची पर्वा नाहीं. ब्रूटस महाराज माझे मार्गदर्शक आहेत येवढें मला पुरे आहे.

**ब्रूटस**—चल, ये माझ्या मागून.

(जातात)

## प्रवेश २ रा.

**स्थळ**–सीझरचा वाडा.

( मोठी थोरली मेघगर्जना होते व विजा चमकूं लागतात अशावेळीं सीझर प्रवेश करितो )

**सीझर**—काय असेल तें असो, आजच्या या रात्रीं आका-शांत किंवा पृथ्वीवर कोठेंच कांहो शांतता नाहीं! हीच पहाना "धांवाहो धांवा, सीझर महाराजांना कोणी मारीत आहे" असें ओरडत कॅलपर्निया झोपेंतून तीनदां उठली-आंत कोण आहेरे तो?

(एक चाकर प्रवेश करून)

**चाकर**—जी सरकार.

**सीझर**—जा; लवकर जाऊन, बलिदान करा ह्मणून उपाध्यायांना सांग. आणि देवानें काय कौल दिला ?—मला त्यांत यश आहे कीं नाहीं, याविषयीं त्यांचें काय ह्मणणें आहे तें मला येऊन कळीव.

**चाकर**—जी सरकार. (जातो.)

**कॅल्पर्निया**—(प्रवेश करून) महाराज! आपण काय मनांत आणलें आहे ? बाहेर पडण्याचा आपला बेत झाला आहे कीं काय ? पण मी सांगतें, आज आपण वाड्यामधून मुळींच जातां कामा नये.

**सीझर**—बस! आह्मी जाणार. ज्या अपशकुनांनीं मला भय घातलें आहे ते माझ्या पाठीमागें काय करतील तें करोत; पण एकदांका त्यांनीं सीझरचें मुखावलोकन केलें ह्मणजे ते नष्टप्राय झालेंच ह्मणून समज.

**कॅल्पर्निया**—महाराज बऱ्या वाईट शकुनांची मी कधींच पर्वा केली नाहीं, तरी सध्यां ते मला भय दाखवीत आहेत. आपण शेंकडों विचित्र गोष्टी ऐकल्या व पाहिल्याही; पण त्या कांहींच नव्हत अशी एक भयंकर गोष्ट पहारेकऱ्यानें पाहिल्याचें तो सांगत आहे. अहो! भर रस्त्यांत एक सिंव्हीण व्याली आहे; थडगीं दुभंगलीं आहेत व

त्यांतील मृत माणसें मोकळीं झालीं आहेत. रणभूमीवर आपलीं सैन्यें व्यवस्थित रीतीनें उभीं करून, भीषण स्वरूपी कोणी वीर मेघ मंडळामध्यें युद्धाला सिद्ध झाले आहेत. व पुढें त्या युद्धांत वाहूं लागलेल्या रक्ताचा वर्षाव कॅपिटोल सभेवर होत आहे. युद्धांत सोडलेल्या अस्त्रांचा ध्वनि-प्रतिध्वनि हवेंत उठून दशदिशा दणाणून गेल्या आहेत. घोडे किंकाळत आहेत. मृतप्राय झालेलीं माणसें कण्हत आहेत. आणि रस्त्यांतून भुतें किंकाळ्या फोडीत आहेत. असे अद्भुत प्रकार त्यानें आपल्या डोळ्यांनीं पाहिले असें तोच ह्मणत आहे. महाराज, मला तर वाटतें असल्या या विपरीत गोष्टी आपल्या कल्पन पलीकडच्या आहेत; नाहींत काय ? मला त्यांची बाई भारी भीती वाटते.

**सीझर**—हें पहा, ह्या गोष्टी सर्व शक्तिमान देवानेंच जर घडवून आणण्याचें योजिलें असलें तर त्या कोण टाळील ? कांहीं असो. सीझर हा आज कांहीं गेल्यावांचून राहणार नाहीं. हे अपशकुन जसे इतर लोकांना बरे वाईट आहेत तसेच ते मला बरे वाईट आहेत. त्यांच्यांत मला विशेष तें काय ?

**कॅल्पर्निया**—तें खरें. पण ज्या वेळीं भिकारी मरतात त्यावेळीं कांहीं कोठें शेंडेनक्षत्रें उगवलेलीं दिसत नाहींत.

तथापि राजांच्या मरणकालीं सर्व तारांगणामध्यें जसा कांहीं भडका उडतो.

**सीझर**—अशानें भिणारा मी भित्रा नाहीं. अग, खऱ्या मरणाच्या आधींच भित्रे लोक कितीदां तरी मरत असतात, नाहींत का? पण शूरांना मरणाचा अनुभव कायतो एकदांच? मरण तर कोणालाही सुटलें नाहीं. तें यावयाचें असेल तेव्हां येईल. पण त्याच्या भीतीनें माणसांनीं घाबरून जावें, हें आश्चर्य नव्हे का? खरोखर या गोष्टीचें जेवढें आश्चर्य वाटतें तेवढें इतर कोणत्याही गोष्टीचें वाटणार नाहीं.

( चाकर पुन्हा प्रवेश करितो. )

**सीझर**—कायरे, शकुनज्ञांचें काय ह्मणणें आहे ?

**चाकर**—सरकार, आज आपण बाहेर जाऊं नये असें त्यांचें ह्मणणें आहे. बळी दिलेल्या पशूंचीं आंतडीनीं आंतडीं काढून पाहिलीं, पण बळीच्या पोटांत काळीज कसें तें हाताला लागलें नाहीं.

**सीझर**—मी सांगतों मनुष्यांना आपल्या भित्रेपणाची लाज वाटावी, ह्मणून देव कधीं कधीं तसें करीत असतील. अहो! जर सीझर आज भिऊन घरीं राहिला, तर त्यालाही काळीज नसलेला पशुच ह्मटलें पाहिजे! छे, छे, सीझर तसें कधींही करणार नाहीं. लोक ह्मणतात संकटें भय-

कर; परंतु सीझर त्यांहूनही भयंकर हें पक्कें लक्षांत ठेवा. संकटांची काय बिशाद! अरे जारे! संकटें आणि मी एका तिथीवर व एका नक्षत्रावर जन्मास आलों आहों! आह्मी सिंह आहों आणि त्याच्यांत मी वडील सिंह आहें. माझ्या एवढा भयंकर कोण आहे! हा पहा सीझर चालला!

**कॅल्पर्निया**—हाय हाय, महाराज! आपल्या धृष्टतेपुढें आपल्या बुद्धीचा लोप होत आहे! नको नको! आपण आज जाऊं नयेच! आपल्याला भीती वाटते ह्मणून नव्हे, तर मला भीति वाटत आहे ह्मणूनच आपण आज घरीं राहिलें पाहिजे असें आपण समजा. तेव्हां, आपण मार्क ॲन्टनी याजलाच कॅपिटोल सभेमध्यें आज पाठवूं म्हणजे तोच तुमची प्रकृती बरी नाहीं म्हणून सभासदांना सांगेल म्हणजे झालें; महाराज, मी पदर पसरतें. येवढें माझें मागणें मान्य करा.

**सीझर**—बरें आहे. तूं म्हणतेसच तर माझी प्रकृती नीट नाहीं असें मार्क ॲन्टनी जाऊन सभासदांना सांगेल. केवळ तुला बरें वाटावें एवढ्याच साठीं मी घरीं राहतों. (डेशियस प्रवेश करितो.) हे पहा डेशियस ब्रूटस आले! हे सुद्धां जाऊन सांगतील.

**डेशियस**—महाराजांचा जजजयकार असो. नृपश्रेष्ठा! मी वंदन करितों. आपल्याला राजसभेंत बोलावण्यासाठीं मी आलों आहें.

**सीझर**—तूं तर अगदीं वेळेवर आलास. आतां तूंच जाऊन सांग कीं सर्व सभासदांचें मी अभिनंदन करितों. व आज मी तिकडे कांहीं येत नाहीं.—" माझ्याच्यानें येववत नाहीं " असें म्हटलें तर मी खोटें बोललों असें होईल. आणि येण्याला माझी छाती होत नाहीं असें म्हटलें तर तें त्याहूनही खोटें—निव्वळ खोटें ! तेव्हां येण्याची माझी मर्जी नाहीं असेंच तूं त्यांना सांग जा.

**कॅल्पर्निया**—अहो, महाराज आजारी आहेत असेंच म्हणा.

**सीझर**—सीझर कधीं खोटें सांगेल काय ? आजच्या सारख्या प्रसंगीं कॅपिटोल सभेंतील वृद्ध गृहस्थांना खरी गोष्ट कायती सांगण्याला मी भ्यावें, हाच का मी केलेला दिग्विजय ? जा ! डेशियस, सीझरची येण्याची मर्जी नाहीं असेंच त्यांना सांग जा.

**डेशियस**—महा प्रतापवान् नृपश्रेष्ठा ! आपण कृपा करून याचें कारण काय तें कळूं द्यावें. तुम्ही सांगतां तसें मोघम त्यांना सांगितलें तर ते मलाच हंसतील.

**सीझर**—त्यांत कारण कशाचें आलें आहे ! बस, आमची मर्जी ! मी येत नाहीं. येवढ्यानें त्यांची समजूत पडेल. पण ज्या अर्थी माझें तुझ्यावर प्रेम आहे, त्याअर्थी मी तुला असें सांगतों कीं माझी कॅल्पर्निया मला जाऊं नका म्हणते म्हणून मीच येत नाहीं. गेले रात्रीं तिनें स्वप्नामध्यें

माझा पुतळा पाहिला; त्यांतून कारंज्याप्रमाणें शुद्ध रक्ताच्या शेंकडों धारा वाहत होत्या. त्या रक्तांत कित्येक उन्मत्त झालेल्या रोमन लोकांनीं आपले हात माखून घेतले.—आणि या गोष्टी ह्मणजे पुढें येणाऱ्या संकटांचीं पूर्वगामी चिन्हेंच आहेत असें ती समजते. कारण हे निवळ अपशकून होत असें आपलें तिच्या मनानें घेतलें आहे. आणि ह्या अपशकुनांनीं तिचें मन येवढें गांगरून गेलें आहे व ती येवढी शोकाकुल झाली आहे कीं, काकुळतीनें माझ्यापुढें पदर पसरून, मला ह्मणते तुह्मी आज जाऊं नका, घरीं रहा. हा तिचा आग्रह माझ्यानें मोडवत नाहीं.

**डेशियस**—यांत काय आहे ? हा त्यांनीं आपला कांहीं तरी अर्थ केला. मला तर वाटतें त्यांना झालेला हा कल्पनासृष्टींतील आभास, मोठाच शुभप्रद व मंगलसूचक होय. आपल्या पुतळ्यांतून ज्या रक्ताच्या चिळकांड्या उडालेल्या त्यांनीं पाहिल्या, त्यांत रोमन लोकांनीं आपले हात माखले याचा अर्थ मी असा समजतों कीं, आपल्यापासून तमाम रोमनगराला नव्या दमाचें रक्त प्राप्त होऊन, त्यांच्यांत नवी वीरश्री उत्पन्न होईल व थोर थोर रोमन गृहस्थ त्या रक्ताचें एक बोट तरी आह्मांला मिळूं द्या ह्मणून खटपटी करितील, त्याचा अंशही ज्यांना मि-

ठेल ते स्वतःला धन्य मानितील. हाच कॅल्पार्निया राणीसाहेबांच्या स्वप्नाचा अर्थ; आणखी काय ?

**सीझर**—हं ! हं ! तूं हा जो अर्थ सांगितलास तो अगदीं बरोबर !

**डेशियस**—बरोबर आहे तर ! आणि मी आतां आपल्याला जी आणखी एक बातमी सांगणार आहें, तीवरून तर मी केलेलाच अर्थ बरोबर आहे अशी आपली पूर्ण खात्री होईल. बलाढ्य सीझर महाराजांना राजमुगुट अर्पण करावयाचा असें दरोबस्त दरबारी मंडळींनीं ठरविलें आहे. न जाणो, आपण येत नाहीं असा जर त्यांना निरोप गेला तर त्यांचा हा बेत बदलला तर ? शिवाय, असेंही आणखी आहे कीं आजची सभा मोडा आणि सीझर महाराजांच्या राणीसाहेबांना चांगलीं स्वप्नें पडतील तेव्हां ती भरवा असें आपल्याला चिडविण्याला विनाकारण जागा होईल. आपण घरांतच बसलां तर सीझर महाराज भ्याले अशी कुजबुज होणार नाहीं काय ? महाराज, आपल्या कल्याणाविषयीं मला जी अत्यंत कळकळ वाटत आहे, त्यामुळेंच आपल्याला हें मला सांगावें लागत आहे. आणि युक्तिवादानें पाहतां इतकें उघड स्वच्छ रीतीनें बोलणें हें आपल्याला आवडणार नाहीं हेंही खरेंच. तरी आपणावर जें माझें प्रेम आहे त्यामुळेंच मी हें बोललों, हें लक्षांत आणून आपण मला याची क्षमा करावी.

**सीझर**—( कॅल्पर्नियेला उद्देशून ) आतां तुला वाटत असलेली भीती किती वेडगळपणाची आहे, पाहिलीस! पण तुझें ह्मणणें मी ऐकून त्याप्रमाणें वागलों, याची मला शरम वाटते. चल! मला माझा झगा दे. हा पहा मी निघालोंच.

( पब्लियस, ब्रूटस, लिगॅरियस, मेटेलस, कॅस्का, ट्रेबोनियस व सिन्ना हे प्रवेश करितात. )

हा पहा पब्लियस मला बोलवायला आला आहे.

**पब्लियस**—सीझर महाराज, मी आपणास अत्यंत नम्रपणें वंदन करितों.

**सीझर**—पब्लियस तुझें स्वागत असो. कां? ब्रूटस, तुह्मीं देखील आज इतक्या लवकर कोणीकडे? नमस्कार हो कॅस्का. लिगॅरियस, हें पहा तुला आलेल्या दुखण्यानें तूं जितका क्षीण झाला आहेस, व तुला त्याची जेवढी पीडा होत आहे ह्मणून तूं ह्मणतोस, त्या सगळ्याचें मूळ काय? तुझें व सीझराचें जें वांकडें पडलें आहे, त्यामुळें तुला एवढी पीडा कां व्हावी? अहो वाजले तरी किती?

**ब्रूटस**—आठ वाजले.

**सीझर**—खरोखर, तुह्मीं ही फार तसदी घेतली. हा केवळ तुमचा सज्जनपणाच; याबद्दल मी तुमचे फार फार उपकार मानितो.

( ॲन्टनी दुरून प्रवेश करितो. )

हा ॲन्टनी रात्रीचा मजा मारीत फिरावयाचा, पण तो देखील इतके लवकर आला, अं ! नमस्कार हो ॲन्टनी.

**ॲन्टनी**—नृपश्रेष्ठा, मी आपल्याला वंदन करितों.

**सीझर**—चला ! सर्व तयारी करावयाला सांगा. इतका वेळ थांबावें लागलें ही माझीच चूक आहे. बरें, कायहो गृहस्थ ! सिन्ना, मेटेलस, ट्रेबोनियस अहो कसें काय आहे ? तुमच्याशीं मला बराच वेळ बोलायचें आहे,—तासभर तरी लागेल. मागाहून मला याची आठवण करा बरें.—तुह्मी जवळच असा ह्मणजे मला तुमची आपोआप आठवण होईल.

**ट्रेबोनियस**—बरें आहे, महाराज. ( बाजूला वळून ) होय, तुझ्याजवळच मी आहें; पण तुझे हितचिंतक तर हा दूर असता तर बरें असेंच ह्मणतील, नाहीं का ?

**सीझर**—मित्रहो, अंमळ आंत चला पाहूं. मजबरोबरच तुह्मी सर्वजणही घोट घोट मद्य घ्या, आणि आपण सर्वजण सारखे सारखे मित्र होऊन, एकदमच बरोबर जाऊं.

**ब्रूटस**— ( एकीकडे ) अरे सीझर ! सारख्या सारख्या वस्तु ह्मटल्या ह्मणून त्या एकच झाल्या असें कांहीं होत नाहीं. अरे बाबा ! ह्या गोष्टीचा जों जों विचार करावा तों तों या ब्रूटसाला पराकाष्टेचें दुःख होतें !

( जातात )

# प्रवेश ३ रा.

**स्थळ**—कॅपिटोल सभेनजिकचा एक रस्ता.

( आर्टिमिडोरस एक कागद वाचीत प्रवेश करितो. )

**आर्टिमिडोरस**—"अरे सीझर! सावध रहा! ब्रूटस याजपासून तुला भय आहे ही गोष्ट लक्षांत असूं दे. केशियस याशीं संभाळून वाग! कॅस्का याच्याजवळ जाऊं नको! सिन्ना याजकडे नीट लक्ष असूं दे! ट्रेबोनियस याजवर विसबूं नको! मेटेलस सिंबर याला नीट ओळख. डेशियस ब्रूटस याचें तुजवर मुळींच प्रेम नाहीं. लिगॅरस याचा तूं अपमान केला आहेस. या सर्वांचे संगनमत झालें असून, हे तुजवर उठले आहेत. आपण अमर नाहीं असें जर तुला वाटत असेल, तर आपल्याभोंवती काय आहे आणि काय नाहीं तें नीट न्याहाळून पहा. अभयपणापासूनच कपट कट उद्भवतात. सर्व शक्तिमान देवता तुझें रक्षण करोत!

तुझा प्रिय मित्र
**आर्टिमिडोरस.**"

ठीक आहे. सीझर इकडून जाईपर्यंत मी येथेंच उभा राहतों; व तो आला ह्मणजे एखाद्या अर्जदाराप्रमाणें मी हें

पत्र त्याच्या हातीं देतों. अरेरे! स्पर्धेच्या शक्तीपुढें सद्गुणांचें कांहीं चालत नाहीं हें पाहून, माझें अंतःकरण फार फार तळमळतें. अरे नरश्रेष्ठा! सीझरा! हें जर तूं वाचून पाहशील तरच कदाचित् तूं वांचशील; नाहींतर राजद्रोही मंडळीला देव अनुकूल होऊन त्यांचा हेतु सफल होईल!

( जातो )

---

## प्रवेश ४ था.

**स्थळ**—कॅपिटोल सभेनजिकचा दुसरा एक रस्ता—ब्रूटस याच्या वाड्या समोरचा भाग.

( पोर्शिया व ल्यूशियस प्रवेश करितात. )

**पोर्शिया**—अरे ल्यूशियस, आतांच्या आतांच कसेंही करून कॅपिटोल सभेंत जा. पुरे, अधिक कांहीं बोलूं नकोस. एकदम चालता हो. अरे, अजून कां थांबला आहेस?

**ल्यूशियस**—बाईसाहेब, काम कोणतें तें ऐकण्यासाठीं; आणखी कशाला?

**पोर्शिया**—काय काम तें सांगत बसण्याच्या आधीं तूं तिक-

ड्न चटदिशीं जाऊन आला असतास तर बरें झालें नसतें का ? हे धैर्या! मला यावेळीं सोडूं नको. माझें अंतःकरण व माझी जिव्हा या दोहोंमध्यें मोठा थोरला पर्वत उभा कर; ह्मणजे अंतःकरण अलग राहून, अंतःकरणांतल्या गुप्त गोष्टी जिव्हेला कळणार नाहींत, व ती लुबलुब करूं लागली तरी त्या तिला फोडतां येणार नाहींत. माझें अंतःकरण पुरुषाप्रमाणें आहे, पण माझें अवसान पडलें अबलेचें. कोणतीही गुप्त गोष्ट स्त्रियांना कळली तर ती त्यांच्या तोंडांत राहणें फार कठीण असतें ! अरे, अजून तूं येथेंच का आहेस ?

**ल्यूशियस**—मी काय करूं ह्मणतां ? कॅपिटोल सभेंत जाऊं ?—आणखी दुसरें कांहीं करूं नको ? आणखी तेथून परत आपल्याकडे येऊं ह्मणतां—येवढेंच ?—दुसरें कांहीं नाहींना ?

**पोर्शिया**—अरे, महाराज खुशाल आहेत ह्मणून मला येऊन सांग. कारण, येथून जातांना त्यांची प्रकृति अस्वस्थ होती. आणखी सीझर काय करीत आहे, अर्जदार लोक त्याजपाशीं काय काय मागत आहेत वगैरे सर्व कांहीं पाहून ये. ऐकलेंसका नीट ?—अगबाई ! पण हा गलबल कशाचा बरें ?

**ल्यूशियस**—बाई साहेब, मला तर कांहींएक ऐकूं आलें नाहीं.

**पोर्शिया**—हा पहा ! नीट ऐक. कांहीं तरी दंगा चालला असावा अशी ओरड मी ऐकली; आणि सध्यां वाहणाऱ्या वाऱ्याच्या दिशेवरून तो कॅपिटोल सभेकडूनच येत आहेसें वाटतें.

( भविष्यवादी प्रवेश करितो. )

**पोर्शिया**—या. असे इकडे या. आपण कोणीकडून आला ?

**भविष्यवादी**—घरूनच इकडे आलों, बाईसाहेब.

**पोर्शिया**—आतां किती वाजले हो ?

**भविष्यवादी**—बाईसाहेब, नऊ वाजण्याचा सुमार असेल.

**पोर्शिया**—सीझर कॅपिटोल सभेला गेला कीं नाहीं हें तुह्मांला कांहीं कळलें आहे ?

**भविष्यवादी**—नाहीं बाईसाहेब. अजून कांहीं गेला नाहीं. कॅपिटोल सभेकडे जातांना त्याची गांठ घ्यावी ह्मणून त्याच बाजूला मी जात आहें.

**पोर्शिया**—सीझर याजपाशीं तुमचें कांहीं काम असेल, नाहीं बरें ?

**भविष्यवादी**—होय, बाईसाहेब ! काम ह्मणून इतकेंच

कीं त्यानें माझें बोलणें ऐकून घ्यावें—यांत त्याचें कल्याण होईल–आणि आपलें कल्याण व्हावें अशी त्याची मर्जी असली तर बाबारे जपून वाग, एवढेंच त्याला सांगावयाचें आहे.

**पोर्शिया**—कां बरें! त्याच्या जीवाला कांहीं धोका आहे कीं काय ?

**भविष्यवादी**—मला माहीत आहे असेंच कांहीं ह्मणतां येत नाहीं; तरी न जाणो कदाचित तसें कांहीं होण्याचा संभव आहे अशी मला धास्ती वाटते. बरें आहे. बाईसाहेब, मी येतों. येथें रस्ता अगदींच अरुंद आहे व सीझरच्या मागोमाग येणारी राजसभासदांची व प्रिटोर्स यांची, व साध्या अर्जदारांची येथें इतकी कांहीं गर्दी होईल, कीं एखादा अशक्त माणूस तीमध्यें चेंगरूनच जावयाचा. यासाठीं आपण आपले मोकळ्या जागेंत जाऊंया कसे. त्या बाजूनें सीझर येऊं लागला, ह्मणजे आपणाला त्याच्याशीं अनायासेंच बोलावयाला मिळेल.

**पोर्शिया**—चला मीही पण आतां घरांत जातें. अरेरे! अबलांचें अंतःकरण किती दुर्बल! महाराज, आपल्या साहस कर्मामध्यें, परमेश्वर आपलें साहाय्य करो.—त्या पोरानें माझें हें बोलणें खचित ऐकलें असेल. ब्रूटस महाराजांचें एक मागणें आहे तें सीझर कांहीं मान्य करणार

नाहीं. अगबाई हें काय, माझ्या डोळ्यांना अंधेरी कां बरें आली ? जा, जा, ल्यूशियस, आणि महाराजांना माझा आदरपूर्वक प्रणाम कळवून सांग कीं मी अगदीं आनंदांत आहें. आणखी, महाराज तुला काय ह्मणतात तें पुन्हा इकडे येऊन मला सांग.

( निरनिराळ्या बाजूंनीं जातात. )



ॲन्टनी--ही याच ठिकाणीं त्याच्या अत्यंत प्रिय ब्रूटसनें कटयार भोंसकली आहे !

ज्यूलियस सीझर अंक ३ प्र. २ पृ. १२०

The Bombay Art Printing Works, Fort.

# अंक ३ रा.

## प्रवेश १

**स्थळ—रोमनगर—कॅपिटोल सभागृह.**

( कॅपिटोल सभागृहामध्यें सभा भरली आहे. लोकांची गर्दी झाली आहे. व त्यामध्यें आर्टिमिडोरस आणि भविष्यवादी आहेत. सीझर, ब्रूटस, केशियस, कॅस्का, डेशियस, मेटेलस, ट्रेबोनियस, सिन्ना, ॲन्टनी, लेपिडस, पॉपिलियस, पब्लियस व दुसरे बरेच लोक प्रवेश करितात. )

**सीझर**—( भविष्यवाद्याला उद्देशून ) मार्चे महिन्यांतील इडिजसणाचे दिवस आले काहो ?

**भविष्यवादी**—होय, महाराज. पण अजून येऊन गेले नाहींत.

**आर्टिमिडोरस**—महाराज, आपला जयजयकार असो; हा माझा अर्ज मी आणला आहे, तो महाराजांच्या वाचण्यांत यावा.

**डेशियस**—हा ट्रेबोनियस याचा नम्र अर्ज आपल्या सवडीप्रमाणें पण होतां होईल तों लवकरच अगदीं आरंभापासून शेवटपर्यंत वाचावा अशी त्याची इच्छा आहे.

**आर्टिमिडोरस**—सीझर महाराज, पहिल्यानें माझा वाचावा कारण माझा अर्ज स्वतः महाराजांच्याच संबंधाचा आहे. तेव्हां महाराज तो आपण अगोदर वाचावा.

**सीझर**—आमच्या संबंधानें असेल तर तो शेवटीं पहातां येईल.

**आर्टिमिडोरस**—लवकरच वाचा सीझर महाराज, उशीर लावूं नका.

**सीझर**—हा मनुष्य किती हो वेडा आहे ?

**पब्लिशियस**—अहो गृहस्थ, जरा वाट सोडा.

**केशियस**—कायरे, रस्त्यांतच अर्जाचें काय खोळंबलें आहे ? कॅपिटोल सभेंत ये.

( सीझर वर सेनेट गृहांत जातो; व सर्व मंडळीही त्याच्या मागोमाग जाते.)

**पॉपिलियस**—तुह्मीं हातीं घेतलेला उद्योग आज सफल होवो, असें मी इच्छितों

**केशियस**—कायरे कसला उद्योग ह्मणतोस ?

**पॉपिलियस**—ठीक आहे बोवा ! तुमचें कल्याण असो.

( सीझरकडे जातो. )

**ब्रूटस**—( लेना यास उद्देशून ) पॉपिलियस कायरे ह्मणाला ?

**केशियस**—आपला उद्योग सफल होवो अशी त्यानें आपली इच्छा दर्शविली. छे बोवा, मला तर वाटतें कीं आपला बेत उघडकीला आला.

**ब्रूटस**—सीझरकडे तो कसा चालला आहे पहा ! त्याच्याकडे लक्ष ठेव.

**केशियस**—चल, कॅस्का ! एकदम उडव ! कारण अडथळा होण्याची भीती आहे. ब्रूटस महाराज पुढें काय करायचें ? हें जर उघडकीला आलें तर ? मी खचित सांगतों केशियस किंवा सीझर, दोघे कांहीं ज़गायाचे नाहींत; कारण निदान मी तरी स्वतःला मारून घेईनच घेईन !

**ब्रूटस**—केशियस जरा धीर धर. पॉपिलियस लेना जें कांहीं बोलला तें आपल्या बेताबद्दल नव्हे, कारण तो पहा कसा हांसतो आहे, व सीझरची चर्याही कांहीं बदललेली नाहीं.

**केशियस**—ट्रेबोनियसला आपलें काम चांगलें माहीत आहे. कारण, तो पहा, मार्क अॅन्टनीला त्यानें आपल्या वाटेंतून एका बाजूला सारलें व आपण पुढें सरला.

( अॅन्टनी व ट्रेबोनियस जातात )

**डेशियस**—मेटेलस सिंबर कोठें आहे ? त्याला जाऊंद्या, व सीझर पुढें त्याला आपला अर्ज लागलीच हजर करूं द्या.

**ब्रूटस**—तो तर तयार आहे. गर्दींतून रस्ता काढा व त्याला पुढें जाऊं द्या. त्याच्या पाठीशीं असा.

**सिन्ना**—कायरे कॅस्का, पहिल्यानें तूंच हात उचलणार आहेस ना ?

**सीझर**—( सभोंवार पाहून ) आपली सर्व तयारी आहेना ? कायहो, आतां सीझर यानें व त्याच्या राजसभेनें दाद घेण्यासारखा एकादा अन्याय घडलेला कोणाला सांगायचा आहे काय ?

**मेटेलस**—महाबलाढ्य, महापराक्रमी, नृपश्रेष्ठा ! हा दीन सिंबर आपल्या सिंहासनापुढें अनन्य भावानें साष्टांग प्रणिपात करीत आहे. ( गुडघे टेकतो )

**सीझर**—मी तुला तसें करूं देणार नाहीं. ह्या असल्या नम्रपणाच्या वंदनांनीं व लोटांगणांनीं साधारण माणसांना दया उत्पन्न होईल, आणि ते एकदां केलेला कायदा क्षणांत फिरवून टाकतील; पण कायद्याचा असा पोरखेळ सीझर ह्याच्या हातून होणार नाहीं. सीझरच्या शरिरांत वाहणारें रक्त आपल्या खऱ्या ब्रीदाला सोडून देईल, व ज्या गोडगोड भाषणांनीं मूर्खांना पाझर फुटतो, त्यांनीं त्याला पाझर फुटेल, असें तूं मूर्खाप्रमाणें समजूं नकोस. ह्मणजे मी तुला स्पष्ट सांगतों कीं ह्या तुझ्या गोडगोड शब्दांचा, नम्रपणानें लोटांगणें घालण्याचा, व या नीच श्वानवृत्तीचा, खचित कांहीं उपयोग होणार नाहीं. तुझ्या भावाला कायद्या अन्वयें हद्दपार केलें आहे; आणि तुझे

हे साष्टांग प्रणिपात, ह्या विनवण्या, व हांजीहांजीचे शब्द ह्या गोष्टी जर त्याच्या मुक्ततेकरितां तूं करीत असशील तर मी तुला एखाद्या कुत्र्याप्रमाणें माझ्या वाटेंतून हाकलून लावीन. सीझर कधीं अन्याय करणार नाहीं; व तसेंच वाजवी कारण असल्या शिवाय त्याचें समाधानही होणार नाहीं. हें लक्षांत ठेव.

**मेटेलस**—माझ्या हद्दपार झालेल्या भावाची शिक्षा रद्द करा ह्मणून विनविण्यासाठीं महावीर सीझर महाराजांच्या कानाला अधिक मधुर लागेल, असा माझ्याहून फार मधुर आवाज इतर कोणाचा नाहींच काय ?

**ब्रूटस**—सीझर, मी तुझ्या हाताचें चुंबन घेतों. पण तुझी हांजीहांजी करण्यासाठीं मात्र नव्हे, तर पब्लियस सिंबरची हद्दपारी ताबडतोब व बिनअटीवर रद्द व्हावी अशी माझी इच्छा आहे, ह्मणूनच मी हें चुंबन घेतों.

**सीझर**—काय, ब्रूटस ?—काय, ह्मणतोस काय ?

**केशियस**—क्षमा करा सीझर महाराज. सीझर महाराज माफ करा. पब्लियस सिंबरची मुक्तता व्हावी येवढें मागण्याकरितां मी आपल्या पायाशीं लवून आपल्याला विनंती करितों.

**सीझर**—मी जर तुझ्या ठिकाणीं असतों तर मलाही सहज दया आली असती. दया उत्पन्न करण्याकरितां मला

कोणाच्या जर प्रार्थनाकरितां येत्या, तर प्रार्थनांनीं मीही द्रवलों असतों. ज्याचा निश्चलतेचा गुण नभोमंडलांतील दुसऱ्या कोणत्याही ताऱ्याच्या अंगीं नाहीं, अशा त्या उत्तर ध्रुवाच्या ताऱ्याप्रमाणें माझा निश्चय अचल आहे. नभोमंडल असंख्य तेजःकणांनीं चित्रित झालें आहे. ते सर्व कण तेजोमय असून प्रकाशतही असतात. तरी पण त्या सर्वांमध्यें निश्चल असणारा तारा ह्मटला ह्मणजे कायतो एकच. हाच न्याय या जगालाही लागू आहे. या जगांत लक्षावधी माणसें आहेत तीं मासाचीं व रक्ताचीं असून त्यांना बुद्धि असते; तरी त्या सर्वांमध्यें जो अगम्य असून, न ढळतां, आपलें श्रेष्ठत्व सदोदित कायम राखतो, असा एकच मनुष्य आहे, आणि तो मला माहित आहे. तो कोण ?-तर मी ! तो निश्चलपणा या प्रकरणांतही मी थोडासा दाखवितों. सिंबर याला हद्दपार करावें असा माझा निश्चय झाला; आणि त्याला तसाच ठेवावयाचा हेंही माझें निश्चित ठरलें आहे. त्यांत अंतर पडायचें नाहीं.

**सिंबर**—सीझर महाराज—

**सीझर**— चल, नीघ येथून ! अरे मूर्खा, तूं काय, त्या प्रचंड आलिंपस पर्वताला हलवूं पाहातोस काय ?

**डेसेयस**—हे नृपश्रेष्ठा !—

**सीझर**—अरे, या ब्रूटसची विनंती अमान्य झाली हें तूं आतांच पाहिलेंस नाहीं काय ?

**कॅस्का**—यावर जें उत्तर द्यायचें तें माझे हातच देतील.

( प्रथम कॅस्का, नंतर इतर कटवाले, व नंतर मार्कस ब्रूटस, सीझरवर हात टाकतात. )

**सीझर**—हा कोण ब्रूटस—तूं देखील सीझरला मारण्यास सिद्ध झालास काय ? तर मग मात्र सीझर मेला ? ( मरून पडतो. )

**सिन्ना**—अहो ! आज मात्र स्वातंत्र्य प्राप्त झालें ! दास्य लयास गेलें ! जुल्म गतप्राण झाला ! चला, पाहातां काय ? रस्तोरस्तीं आरोळी देऊन द्वाही फिरवा.

**कॅशियस**—कांहीं मंडळींनीं नेहमीच्या भाषणपीठावर जाऊन " स्वतंत्रता, दास्याभाव, आणि दास्य विमोचन ! " या नांवानें आरोळी देऊन, ही गोष्ट निर्धास्तपणें सर्वांस जाहिर करावी.

**ब्रूटस**—समस्त लोक हो, व समस्त सभासद हो, मी काय सांगतों तें आधीं ऐका. यांत घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. तर पळून जाऊं नका. उभे राहा व शांतपणें माझें बोलणें ऐकून ध्या. आज महत्वाकांक्षी मनुष्यास त्याच्या महत्वाकांक्षेचें योग्य बक्षिस मिळालें !

**कॅस्का**—( ब्रूटस यास उद्देशून ) अहो, आधीं भाषण पीठा-कडे चला पाहूं !

**डेशियस**—( केशियस यास उद्देशून ) अहो, तुह्मीं सुद्धां चला.

**सिन्ना**—या बंडाळीनें तर आपण अगदीं गोंधळून गेलों बोवा !

**मेटेलस**—सावधपणानें, नीट एके ठिकाणीं उभे राहा ! नाहीं तर कदाचित् सीझरचा एखादा मित्र येऊन—

**ब्रूटस**—उभें राहाण्याची गोष्ट बोलूं नको. अरे पब्लियस तूं कांहीं काळजी करूं नको; अगदीं आनंदांत ऐस. तुझ्या स्वतःला किंवा कोणाही रोमन माणसाला धोका पोंचणार नाहीं. तेव्हां अरे पब्लियस हें जें आम्हीं ह्मणतों तें सर्वांना तूंच जाहिर कर.

**केशियस**—आणि तूं येथून जा; नाहीं तर आमच्याकडे येणाऱ्या लोकांच्या गर्दींत तुला ह्माताऱ्याला उगाच कांहीं इजा होईल.

**ब्रूटस**—हो हो ! तूं जाशील तर बरें. या कृत्याची सर्व जबाबदारी कोणाकडेही नाहीं. तें आह्मीं केलें आहे.

( ट्रेबोनियस पुन्हा प्रवेश करितो. )

**केशियस**—कायरे, अॅन्टनी कोठें आहे ?

**ट्रेबोनियस**—केव्हांच भिऊन पळाला, तो तकट घरीं निघून गेला. त्याच्या घरांत बायकांनीं व मुलामाणसांनीं रडून ओरडून एकच कल्होळ मांडला आहे. पळापळ चालली आहे. जसा काहीं जगाचा अंतकाळ आला कीं काय असें त्यांना वाटत आहे.

**ब्रूटस**—हे दैवा, तुझे खेळ आम्हीं जाणून आहों. आह्मी मरणार हें आह्मांला माहीत आहे. एक एक दिवस येईल तो पदरांत पडला येवढेंच माणसें पाहात असतात. मरण होतां होईल तों लांबणीवर पडेल तर पाहावें येवढीच गोष्ट माणसाच्या हातची आहे.

**केशियस**—कांबरें, जो कोणी आपल्या आयुष्याचीं वीस वर्षें कमी करितो त्याला मरणाच्या भीतीचीं तितकीं वर्षें कमी करतां आलीं, असें ह्मणतां येणार नाहीं काय ?

**ब्रूटस**—अगदीं बरोबर आहे. आणि असें असलें ह्मणजे मरण लाभदायकच होय असें ह्मटलें पाहिजे. तेव्हां ज्या अर्थीं आपण सीझरची मरणाची भीती कमी केली त्या अर्थीं आपण त्याचे मित्रच झालों; नाहीं काय ? खालीं वांका, रोमन लोकहो ! जरा खालीं वांका आणि तुह्मीं आपले हात कोपरापर्यंत सीझरच्या रक्तानें माखवा. आणि आपल्या तलवारीनांही त्याचें स्नान घाला. इतकें तुह्मीं केल्यावर मग तसेच आपण बाजाराच्या जागीं जाऊं;

आणि आपल्या लाल झालेल्या तलवारी मस्तकावर धरून फिरवूं, आणि सर्वजण “ शांतता, दास्याभाव, दास्य विमोचन, स्वतंत्रता ” या शब्दांची गर्जना करूं.

**केशियस**—तर मग वांका खालीं व रक्तांत बुडवा आपापले हात व तलवारी ! आपण करीत आहों हा लोकोत्तर खेळ, अद्याप अस्तित्वांत न आलेल्या कोणत्या राज्यांत, व आज जी भाषा कोणालाही माहीत नाहीं अशा कोणत्या भाषेनें, आणखी किती काळानें, पुन्हा करण्याचा प्रसंग येईल, कोण जाणे !

**ब्रूटस**—धुळीहून ज्याची योग्यता अधीक नाहीं असा हा सीझर आज पाम्पीच्या पुतळ्याच्या पायाशीं जसा पडलेला आहे, तसा तो अशा खेळांत किती वेळां तरी, रक्त बोंबाळ होऊन पडेल !

**केशियस**—जेव्हां जेव्हां असें घडेल, तेव्हां तेव्हां आपल्या कटांतील ही मंडळी, ह्मणजे स्वदेशाला स्वातंत्र्य प्राप्त करून देणारी मंडळी, असेंच आपणाला ह्मणतील.

**डेशियस**—मग कसें काय ? आतां आपणाला बाहेर पडायचें ना ?

**केशियस**—होहो, बाहेर पडायचें. चला, समस्त मंडळी हो, एकूण एक चला. स्वतः ब्रूटस यानेंच पुढें व्हावें

ह्मणजे आह्मीं खरे शूर व खरे रोमन आहों असें दाखवून मोठ्या अभिमानानें त्याच्या मागोमाग येतों.

( एक चाकर प्रवेश करितो. )

**ब्रूटस**—थांबा, इकडे हा कोण आला पाहा बरें ? अँटनीचा हा नोकर नव्हेका ?

**चाकर**—ब्रूटस महाराज, माझ्या धन्यानें तुमच्या पुढें मला असे गुडघे टेंकावयास सांगितलें आहे. मार्क ॲन्टनी यानें असा असा पाया पड ह्मणून मला सांगितलें आहे; व आपल्याला साष्टांग नमस्कार घालून, असें बोल, ह्मणून त्यानें मला हुकूम केला आहे. " ब्रूटस महाराज हे थोर, सूज्ञ, शूर आणि प्रामाणिक आहेत. " सीझर बलाढ्य, धीट व राजासारखा तेजस्वी व प्रेमळ होता. ब्रूटसवर माझें प्रेम आहे, आणि मी त्याला थोर मानतों. सीझरला मी भीत असें. त्याला मी थोर समजत असें. त्याजवरहीं माझें प्रेम होतें, असेंही आपल्याला कळवावयाला माझ्या धन्यानें मला सांगितलें आहे. सीझर मेला हें ठीक झालें, त्याला मरणच योग्य होतें असें आपणास कां वाटतें हें सांगण्याची आपण कृपा कराल काय ? व मार्क ॲन्टनी यानें येथें यावें, त्याच्या केंसालाही धक्का लागणार नाहीं असें अभय वचन आपणाकडून त्याला मिळेल काय ? मिळेल तर स्वतः येऊन माझा हेतू काय

आहे, तो आपणास विदित करावा अशी माझी इच्छा आहे, इतकेंच केवळ नाहीं तर ब्रूटसवर माझें जेवढें प्रेम आहे तेवढें मृत सीझरवरही नव्हतें; आणि नुक्त्याच झालेल्या या क्रांतीमुळें थोर ब्रूटस याला जें भाग्य प्राप्त झालें आहे, तेणें करून आपणास फार फार संतोष झाला आहे असें मला सांगतां येईल. ही गोष्ट आपणास विदित करावी असें तो ह्मणतो, आणखी काय ?

**ब्रूटस**—तुझा धनी एक मोठा सुज्ञ व शूर रोमन मनुष्य आहे, व तो असा नसेल असें कधींच मला वाटलें नव्हतें. व आतांही वाटत नाहीं तेव्हां तूं त्याला असें सांग कीं मर्जी असल्यास तूं येथें ये ह्मणचे सर्व गोष्टींचा खुलासा होईल. तो झाल्यावर त्यानें येथून खुशाल निघून जावें. त्याच्या केसालाही धक्का लागणार नाहीं.

**चाकर**—बरें आहे, महाराज. मी जातों आणि त्यांना इतक्यांतच घेऊन येतों. ( जातो. )

**ब्रूटस**—त्याचें व आपलें सख्य होईल ही माझी खात्रीच आहे.

**केशियस**—हो ! कदाचित् तसें होईल, नाहीं असें नाहीं. तरी पण बोवा, आपल्या मनानें त्याच्याबद्दल मोठी भीति घेतली आहे; आणि मला आलेल्या शंका नेहमीं खऱ्या होतात, त्यांत सहसा चूक होत नाहीं, हेंही मला माहित आहे.

**ब्रूटस**—पण हा पहा! ॲन्टनी इकडेच येत आहे.

( ॲन्टनी पुन्हा प्रवेश करितो. )

हे मार्क ॲन्टनी, तुझें स्वागत असो.

**ॲन्टनी**—शिव शिव! महाबलाढ्य सीझरा, तुझी अशी हीनदशा व्हावी काय? तुझा तो दिग्विजय, तुझा तो प्रताप, तुझी ती समरांगणांत मिळालेली अपार संपत्ति या गोष्टी आज धुळीला मिळाल्या ना! बरें, तुझें कल्याण होवो!—सद्गृहस्थ हो! तुमच्या मनांत काय आहे हें मला सांगतां येत नाहीं. यापुढें आणखी कोणाचा रक्तपात करावयाचा आहे? पुष्कळ रक्त कोणाच्या शरिरांत आहे? माझ्या शरिरांत आहे असें तुह्मांस वाटत असेल, तर त्याचा पात सीझर मरून पडला असतांनांच होईल तर कांहीं वाईट नाहीं. खाचित्, याहून चांगला योग कोणता हवा? सर्व जगांत अत्यंत श्रेष्ठ अशा रक्तानें माखून कृतकृत्य झाल्यावर माझ्यासारख्याच्या रक्तानें माखण्यांत काय पुरुषार्थ राहिला? याउप्पर मजविषयीं जर तुमच्या मनांत वैरभाव वागत असेल, तर धूम्रलोहित झालेले तुमचे हात क्रोधाच्या आवेशानें सरसरत आहेत तोंवर आपलें कार्य करून घ्या, एवढीच आपणाला माझी विनंति आहे. आणखी हजारों वर्षें मी जगलों तरी काय? सध्याच्या काळांतील तुमच्यासारख्या अप्रतिम व उत्कृष्ट

पुरुषांच्या हातून मला मरण आलें, व तें सीझर मरून पडला असतां त्याच्या शवाशेजारीं आलें, हें माझें महद्भाग्यच मी समजतों. अशी संधी मला कधीं लाभली नसती.

**ब्रूटस**—हे अॅन्टनी, तूं आह्मांपासून मरण मागूं नको. अरे, आमच्या या हातांवरून व त्यांनीं केलेल्या कृत्यांवरून, आह्मी खुनी व निर्दय आहों असें तूं ह्मणशील; पण तुला खचित सांगतों कीं तूं केवळ आमचे हे हात व त्यांनीं केलेलें खुनी कृत्य येवढेंच पहात आहेस; आमचीं हृदयें तूं कोठें पहात आहेस ? खचित, तीं कांहीं निर्दय नाहींत आणि रोम नगरच्या कष्टमय स्थितीबद्दल दया उत्पन्न होऊनच—अरे, ज्याप्रमाणें उष्णतेनें उष्णता मरते त्याप्रमाणें त्या दयेनें सीझरबद्दल आमच्या हृदयांत असलेली दया नाहींशी केली, व सीझरच्या संबंधाचें हें कृत्य घडलें. आंता तुझ्याबद्दल जर ह्मणशील तर, हे मार्क अॅन्टनी, तुला खरेंच सांगतों आमच्या तलवारी बोथट झाल्या आहेत; आमच्या बाहूमध्यें वैरभावाचा आवेश उरला नाहीं; आणि आमचीं हृदयें बंधुत्वाच्या प्रेमानें, आदरानें व सुविचारानें इतकीं उचंबळलीं आहेत कीं तुझें स्वागत करावयाला तीं सिद्ध आहेत.

**केशियस**—आणि मी असेंही ह्मणतों कीं अधिकार व

मानमान्यता यांच्या वाटण्या करितांना सर्वांप्रमाणेंच तु-झ्याही वांटणीचा विचार होईल.

**ब्रूटस**—तूं अंमळ थांब. आधीं भितीनें गांगरून गेलेल्या या लोकांना आह्मांला शांत करूं दे. मागाहून, सीझर वर हात टाकतांनाही जो मी त्याच्यावर प्रेम करीत होतों, तोच मी असें करण्याला कां उद्युक्त झालों याचें कारण मी तुला सांगेन.

**ॲन्टनी**—-तुमच्या शहाणपणाची मला तरी शंका नाहीं. बरें, आतां येथें जमलेल्या प्रत्येक इसमानें आपापला हात मजपुढें करावा. प्रथम, मार्कस ब्रूटस, तुमच्यांच हाताला मी स्पर्श करितों. नंतर पुढें केशियस, तुमचा हात मी घेतों. आतां पुढें मेटेलस, तुमचा–सिन्ना, तुमचा–आणि हे शूर कॅस्का; तुमचा–आणि शेवटीं—मी शेवटीं ह्मटला तरी, प्रेमांत जो कांहीं मला कमी वाटत नाहीं असा तुमचा---ट्रेबोनियस यांचा ! सद्गृहस्थ हो, हाय ! मी आतां काय ह्मणूं ? ॲन्टनी चांगला मनुष्य आहे असें जर तुमचें मत असलें, तर त्याचें कारण एवढें डळमळीत आहे कीं तुमचें मत केव्हां उलटें होईल हें सांगतां येत नाहीं--मला वाटतें कीं तुह्मीं मला भित्रा किंवा तोंडपुजा असेंच ह्मणाल. हे सीझरा, माझें तुझ्यावर प्रेम होतें हें खरें; परंतु काय करावें ?—सांप्रत तुझ्या प्रेतासमक्ष रक्तानें

माखलेल्या तुझ्या शत्रूंच्या हातांत हात घालून, तुझ्या ॲन्टनीला त्यांच्याशीं सख्य करावें लागत आहे! हें जर तुझ्या आत्म्यानें पाहिलें, तर हे महाभागा, तुझ्या आत्म्याला जें दुःख होईल, तें या प्राप्त झालेल्या मरणाच्या दुःखाहून, किती तरी अधीक आहे! तुला जेवढ्या जखमा झाल्या आहेत, तेवढे जर मला डोळे प्राप्त होतील, व त्या जखमांतून जेवढ्या वेगानें रक्तपात होत आहे, तेवढ्याच वेगानें जर त्यांतून अश्रूपात होऊं लागेल तर मला किती भूषणास्पद होईल बरें! पण प्रत्यक्ष तुझ्या शत्रूंशीं मीच सख्य जोडलें, तर तें भूषणास्पद होईल काय? हे सीझर! मला क्षमा कर. हे शूर पुरुषा! या ठिकाणीं तूं एखाद्या मृगाप्रमाणें यांच्या तडाक्यांत कीं रे सांपडलास! तूं येथेंच पडलास; नाहीं काय? तुझी शिकार केल्यानें ज्यांच्या अंगावर डाग पडले आहेत व तुझ्या रक्तानें ज्यांच्या आंगावरील वस्त्रेंही लाल झालीं आहेत, ते हे तुझे पारधी येथें तुझ्यासमोर उभे आहेत. हे मृगा! तुझें निवासस्थान ह्मटलें ह्मणजे विस्तीर्ण अरण्य! पण ज्या अर्थीं तूं सर्व जग पादाक्रांत करून आला होतास, त्या अर्थीं तें सर्व जगच तुझें निवासस्थान झालें होतें. पण अरेरे! शरीरांतून प्राण नाहींसा झाल्यानें तें जसें शुष्क दिसूं लागतें, त्याचप्रमाणें तूं नाहींसा झाल्यानें, हें जगद्रूपी अरण्यही आज कसें शून्य व उदास होऊन गेलें पाहा!

**केशियस**—अरे मार्कअॅन्टनी !

**अॅन्टनी**—काय हो ! काय ह्मणतां ? तुह्मीं मला क्षमा करा ! सीझरचे प्रत्यक्ष शत्रूही असें ह्मणतील; मग मित्रानें येवढेंच ह्मटलें, तर त्यानें आपलें प्रेम फारच थोडक्यांत व्यक्त केलें असें ह्मणावयास नको काय ?

**केशियस**—हें पहा, तूं सीझरचें या रीतीनें वर्णन केलेंस ह्मणून कांहीं मी तुला दोष देत नाहीं. पण आमच्याशीं तूं कोणत्या रीतीनें वागणार ? तूं आमच्या मित्रांच्या यादींत आपलें नांव घालणार, किंवा तुझ्या भरंवशावर न बसतां आमचा मार्ग आह्मी पाहावा ?

**अॅन्टनी**—येवढ्याचसाठीं तर मी तुमच्या हातांत हात घातला, पण सीझरकडे पाहातांच माझी बुद्धी फिरली तथापि मित्रांनों, मी तुमच्यांतलाच आहें व तुह्मां सर्वांवर प्रेमही करीत आहें. पण सीझर तुह्मांला कशासाठीं व कसा भयंकर वाटला, हें तुह्मीं मला कळवाल व तेणें-करून माझें समाधान होईल या आशेवर.—

**ब्रूटस**—अलबत तसें होईलच. न होईल तर हा सर्व प्रकार केवळ पशुतुल्यच समजावा लागेल. आमचीं कारणें इतकीं समंजसपणाचीं आहेत कीं, तूं जरी सीझरचा प्रत्यक्ष मुलगा असतास, तरी त्यांनीं तुझें देखील समाधान झालें असतें.

**ॲन्टनी**—मला हेंच पाहिजे आहे; मी तरी आणखी कुठें मागतों आहे ? त्याचें प्रेत बाजारच्या ठिकाणीं व भाषण पीठाचे ठिकाणीं न्यावें आणि तें स्मशानाकडे नेल्यावर मित्रत्वाला योग्य भाषण करण्याची परवानगी मिळावी इतकेंच माझें मागणें आहे.

**ब्रूटस**—बरें आहे, तसें तूं खुशाल कर.

**केशियस**—अहो ब्रूटस महाराज, तुह्मांला एक गोष्ट सुचवावयाची आहे. ( एका बाजूला होऊन ) हें तुह्मी काय करीत आहां ? याचा परिणाम काय होईल हें तुमच्या लक्षांत आलें आहे काय ? ॲन्टनी हा स्मशान यात्रेचे वेळीं भाषण करीन ह्मणून परवानगी मागत आहे, ती तुह्मीं त्याला देऊं नका. तो जें कांहीं बोलेल त्याचा लोकांच्या मनावर केवढा परिणाम होईल, हें तुमच्या लक्षांत आलें आहे काय ?

**ब्रूटस**—खरोखर माझी चूक झाली. आतां तूं सांगत असलास, तर मीच पहिल्यानें भाषण पीठावर जाऊन भाषण करतों, व आह्मीं सीझरला कां मारलें याचीं कारणें लोकांस जाहिर करतों, आणि ॲन्टनी हा इतक्यांतच येथें येऊन भाषण करणार आहे, तेंही करण्यास आम्हींच त्याला परवानगी दिली आहे, इतकेंच केवळ नव्हे, तर सीझरच्या शवाला यथायोग्य व कायदेशीर प्रेतसंस्कार

करण्याचीही परवानगी आम्हींच दिली आहे. ही गोष्ट आ-म्हांला मान्यच आहे असेंही त्यांत मी स्पष्टपणें सांगेन. असें केल्यानें आपलें नुकसान तर कांहीं होणार नाहीं, पण थोडाबहूत झाला तर फायदाच होईल. (ॲन्टनीकडे वळून) अरे ॲन्टनी, हें घे सीझरचें प्रेत; तथापि मी काय सांगतों हें अगोदर समजून घे. स्मशानयात्रेचे वेळीं तूं जें भाषण करशील, त्यांत कोणत्याही प्रकारें तुला आमच्या उखाळ्या पाखाळ्या काढतां कामा नयेत; किंवा आम्हांला दोष देऊन नांवें ठेवतां कामा नयेत. तुला वाटलें तर तूं सीझरचे गूण घे, व वाटेल तशी त्याची वर्णना कर, त्याला आमची ना नाहीं; पण हें आमच्याच परवानगीनें करीत आहेस असें लोकांस सांग. असें करण्याचें तुला कबूल असलें तरच आमचेकडून तुला परवानगी मिळेल. नाहीं तर प्रेतविधि संबंधानें तुला कांहींएक करतां येणार नाहीं; आणि हेंही लक्षांत ठेव कीं मी भाषण पीठाकडे जाऊन आतांच भाषण करणार आहें, तें पुरें झाल्यावां-चून तुला भाषण करतां येणार नाहीं.

**ॲन्टनी**—बरें आहे; मला हें आहे कबूल. याहून मी आणखी कांहीं मागत नाहीं.

**ब्रूटस**—तर मग प्रेत घेऊन जाण्याची तयारी कर, व आमच्याच मागोमाग चल.

( ॲन्टनी शिवाय सर्व जातात )

**ॲन्टनी**—हे रक्तमय मृत्तिके ! ह्या खाटीक मंडळींशीं मी भलेपणानें व गरिबीनें वागतों याची मला क्षमा कर! आजपर्यंत ह्या विस्तीर्ण पृथ्वीतलावर ज्यांनीं ज्यांनीं जन्म घेतला, त्या सर्वांत अत्यंत श्रेष्ठ अशा एका पुरुषाचा अवशेष तुझ्यांत आहे! ज्या हातांनीं अशा रक्ताचा पात केला त्या हातांना धिःकार असो! हे सीझरा! तुला झालेल्या जखमांवरून मी आतां भविष्य करतों, ऐका! अरे नरश्रेष्ठा! मुक्या माणसांच्या तोंडांप्रमाणें ह्या तुझ्या जखमा आपले लाल ओंठ उघडल्याप्रमाणें करून, मला असें बोलावयास सांगत आहेत कीं, ज्यांचीं मनें अशीं आहेत त्यांच्या त्या मनाला धिःकार असो! त्यांस हा शापच आहे. या शापाच्या प्रभावानें तमाम इटली देशांत घरोघर आपापसांत यादवी माजून राहो! व तिच्या भरांत त्वेष व परस्परांचा द्वेष हे दुष्ट विकार त्यांच्यांत विकोपास जावोत! व सर्वत्र रक्तपात करून सर्वांचा संहार उडवोत! मग तेंणेकरून आपोआपच असें घडून येईल कीं भयंकर कृत्यांची मनाला चट लागून गेल्यामुळें बालकांचे तुकडे तुकडे झालेले पाहून त्यांच्या आया हंसत राहातील! क्रूर कर्मांची चाल पडून गेल्यामुळें त्यांच्याखालीं दयाबुद्धी पूर्णपणें दडपून जाईल! आणि सूड घेण्याच्या उद्देशानें सिझरचें पिशाच्च अतीशय संतापून भटकत फिरेल, व आपल्या बरोबर सूड घेणाऱ्या क्रूरतेच्या देवतेला पाताळा-

मधून घेऊन येईल ! आणि सर्वांचें वाटोळें होवो असें बादशाही आवाजानें तें सर्व देशभर ओरडत जाईल ! व भयंकर दुष्काळ, रक्तपात, हाहाःकार इत्यादि युद्धाच्या शिकारी कुत्र्यांना मोकळें करील ! मग सहजच मुठमाती न मिळालेल्या व कण्हत पडलेल्या प्रेतांचा दुर्गंधी, समस्त पृथ्वी व्यापून, आकाशांत फार लांबवर जाऊन पोंचेल !

( एक चाकर प्रवेश करतो )

( त्यास उद्देशून ) तूं ऑक्टेव्हियस सीझरची नोकरी करतोस, नाहीं का ?

**चाकर**—होय, ॲन्टनी साहेब !

**ॲन्टनी**—तूं रोमला निघून ये, असें सीझर माहाराजांनीं त्याला लिहिलें होतेंना ? तुला कांहीं यांतलें माहित आहे ?

**चाकर**—त्यांचीं सर्व पत्रें माझ्या धनी साहेबांना पोंहोंचलीं, व तेही त्याप्रमाणें निघालेच आहेत. आणि आपल्याला तोंडींच निरोप सांग, ह्मणून त्यांनीं मला सांगितलें आहे.— ( प्रेत आणलेलें पाहून ) हे कोण ?—सीझर माहाराज !

**ॲन्टनी**—अरे बाबा, तुझें अंतःकरण दुःखानें भरून आलें आहे काय ? तुला दुःखाचे उमाळे येत असले, तर

अम्मळ बाजूला तरी हो! तुला तर दुःखाचे वेग आलेले स्पष्ट दिसत आहेत; आणि त्यामुळें तुझ्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या आहेत; आणि त्या पाहून माझेही डोळे भरून आले आहेत. कायरे बावा! तुझा धनी याव-यास निघाला आहे काय ?

**चाकर**—होय महाराज, रोमनगरापासून सुमारें सहाएक कोशांवर आजच रात्रीं त्यांचा मुक्काम होणार आहे.

**ॲन्टनी**—असें काय ? तर मग याच पावलीं परत जा, आणि जलदीनें प्रवास करून हा प्रकार त्यांला विदित कर, आणि सांग कीं समस्त रोमनगर शोकानें भरून गेलें आहे, व नगरांतील समस्त लोक खवळून गेले आहेत, आणि ऑक्टेव्हियस सीझरनें येथें यावें अशी रोमनगर येथील स्थिती निर्भय नाहीं! पण जरा थांब! हें प्रेत बाजारच्या जागीं मी नेलें नाहीं तों पर्यंत तूं कांहीं जाऊं नकोस. मी इतक्यांतच तेथें या संबंधानें भाषण करणार आहें, तें ऐकून या अधमांचें हें दुष्टकृत्य लोकांस कितपत पसंत पडलें आहे, व ते काय म्हणतात हें आपणांस कळेल. तेव्हां हें कळल्यावर मग तूं जाशील तर बरें! तुला तेथली खरी खरी स्थिति तरी तुझ्या धन्याला सांगतां येईल! बरें ये, अम्मळ हात लाव पाहूं!

( सीझरचें प्रेत घेऊन जातात. )

# प्रवेश २ रा.

स्थळ–कॅपिटोल सभेचा चौक.

( ब्रूटस व केशियस प्रवेश करितात व लगेच त्यांच्या मागोमाग नागरीकांचा घोळकाही येतो. )

**नागरिकजन**—नाहीं ! नाहीं! तसें नाहीं ! आमची खात्री झाली पाहिजे ! अहो आमची खात्री होऊं द्या !

**ब्रूटस**—तर मग मित्रांनों ! माझ्या मागून चला, व आमचें बोलणें ऐकून घ्या ! अरे केशियस, यांतून कांहीं मंडळीला तूं तिकडल्या दुसऱ्या एका चवाठ्यावर घेऊन जा. जमलेल्या लोकांची गर्दी फारच दिसते. तेव्हां यांचे आपण दोन भाग करूं ह्मणजे कांहीं मंडळी तिकडे येतील. ज्यांना माझें भाषण ऐकावयाचें असेल ते येथेंच राहातील व केशियसचें ज्यांना ऐकावयाचें असेल ते तिकडे त्याच्या बरोबर जातील. आह्मीं आपल्या भाषणांत सीझरच्या मरणाची सविस्तर कारणें जाहिर करणार आहों.

**पहिलानागरिक**—मी तर बोवा, ब्रूटस याचें भाषण ऐकतों.

**दुसरा नागरिक**—आणि मी केशियस यांचें ऐकतों, आणि मग दोघांनीं वेगळीं वेगळीं केलेलीं भाषणें आपण

ताडून पाहूं; ह्मणजे त्यांनीं आपापले परी सांगितलेलीं कारणें कोणाचीं कितपत वाजवी आहेत याचा आपणांस विचार करतां येईल.

( केशियस व त्याच्या मागून कित्येक नागरिक जातात. )

( ब्रूटस सार्वजनिक भाषण पीठावर जातो. )

**तिसरा नागरिक**—हा पहा श्रेष्ठ ब्रूटस, भाषण पीठावर येऊन उभा राहिला; तो काय बोलतो तें आधीं ऐका.

**ब्रूटस**—सांगतों तें शेवटपर्यंत स्वस्थपणें ऐकून घ्या. रोमन लोकहो! मद्देशबांधवहो! हे प्रियजनहो! मी जें कांहीं सांगतों तें नीट ऐकून घ्या. अम्मळ गडबड होऊं देऊं नका, ह्मणजे माझें भाषण तुह्मांला नीट ऐकूं येईल. माझ्या थोरपणाचा जर तुह्मांला बोज ठेवावयाचा असेल, तर माझ्या सांगण्यावर भरंवसा ठेवा; आणि माझ्या थोरपणाचा जर तुह्मीं मान ठेवला, तर माझ्या ह्मणण्यावर तुमचा विश्वास बसेल. मी काय ह्मणतों तें नीट समजून घ्या. आणि तें तुह्मीं नीट समजून घेतलें, तर मजविषयीं तुमचा ग्रह समंजसपणाचा होईल, असा मला भरंवसा आहे. आमचें करणें वाजवी आहे किंवा गैर वाजवी आहे, याचा योग्य न्याय करतां यावा, यासाठीं तुह्मीं आपल्या विचारशक्तीला जागृत करा ! येथें जमलेल्या मंडळींत सीझरचा कोणी प्रिय

मित्र आहे काय?—असल्यास मी त्याला स्पष्टपणें सांगतों कीं सीझरवर त्याचें जेवढें प्रेम होतें, त्याहून ब्रूटस याचें प्रेम त्याजवर काडीमात्र उणें नव्हतें. मग ब्रूटस सीझरवर कां उठला असें जर तो मित्र मला विचारील, तर त्याला माझें असें उत्तर आहे कीं:—सीझरवर माझें प्रेम उणें होतें हें त्याचें कारण नाहीं, तर रोमनगरावर माझें प्रेम अधिक आहे, हेंच त्याचें मुख्य कारण आहे! हे सज्जनहो! तुह्मींच सांगा, सीझरनें जगून सर्व लोकांनीं गुलामगिरींत मरावें, हें तुह्मांला बरें वाटतें काय? अथवा सीझरनें मरून सर्व लोकांनीं स्वातंत्र्यसुखांत कालक्षेप करावा, हें तुह्मांस बरें वाटतें? मी तुह्मांला खचित सांगतों, ज्याअर्थी सीझरचें माझ्यावर प्रेम होतें, त्याअर्थी मी त्याच्यासाठीं अश्रू ढाळीन. ज्याअर्थी तो भाग्यवान होता त्याअर्थी त्याचें भाग्य आठवून मला आनंदच होईल! आणि ज्याअर्थी तो शूर होता, त्याअर्थी त्याच्या शौर्याला मी नेहमी मानच डोलवीन! आणि ज्या अर्थी मी त्याचा गौरव करतों, त्याअर्थी मला त्याचा अभिमान आहे हें स्पष्टच आहे! परंतु जेव्हां तो महत्वाकांक्षेच्या भरीं भरून जुलमी होतोसा दिसूं लागला, तेव्हां अशा रितीनें आम्हीं त्याचें पारिपत्य केलें, यांत आम्ही काय गैर केलें? त्याच्या प्रेमास्तव डोळ्यांवाटे अश्रु यावे, त्याचें भाग्य

आठवून आनंद व्हावा,त्याचें शौर्य आठवून मान डोलवावी, त्याचप्रमाणें महत्वाकांक्षेच्या पायीं त्याला मरण यावें हें योग्य नाहीं काय ? गुलाम होऊन राहावें असें ज्याला वाटतें, असा नीच वृत्तीचा मनुष्य येथें कोणी असेल काय ? असेल तर त्यानें पुढें यावें; त्याला मात्र मी खरोखर दुखविलें असें होईल, त्याचा मात्र मी अपमान केला असें मी ह्मणेन ! रोमन ह्मणवून घेण्याची ज्याला इच्छा नाहीं असा रानटी मनुष्य येथें कोणी आहे काय ? जर कोणी असेल तर त्यानें पुढें यावें; खचित, त्याला मात्र यांत मीं दुखविलें असें होईल, व यांत माझ्या हातून त्याचा अपमान झाला असें मीं ह्मणेन ! ज्याच्या हृदयांत जन्मभूमीविषयीं प्रेम वास करित नाहीं असा नीच वृत्तीचा मनुष्य येथें कोणी आहे काय ? कोणी असेल तर त्यानें पुढें येऊन बोलावें; त्याला मात्र यांत मी खचित् दुखविलें असें होईल, व यांत माझ्या हातून त्याचा उपमर्द झाला असें मी ह्मणेन ! याचें उत्तर कोणाकडून मला मिळेल काय ? तें मिळे तोंवर मी अम्मळ थांबतों.

**सर्वलोक**—अहो कोणी नाहीं ! कोणी नाहीं !

**ब्रूटस**—तर मग आम्हीं कोणालाच दुखविलें नाहीं हें उघड झालें ! सारांश तुह्मीं जसे माझ्याशीं वागलां असतां, तसेच आम्हीं सीझरशीं वागलों, त्याहून आम्हीं

अधिक तें काय केलें आहे ? त्याच्या मरणाची हकिगत कॅपिटोल सभेमध्यें आम्हीं लिहून ठेविली आहे. आम्हीं जें लिहिलें आहे त्यांत त्याच्या शौर्याला उचित असेंच लिहिलें आहे.—कोणत्याही प्रकारें उणेपणा आणलेला नाहीं; किंवा ज्या अपराधास्तव त्याला मरण प्राप्त झालें ते अपराध बळेंच त्याच्यावर लादलेले नाहींत.

( इतक्यांत ॲन्टनी व दुसरे लोक सीझरचें प्रेत घेऊन प्रवेश करितात. )

ज्याच्यामुळें ॲन्टनीला एवढें पराकाष्ठेचें दुःख झालें आहे, तें हें पहा सीझरचें प्रेत. खरें ह्मटलें असतां, सीझरला मारण्यांत ॲन्टनीचा मुळींच हात नव्हता; असें आहे तरी सीझरच्या मरणामुळें जें लोकसत्तात्मक राज्य स्थापन होईल, त्यांत राज्यकारभाराचा एक वांटा त्याच्या वांट्याला येईल. हा सीझरच्या मरणापासून त्याचा फायदाच झाला; तो तुह्मांला कोणाला मिळेल काय ? रोम नगराच्या कल्याणासाठीं आज मी आपल्या एका उत्तम मित्राला मारलें, आणि अशीच पाळी जर मजवर आली व स्वदेशासाठीं मी मरावें असें ठरलें, तर ज्या कटयारीनें मी सीझरला मारिलें तीच कट्यार माझा अंत करण्यालाही उपयोगी पडो; असें ह्मणून मी आपला निरोप घेतों.

**सर्वलोक**—हे महाभाग ब्रूटस ! जा खुशाल जा ! तुझ्या जीवाला काडीमात्र अपाय होणार नाहीं !

**पहिला नागरिक**—थाटामाटानें त्याला त्याच्या घरीं घेऊन चलाहो!

**दुसरा नागरिक**—त्याच्या पूर्वजांप्रमाणें त्याचाही एक पुतळा उभा करा !

**तिसरा नागरिक**—अहो, त्याला सीझर करा !

**चवथा नागरिक**—सीझरचे उत्तम गुण ब्रूटसमध्यें वसत असल्यामुळेंच, आपण ब्रूटसलाच राजा करावें हें बरें!

**पांचवा नागरिक**—आपण आनंदानें वाजत गाजत त्याची मिरवणूक काढून त्याला त्याच्या घरीं नेऊन पोंचवूं.

**ब्रूटस**—हे स्वदेशबांधवहो !—

**दुसरा नागरिक**—ऐकाहो ! ब्रूटस बोलत आहे. अंमळ थांबा तरी!

**पहिला नागरिक**—ऐकाहो !

**ब्रूटस**—हे सद्गृहस्थहो ! मी एकटाच जातों. मला एकट्यालाच जाऊं द्या. आणि मी सांगतों कीं तुम्हीं येथेंच राहा. ॲन्टनी तुम्हांला कांहीं सांगणार आहे, तर तेंही ऐकून घ्या. सीझरच्या शवाला मान द्या. त्याच्या वैभवाची प्रशंसा तो करील तर करूंद्या. काय चिंता आहे ? मी आतां जातों. तुम्ही मात्र ॲन्टनीचें भाषण

ऐकल्यावांचून जाऊं नये अशी माझी सर्वांस विनय पूर्वक विनंति आहे.

( ब्रूटस जातो. )

**पहिला नागरिक**—थांबा, तर मग. लोकहो! आपण ॲन्टनीचें भाषण ऐकूंया.

**तिसरा नागरिक**—अहो! त्याला सार्वजानिक भाषण-पीठावर येऊंद्या. त्यानें तेथें येऊन उभें राहावें. खरो-खर, आपण त्याचें भाषण ऐकून घेऊं. हा ॲन्टनी खरो-खरच थोर आहे. –(ॲन्टनीकडे वळून) जा हो; तुह्मीं वर जाऊन उभे राहा.

**ॲन्टनी**—ब्रूटस यानें आतांच जें कांहीं तुह्मांला सांगितलें, त्याबद्दल मी त्याचा फार आभारी आहें. आपण सर्वजण मला भाषणपीठावर जाऊन बोलण्यास सांगत आहां, याबद्दलही मी आपला ऋणी आहें (भाषणपीठावर जातो)

**चवथा नागरिक**—ब्रूटसचें नांव घेऊन तो काय ह्मणाला हो?

**तिसरा नागरिक**—तो ह्मणाला, ब्रूटस यानें मेहेरबानी केली ह्मणून तुह्मीं सर्वांनीं मला भाषणपीठावर जावयास सांगितलें याबद्दल मी तुमचा आभारी आहें.

**चवथा नागरिक**—तुह्मांला खचित सांगतों, यानें जर ब्रूटस याची टवाळी केली नाहीं तर बरें होईल!

**पहिला नागरिक**—अहो, हा सीझर ह्मणजे केवढा जुलमी राजा !

**तिसरा नागरिक**—यांत काय संशय ? हें रोमनगर त्याच्या जुलमांतून सुटलें, हें आपलें सर्वांचें भाग्यच समजलें पाहिजे !

**दुसरा नागरिक**—ऐकाहो ! अम्मळ थांबा. ॲन्टनी काय बोलतो तें आपण ऐकूं तरी.

**ॲन्टनी**—हे सद्‌गृहस्थहो ! समस्त रोमन लोकहो !

**नागरिक**—ऐकाहो ! त्याचें भाषण तर आपण आधीं ऐकून घ्या.

**ॲन्टनी**—हे मित्रहो ! रोमन लोकहो ! स्वदेशबांधव हो ! माझें समग्र भाषण लक्ष देऊन ऐकून घ्या. मी जो आतां आलों आहें, तो सीझरला मूठमाती देण्याकरितां आलों आहें; त्याची स्तुति करण्याकरितां आलों नाहीं. मनुष्यें ज्या वाईट गोष्टी करितात, त्या तीं मेल्यावर मागें राहातात. पण त्यांनीं केलेलीं सत्कृत्यें मात्र त्यांच्याबरोबरच धुळीस मिळतात. मग सीझरच या गोष्टीला कोठून अपवाद होईल ? सीझर महत्वाकांक्षी होता, असें थोर ब्रूटसनें आपल्याला सांगितलें. हें जर खरें असलें तर सीझरचे ठिकाणीं हा मोठाच दोष होता ह्मणून ह्मटलें

पाहिजे; व त्याबद्दल कोणालाही वाईट वाटेल, यांत शंका नाहीं. आणि त्याचें सीझरला जें शासन मिळालें तेंही जबरच मिळालें ! ब्रूटस हा आपणा सर्वांना वंद्य आहे; तशीच ही बाकीची मंडळीही वंद्यच आहे. आणि मी जो आतां सीझरच्या प्रेतसंस्काराचे वेळीं भाषण करण्याला आलों आहें, तोही ब्रूटस याच्या व इतर मंडळीच्या परवानगीनेंच आलों आहें. सीझर माझा मित्र होता; व माझ्याशीं तो अतिशय विश्वासानें व न्यायानें वागे. पण तो महत्वाकांक्षी होता असें ब्रूटस ह्मणतो; व ब्रूटस थोर गृहस्थ आहे हें आपणा सर्वांना ठाऊकच आहे. सीझरनें लढाईंत पुष्कळ लोकांना कैदी करून येथें रोमला आणिलें, त्यांच्या खंडणीची रक्कम येथें खजिन्यांत जमा झाली आहे. तर मी आपल्याला विचारतों, सीझरचें हें कृत्य महत्वाकांक्षीपणाचें झालें काय ? जेव्हां जेव्हां ह्मणून गोरगरिबांना दुःख झालेलें त्याच्या नजरेस येई, तेव्हां तेव्हां त्याचें त्याला अत्यंत वाईट वाटे हें सर्वांना माहितच आहे. खरें ह्मटलें, तर जो महत्वाकांक्षी आहे त्याचें हृदय निष्ठूर असायचें; त्याला कांहीं एक दिसायाचें नाहीं. तरी तो महत्वाकांक्षी होता असेंच ब्रूटस ह्मणतो. आणि सीझर तर गरीबांचा कनवाळू होता. आणि ब्रूटस तर एक थोर गृहस्थ आहे यांत शंका नाहीं. अहो ! ल्युपरकल सणाचे दिवशीं मी स्वतः

सीझरला तीन वेळां राजचिन्हांकित मुकुट अर्पण केला; पण त्यानें तिन्ही वेळां तो स्वीकारला नाहीं, हें त्यावेळीं आपणच सर्वांनीं पाहिलेंना ? हें त्याचें कृत्य महत्वाकांक्षेचें झालें काय ? तरी तो महत्वाकांक्षी होता असेंच ब्रूटस ह्मणतो ! आणि ब्रूटस हा थोर गृहस्थ आहे याविषयीं आपली खात्रीच आहे. ब्रूटस जें बोलला तें खोटें आहे असें दाखविण्याची खटपट मी करणार नाहीं. तथापि मला जें कांहीं माहित आहे, तेंच मी आपल्याला सांगत आहें व तें सांगावें यासाठींच मी येथें उभा राहिलों आहें. एके वेळीं आपणा सर्वांचें सीझरवर मोठें प्रेम होतें व आपणा सर्वांना तो प्रिय वाटत होता. व तो प्रिय वाटत होता तो कांहीं कारणांवांचून वाटत नव्हता. तर मग त्याच्या मरणाचें आपणा सर्वांस दुःख वाटूं नये, असें आतांच कोणतें कारण उपस्थित झालें आहे ? हे न्यायदेवते ! तूं क्रूर व हिंस्रपशूंकडे वळून केवळ पशू बनली आहेस ! माणसांच्या अंतःकरणांतून सद्बुद्धि नष्ट झाली आहे ! गृहस्थहो ! मला गहिंवर आला. माझ्यानें आतां बोलवत नाहीं, क्षमा करा. माझें अंतःकरण सीझरबरोबर त्याच्या शवभाजनामध्यें कोंहीं जाऊन बसलें, तें परत येत नाहीं ह्मणतें. तर तें येईपर्यंत तरी मी अंमळ विसावा घेतों !

**पहिला नागरिक**—काय हो, याच्या बोलण्यांत बरेंच तथ्य दिसतें, नाहीं बरें ?

**दुसरा नागरिक**—या सर्व प्रकरणाचा तूं बरोबर विचार करशील, तर मला वाटतें, सीझरवर हा विनाकारण गहजब उडाला असें तूंही ह्मणशील.

**तिसरा नागरिक**—तुह्मीं ह्मणतां तेंच बरोबर आहे, असेंच ह्मटलें पाहिजे. नाहीं तर काय ? त्याच्या मागून जो येईल तो त्याच्याहूनही वाईट न येवो ह्मणजे झालें !

**चवथा नागरिक**—अहो, तो जे बोलला ते शब्द तुमच्या लक्षांत आले काय ? मुकुट स्वीकारण्याचें तो कबूल करीना, यावरूनच तो कांहीं महत्वाकांक्षी नव्हता हें उघड झालें; आणखी काय पाहिजे ?

**पहिला नागरिक**—हें जर खरें ठरलें तर या कृत्याबद्दल त्यांना कांहीं तरी जबर भुर्दंड द्यावा लागेल !

**दुसरा नागरिक**—अरेरे गरीब बिचारा ! रडून रडून त्याचे डोळे कीं हो इंगळाप्रमाणें लाल झाले !

**तिसरा नागरिक**—मी तुह्मांला सांगतों, ॲन्टनीसारखा सगळ्या नगांरत दुसरा थोर माणूस मिळणें कठीण !

**चवथा नागरिक**—तो पाहा, फिरून बोलावयास उभा राहिला. आतां लक्ष देऊन ऐका बरें.

**ॲन्टनी**—कालपर्यंत सीझरच्या शब्दांत, ह्मणेल तें तो करील असें सामर्थ्य होतें, आणि आज तो मरून पडला मात्र तों तो अगदीं दीन झाला, व त्याच्या शब्दांतलें सामर्थ्य गेलें. अगदीं हलक्या यःकश्चित मनुष्याच्या मनांत देखील आतां त्याला वंदन करावें असें येत नाहीं, हें मी डोळ्यांनीं पाहात आहें. गृहस्थहो ! तुह्मांला त्वेष आणून, तुमचीं अंतःकरणें बंडाला प्रवृत्त करावीं असें जर मी मनांत आणलें असतें तर तसें मला करतां आलें असतें, व तसें करून, अनेक प्रकारांनीं ब्रूटसला उपद्रव देतां मला आला असता; केशियस याचाही छळ मला करतां आला असता. तथापि ते सर्व लोक थोर आहेत हें तुह्मीं जाणतच आहां, तेव्हां त्यांना मी अपकार करूं इच्छित नाहीं. अशा प्रतिष्ठित माणसांना उपद्रव करणें बरोबर नाहीं. एक वेळ, ह्या मृत मनुष्याच्या कीर्तिला डाग लागला तरी पुरवला, किंबहुना माझी अपकीर्ति झाली अथवा आपणा सर्वांचा दुर्लौकिक झाला तरी चिंता नाहीं, पण थोर मंडळीचा अपमान झालेला पाहाणें मला बरें वाटत नाहीं. पण हें पहा, सीझरचा शिक्का मोर्तब केलेलें एक चर्मपत्र मला त्याच्या एकांताच्या खोलींत सांपडलें. हें त्याचें मृत्यूपत्र आहे. या मृत्युपत्रांत काय लिहिलें आहे तें सर्वांनीं ऐकावें–पण नको ! हें मी वाचून दाखवित नाहीं याबद्दल

आपण मला क्षमा करा. मी तर ह्मणतों लोकांनीं जाऊन सीझरच्या जखमांचें चुंबन घ्यावें, आणि आपापले हात-रुमाल त्याच्या पवित्र रक्तांत भिजवून घेऊन, त्याचे स्मरणार्थ ते जवळ बाळगावे; एवढेंच नाहीं, तर त्याचा एकेक केसही काढून घेऊन, त्याचा उल्लेख मरतेवेळीं आपल्या मृत्युपत्रांत करावा; व तो बहुमोल समजून आपल्या मुलांकरितां त्यांचें कल्याण व्हावें ह्मणून राखून ठेवावा.

**चवथा नागरिक**—अहो, तें मृत्युपत्र वाचा बरें आधीं !

**सर्वजण**—अहो ! तें मृत्युपत्र ! आधीं तें मृत्युपत्र ! सीझरचें मृत्युपत्र ऐकण्याची आह्मांला फार इच्छा आहे, तर तेंच आधीं वाचा.

**अन्टनी**—मित्रहो ! जरा धीर धरा. नको ! मी कांहीं तें वाचित नाहीं—खचित वाचणार नाहीं. सीझरचें तुमच्या-वर केवढें प्रेम होतें, हें तुह्मांला समजणें सध्यां काहीं इष्ट नाहीं. तुह्मीं कांहीं लांकडें नव्हे ! तुह्मीं कांहीं दगड नव्हे ! तर माणसें आहां, व ज्याअर्थी तुह्मीं माणसें आहां, त्याअर्थी सीझरचें मृत्युपत्र ऐकून तुमचें मन खवळेल,तुमचें मस्तक फिरेल, यांत शंका नाहीं. तेव्हां तुह्मी त्याचे वारस आहां हें तुह्मांला समजणें कांहीं चांगलें नाहीं. कारण तुह्मांला जर हें कळलें तर त्यापासून निष्पन्न तें काय होणार ?

**चवथा नागरिक**—तुह्मीं तें मृत्युपत्र आधीं वाचा तर खरे. आह्मीं एकतों. ॲन्टनी! तुह्मीं तें मृत्युपत्र आह्मांला वाचून दाखवा.

**ॲन्टनी**—तुह्मी जरा धीर धराल काय? अम्मळ थांबा तर खरे! मृत्युपत्रासंबंधें बोलतांना जें बोलावयाला नको होतें तें बोलून गेलों, हें कांहीं चांगलें झालें नाहीं. ज्यांच्या कट्यारींनीं सीझरला भोंसकून मारिलें, अशा त्या श्रेष्ठ गृहस्थांना यांत मी दुखाविलें कीं काय, अशी मला शंका येते. मला हेंच भय पडलें आहे. काय करावें?

**चवथा नागरिक**—अरे ते कोण? ते तर राजद्रोही! थोर लोक कसले?

**सर्वजण**—( ओरडून )अहो, आधीं तें मृत्युपत्र—तें करार-पत्र कुठें आहे?

**दुसरा नागरिक**—ते कोण?—शुद्ध हरामखोर! मांग कुठले!—बरें तें मृत्युपत्र आधीं वाचा पाहूं!

**ॲन्टनी**—एकूण तें मृत्युपत्र आतां वाचूं ह्मणतां? बरें, तर वाचतों मला तें आतां वाचणें भागच आहे. बरें, तर असे येथें या. सीझरच्या प्रेताभोंवताली उभे राहा; ह्मणजे ज्यानें तें मृत्युपत्र केलें तो मनुष्य तुह्मांला दिसेल—मग काय ह्मणतां?—खालीं उतरूं? या गोष्टीला आहे आपणा सर्वांची परवानगी?

**कित्येक नागरिक**—हो हो ! या, खालीं या.

**दुसरा नागरिक**—आतां खालीं याच. नाहीं–हो ह्मणूं नका ! ( ॲन्टनी खालीं उतरतो. )

**तिसरा नागरिक**—आहे हो–परवानगी आहे !

**चवथा नागरिक**—अहो, सर्वजण असे वर्तुळाकार उभे राहा.

**पहिला नागरिक**—तरी पण प्रेतापासून अंमळ लांब उभे राहा.–एवढे खेटून कशाला उभे राहातां ?

**दुसरा नागरिक**—अहो, यांना उभे राहायला जागा करा.

**ॲन्टनी**—छे हो ! मला इतके खेटून उभे राहूं नका. अंमळ दूर दूर तरी व्हा.

**कित्येक नागरिक**—अम्मळ मागें व्हा हो.

**ॲन्टनी**—सद्गृहस्थहो ! तुमच्या डोळ्यांना जर अश्रु येत असले तर ते आतां खुशाल ढाळा ! हा झगा आपणा सर्वांच्या ओळखीचाच आहे. पहा बरें ! सीझरनें तो अगदीं पहिल्यानेंच जेव्हां घातला, तेव्हांची मला चांगली आठवण आहे. ती वेळ ग्रीष्म ऋतूंतील सायंकाळची होती. व नेर्व्ही लोकांचा मोड करून आल्यावर तो आपल्या तंबूंत येऊन बसला होता. ही पहा, याच ठिकाणीं केशियसची कट्यार आरपार गेली आहे ! त्या

मत्सरी कॅस्कानें कसा हा वार केला आहे पहा ! आणि ही याच ठिकाणीं त्याच्या अत्यंत प्रिय ब्रूटसनें कट्यार भोंसकली आहे ! आणि वार लागल्यावर, कट्यार बाहेर काढून घेत असतां, हा वार कोणीं केला हें पाहण्याकरितांच कीं काय, सीझरच्या शरिरातलें रक्त भळभळ भळभळ बाहेर निघालें ! कारण, तुह्मांला माहितच आहे कीं, ब्रूटस हा सीझरचा अत्यंत प्रिय मित्र होता. आणि हे आकाशस्थ देवांनो ! सीझरला तो किती प्रिय होता याला तुह्मींच साक्षी आहां ! खचित, खचित, हाच तो अगदीं क्रूरपणें केलेला वार बरें ! कारण, ब्रूटसच आपल्याला मारित आहे असें जेव्हां सीझरनें पाहिलें, तेव्हां सीझर एवढा बलवान् खरा तरी तो गडबडला, त्याचे हातपाय गळाले, आणि तो हतवीर्य झाला. त्याला वाटलें, ह्या राजद्रोह्यांच्या शस्त्रांहून कृतघ्नतेची धार अत्यंत तीक्ष्ण होय ! मग तोंड झग्याखालीं गुरफटून घेऊन, जेथपावेतों रक्ताचा लोट वहात गेला होता, अशा त्या पाम्पीच्या पुतळ्याच्या पायथ्याशीं गडगडत जाऊन, तो धाडकन् पडला ! हे माझ्या देशबांधवांनो ! हें अधःपतन त्याचें कसलें ? क्रूर राजद्रोह्यांचा विजय होऊन, त्यावेळीं मी, तुह्मीं आणि हे—आपणा सर्वांचेंच अधःपतन झालें असें ह्मटलें पाहिजे ! रे रे ! आतां तुह्मीं रडत आहां,

दयेचा संस्कार तुमच्या मनांवर झालेला दिसत आहे, हें मी प्रत्यक्ष पाहातों. तुमच्या हृदयांत दया उत्पन्न होऊन, तुमच्या डोळ्यांतून टपटप अश्रू वाहात आहेत, हें काय ? दयावंत गृहस्थांनो ! आपल्या सीझरला वार लागलेले पाहून तुह्मीं रडतां काय ? हा पाहिलात का सीझर, राजद्रोह्यांनीं कसा छिन्नविच्छिन करून टाकला आहे !

**पहिला नागरिक**—काय हा शोककारक देखावा ! हा पाहून करुणाच उत्पन्न होते !

**दुसरा नागरिक**—हे थोर सीझरा ! काय ही तुझी दशा ?

**तिसरा नागरिक**—काय हा दुःखकारक दिवस तरी !

**चवथा नागरिक**—अरे राजद्रोह्यांनो ! हराम खोरांनो !

**पहिला नागरिक**—कोण भयंकर प्रसंग हा !

**दुसरा नागरिक**—खरोखर याचा सूड उगवला पाहिजे.

**सर्वजण**—सूड ! सूड ! चला सर्वांना हुडकून काढा. त्यांचीं घरेंदारें जाळा. पेटवा, मारा, ठार करा, एकाही राजद्रोह्याला जिवंत ठेवूं नका !

**ॲन्टनी**—देशबांधव हो ! थांबा, अंमळ थांबा.

**पहिला नागरिक**—ऐकारे ॲन्टनी काय सांगत आहे तें.

**दुसरा नागरिक**—हो हो ! आह्मीं तो ह्मणेल तें तें ऐकूं. तो सांगेल तें तें करूं. आपण त्याचे अनुयायी होऊं. आह्मी त्याजबरोबर मरावयास देखील तयार होऊं.

**ॲन्टनी**—हे प्रिय मित्रांनो ! बंडाच्या या असल्या अकल्पित उपक्रमाला मी तुह्मांला प्रवृत्त करीत नाहीं; अथवा करणार नाहीं. ज्यांनीं असलें कृत्य केलें, ते थोर सन्माननीय व वंद्य आहेत. तथापि त्यांनीं असें कृत्य कां केलें, व तें करण्याला गुप्त व खासगी कारणें त्यांना काय होतीं, एवढ्या कोणत्या अंतस्थ दुःखांनीं ते गांजले होते, हें मला सांगतां येत नाहीं. ते सुज्ञ आहेत, थोर आहेत, तेव्हां निःसंशय याचें उत्तर तुह्मांला तेच देतील. मित्रांनो ! ब्रूटसच्या इतका मी कांहीं वक्ता नाहीं, आणि तुमचीं अंतःकरणें वळविण्याकरितां कांहीं मी येथें आलों नाहीं. तुह्मांला सर्वांना माहितच आहे कीं मी एक आपला सामान्य प्रतीचा व सरळ मनाचा, तथापि ज्याला मित्र ह्मणविला त्याजवर एकनिष्ठपणें प्रेम करणारा, असा एक मनुष्य आहें. आणि ज्यानीं मला येथें बोलण्याची परवानगी दिली, त्यांना देखील ही गोष्ट माहित आहे. ज्याच्या योगानें मनुष्यांचें रक्त खवळून टाकतां येईल असें वाक्चातुर्य, अशी शब्दभांडाराची अनुकूलता, आणि असें कर्तृत्व, यांतून एकही गोष्ट

मला अनुकूल नाहीं. मला जें वाटतें तें तें मी आतां सरळ वाणीनें बोलून टाकतों. मी अधीक तें काय सांगणार ? जे आह्मांला तुह्मांला ठाऊक आहे, तेंच मी बोलून जातों. आपणा सर्वांना प्रिय असलेल्या सीझरला जे वार लागले आहेत ते दाखवून, त्या बिचाऱ्या मुक्या तोंडांनाच मी बोलूं देतों,–तींच काय बोलावयाचें तें बोलतील. मला कशाला बोलावयास पाहिजे ? मी तुह्मांस खोटें सांगत नाहीं; मी जर ब्रूटस असतों, व ब्रूटस हा ॲन्टनी असता, तर मात्र तुमची चित्तवृती प्रक्षुब्ध करून टाकणारा, आणि रोम नगरांतील दगडाला देखील पाझर फोडून बंडाला प्रवृत्त करणारा, व सीझरच्या प्रत्येक जखमेंतून तशा अर्थाचा प्रवृत्तीकारक वाक्प्रवाह काढणारा, आणखी एक नवाच ॲन्टनी तुह्मांला पाहायला सांपडला असता.

**सर्वजण**—( मोठ्यानें ओरडून ) बस बस ! आह्मीं दंगा करून सोडूं !—बंड उठवूं.

**पहिला नागरिक**—चला चला. आधीं ब्रूटसचें घर जाळूं या.

**तिसरा नागरिक**—तर चला. दरोबस्त कटवाल्यांना हुडकून काढूंया.

**ॲन्टनी**—अरे बांधवहो ! माझें ऐका तर खरें— माझें बोलणें तर ऐकून घ्या.

**सर्वजण**—ऐकारे ! अतीश्रेष्ठ ॲन्टनीचें बोलणें ऐकून घ्या.

**ॲन्टनी**—मित्रांनो ! काय केलें पाहिजे याची तुह्मांला कांहीं एक कल्पना नाहीं; आणि असें असतां, तुह्मीं कांहीं तरी करावयाला एकदम निघालां, हें बरें नाहीं. कोणत्या गोष्टीमुळें सीझर तुमच्या प्रेमाला पात्र आहे, हें तुह्मांला ठाऊक आहेका ? छे ! छे ! कोठून असेल ? तर आधीं तीच गोष्ट तुह्मांला सांगितली पाहिजे. मघांशीं मी सीझरच्या मृत्युपत्राविषयीं बोललों, तें तुमच्या लक्षांत आहेना ?

**सर्वजण**—हो हो ! आहे लक्षांत. हो हो ! मृत्युपत्र ! त्यांत काय आहे तें आह्मांस सांगा पाहूं. तेंच आह्मी आधीं ऐकूं.

**ॲन्टनी**—हें पाहा तें मृत्युपत्र. यावर सीझरचा शिक्का मोर्तब आहे. दरोबस्त रोमन नागरिकांना एकेकाला पाउणशें पाउणशें नाणीं रोकड द्यावीं, ह्मणून ह्यानें यांत स्पष्ट लिहून ठेविलें आहे.

**दुसरा नागरिक**—खरोखरीच सीझर महाराज फारच

उदार होते बोवा.—इतकें कोणी नसेल. त्यांच्या वधाचा सूड घेतलाच पाहिजे. आह्मीं खचित घेऊं.

**तिसरा नागरिक**—हे नृपतुल्य सीझर महाराज! काय तुमचें औदार्य!

**ॲन्टनी**—अहो! आणखी मी काय सांगतों तेंही शांतपणें ऐकून घ्या.

**सर्वजण**—ऐका रे ऐका!

**ॲन्टनी**—शिवाय, सीझरनें आपलीं विहारस्थानें, खाजगी लतागृहें, आणि टायबर नदीच्या तीराला त्यानें नवीनच लाविलेल्या पुष्पवाटिका, ही दरोबस्त सारी मिळकत तुमच्या सुखाखातर देणगी ह्मणून तुह्मांला अर्पण केली आहे; व तुमच्या वारसांना या सर्व उपभोगस्थानांचा निरंतर लाभ घेतां यावा, असें करून ठेवलें आहे. वाहवारे सीझर महाराज! धन्य आहे तुझी!

**पहिला नागरिक**—खरेंच धन्य आहे! असा कोण आहे? तर चला, आपण त्याचें प्रेत वध झाला त्या पवित्र ठिकाणींच दहन करूं; आणि तींच जळकीं लाकडें त्या राजद्रोह्यांच्या घरांवर नेऊन ठेवून त्यांची रक्षा करूं. चला या! आधीं प्रेत उचला पाहूं!

**दुसरा नागरिक**—जा; विस्तव घेऊन ये.

**तिसरा नागरिक**—चला, हीं बाकेंबिकें टाका मोडून.

**चवथा नागरिक**—आणि ह्या फळ्या नी दारें नी खिडक्या फोडून मोडून फस्त करा !

( प्रेत घेऊन नागरिकजन जातात. )

**ॲन्टनी**—हें काम बरेंच रंगास आलें; येऊं द्या. एकदांची अनर्थास सुरवात झाली; होऊं द्या. आतां हा अनर्थ वाटेल तें करो व वाटेल तिकडे जावो.

( एक चाकर प्रवेश करतो. )

कसें काय आहे रे ?

**चाकर**—माहाराज, आमचे धनी आक्टेव्हियससाहेब केव्हांच रोम नगरांत येऊन दाखल झाले.

**ॲन्टनी**—मग ते आहेत कोठें ?

**चाकर**—ते व लेपिडॅस साहेब दोघेही सीझर माहाराजांच्या वाड्यांत आहेत.

**ॲन्टनी**—बरें आहे. मी तिकडेच त्यांना जाऊन भेटतों. ते तर कसे अगदीं वेळेवर येऊन पोंचले. याक्षणीं दैव आह्मांवर खूष आहे, व त्या भरांत जें जें आह्मीं ह्मणूं तें तें होईल असा रंग दिसतो.

**चाकर**—आणि माहाराज ब्रटस व केशियस हे दोघे

पिसाटासारखे रोम नगराच्या वेशीबाहेर भटकत होते ते त्यांनीं पाहिले, असेंही त्यांच्या बोलण्यांत आलें.

**ॲन्टनी**—मी लोकांचीं मनें कशीं वळवून घेतलीं, ती हकीगत त्यांना कळली असेलच. बरें, तूं मला ऑक्टेव्हियसकडे घेऊन चल.

(जातात.)

---

## प्रवेश २ रा

**स्थल**—एक रस्ता

( सिन्ना कवि प्रवेश करितो )

**सिन्ना**—आज रात्रीं मी सीझर बरोबर जेवित होतों असें मला स्वप्न पडलें; आणि असल्या भलभलत्या कल्पनांनीं माझ्या मनांत काहूर माजविलें आहे. घरांतून बाहेर पडावें, असें कांहीं माझें मन घेत नाहीं. पण काय असेल तें असो, माझ्या पायांना तर हिंडावेंसें वाटतें.

( नागरिक प्रवेश करितात. )

**पहिला नागरिक**—अरे, तुझें नांव काय ?

**दुसरा नागरिक**—अरे तूं चाललास कोठें ?

**तिसरा नागरिक**—आणि राहातोस कोठें ?

**चवथा नागरिक**—तुझें लग्न झालें आहे का ? किंवा लग्नावांचून आहेस ?

**दुसरा नागरिक**—बोल. या प्रश्नांचीं सरळ उत्तरें दे; समजलास ?

**पहिला नागरिक**—आणि चटकन उत्तरें दे.

**चवथा नागरिक**—आणि तीं मुद्याला धरून दे. उगाच पाल्हाळ लावूं नको.

**तिसरा नागरिक**—आणि जीं उत्तरें देशील तीं खरीं खरीं दे, तरच बरी गत आहे !

**सिन्ना**—काय विचारतां ? माझें नांव ? मी चाललों कोठें ? मी राहातों कोठें ? माझें लग्न झालें आहे किंवा मी लग्नावांचूनच आहें ? ठीक आहे. आतां याचीं उत्तरें एकेक जणाला, सरळ, थोडक्यांत, शहाणपणानें आणि खरीं खरीं द्यावयाचीं काय ? हो हो, हें पहा, मी अगदीं खरें सांगतों कीं मी अविवाहित आहें.

**दुसरा नागरिक**—म्हणजे जे कोणी लग्न करितात, ते एकूण मूर्ख झाले असेंच तुझें म्हणणें; नव्हे का ? मूर्खा ! असें म्हटल्याबद्दल तुला एक ठोंसा दिला पाहिजे. हं, चल पुढें. सरळ सांग.

**सिन्ना**—ह्या, अगदीं सरळ. मी सीझरच्या स्मशान-यात्रेला निघालों आहें.

**पहिला नागरिक**—बोल, तूं काय त्याचा मित्र आहेस, कीं शत्रू आहेस ?

**सिन्ना**—मित्रच आहें.

**दुसरा नागरिक**—हें मात्र अगदीं सरळ सांगितलेंस.

**चवथा नागरिक**—बरें, आतां तुझें राहाण्याचें ठिकाण कोठें तें चटकन् सांग पाहूं ?

**सिन्ना**—चटकन् थोडक्यांत सांगूं ह्मणतां ? तर घ्या. कॅपिटोल जवळच.

**तिसरा नागरिक**—बरें महाराज, तुमचें खरें खरें नांव सांगा पाहूं !

**सिन्ना**—खरेंच सांगतों, माझें नांव सिन्ना.

**पहिला नागरिक**—तर पाहातां काय ? करा त्याचे तुकडे. हा तर कटवाला.

**सिन्ना**—अहो, मी सिन्ना कवी, कवी सिन्ना.

**चवथा नागरिक**—फार वाईट कविता करतो, सबब उडवा त्याचे तुकडे. खराब कविता करतो, नाहीं ? उडवा त्याचे तुकडे.

**सिन्ना**—अहो, मी कांहीं तो कटवाला सिन्ना नव्हे.

**चवथा नागरिक**—कांहीं चिंता नाहीं. त्याचें नांव तर

सिन्ना आहे कीं नाहीं ? त्याच्या काळजांतून तेवढें नांव काढून घ्या, ह्मणजे झालें. आणखी मग जाऊं द्या त्याला.

**तिसरा नागरिक**—फाडा, त्याला फाडा. चलारे आगलाव्यांनो ! चला ब्रूटसच्या वाड्याकडे व केशियसच्या वाड्याकडे, आणि टाका सर्व कांहीं जाळून—कांहींजण डेशियसच्या घराकडे, कांहीं कॅस्काच्या घराकडे व कांहीं लिगॅरसच्या घराकडे जा. चला; निघा, निघा लवकर.

( सर्व जातात. )



ॲन्टनी–ही यादी पाहिली कारे ! येथें नांवें लिहिलीं आहेत, हे सारे जण मरायचे बरें !

ज्यूलियस सीझर--अंक ४ प्र. १ पृ. १२१

The Bombay Art Printing Works, Fort.

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—रोमनगरांतील एक घर.

( ॲन्टनी, ऑक्टेव्हियस व लेपिडस असे तिघे एका टेबलाशीं बसले आहेत )

**ॲन्टनी**—ही यादी पाहिली कारे बाबांनो ! येथें नांवें लिहिलीं आहेत, हे सारेजण मरायचे बरें !

**ऑक्टेव्हियस**—( लेपिडस याजकडे वळून ) तुझ्या भावालाही मेलें पाहिजे, समजलास ! तुला हें कबूल आहे ना?

**लेपिडस**—मला कबूल आहे !

**ऑक्टेव्हियस**—तर अहो ॲन्टनी, त्याचें नांव यादींत घाला !

**लेपिडस**—पण ॲन्टनी साहेब ! माझी एक अट आहे; ती ही कीं, तुमच्या बहिणीचा मुलगा पब्लियस हाही मग जिवंत राहातां कामानये !

**ॲन्टनी**—ठीक आहेत ! तो नाहीं जिवंत राहणार ! आतां कांहीं ह्मणणें आहे ? त्याला अन्यायी ठरवून ही पहा त्याच्या नांवावर मी फुली मारितों ! पण अरे लेपिडस, तूं सीझरच्या वाड्यांत जाऊन त्याचें मृत्युपत्र घेऊन

येशील का ? ह्मणजे त्यांत लिहून ठेवलेल्या देणग्यांतून कोणकोणत्या कसकशा कमी करायाच्या हें आपण ठरवून टाकूं.

**लेपिडस**—( ऑक्टेव्हियस याला उद्देशून ) आणखी तुमची माझी येथेंच फिरून गांठ पडायचीना ?

**ऑक्टेव्हियस**—हो. येथेंच पडेल; नाहींतर कॅपिटोल सभागृहामध्यें पडेल. ( लेपिडस जातो. )

**ॲन्टनी**—हा आपला एक हलक्या प्रतीचा मनुष्य दिसतो–बिचाऱ्यांत कांहीं पाणी दिसत नाहीं.—असलीं निरोपाचीं कामें करण्याच्या उपयोगाचा—सांगकाम्या ह्मणाना ! आणि अशी ही स्वारी आपण ह्या जगाचे तीन हिस्से केले ह्मणजे हक्कदार होऊन पुढें येणार व एकावर आयताच आपला हक्क सांगायला उभी राहाणार ! तेव्हां हें कसें जुळावें बोवा !

**ऑक्टेव्हियस**—याच्याविषयीं जर तुमचा असा ग्रह होता, तर मग कोणकोणाला देहान्त शिक्षा द्यावयाच्या आणि कोणकोणाला वगळावयाचें हें ठरवितांना तुह्मीं त्याची सल्लामसलत कां घेतली ?

**ॲन्टनी**—हें पाहा ऑक्टेव्हियस, मी तुझ्यापेक्षां अधिक पावसाळे पाहिले आहेत. तेव्हां आपल्या डोईवर येऊन

आदळणाऱ्या लोकनिंदेच्या ओझ्याला एक वांटेकरी व्हावा, ह्मणूनच या माणसाला हातीं धरावयाचा. बाकी, त्याला आपण कितीही मान अर्पण करविले तरी ते केवळ गाढवाचे पाठीवर लादलेल्या सुवर्णाप्रमाणें नाहींत काय ? मी तर ह्मणतों, याला जो आपण हातीं धरणार, तो त्यानें या ओझ्याखालीं दडपून जाऊन घामाघूम व्हावें, आणि धापा टाकित असावें, व आपण हाकूं तिकडे त्यानें बिनबोलतां जावें, व त्याजवर लादलेलें हें ओझें सांगितल्याठिकाणीं त्यानें नेल्यावर आणि धन्यानें त्याला हांकून दिल्यावर, मग त्यानें आपले कान हालवित खुशाल मैदानावर चरत फिरावें, इतकीच गोष्ट.

**ऑक्टेव्हियस**—तुह्मांला वाटेल तसें तुह्मी करा; त्यांत मला कांहीं विचारूं नका ! तथापी तो एक कसलेला व शूर असा शिपाईगडी आहे, हें लक्षांत असूं द्या.

**ॲन्टनी**—अरे ऑक्टेव्हियस, माझा घोडाही तसाच आहे बरें ! आणि ह्मणूनच त्याला मी दाणापाणी यथास्थित देत असतों. अरे, मी त्या जनावराला लढायला, उजवीकडे किंवा डावीकडे वळायला, चट्कन थांबायला किंवा भरधांव दौड करायला शिकवलें आहे. आणि माझ्या मर्जीप्रमाणें त्याच्या शरीराचें चलनवलन मीं आपल्या स्वाधीन ठेविलें आहे. आणि कांहीं अंशीं

लेपिडस तरी असाच आहे, नव्हेका ? त्याला शिकविलें पाहिजे, तयार केलें पाहिजे, कोणतीही गोष्ट अशी अशी कर ह्मणून त्याला पढविलें पाहिजे. स्वतः त्याला कांहींएक समजायचें नाहीं. असला हा मठ्ठ डोक्याचा मनुष्य ! इतर लोकांनीं शुष्क, शिळ्या, निरुपयोगी ह्मणून सोडून दिलेल्या गोष्टींवर स्वारींनीं हात मारावयाचा, हीच याची तऱ्हा. हें आपलें एक केवळ बाहुलें आहे समज. असो; आतां आपण विशेष महत्वाच्या गोष्टीकडे लक्ष देऊंया. ब्रूटस व केशियस आपापलेपरी सैन्यें जमवित आहेत; तर त्यांच्या प्रतीकाराची आपणही कांहीं तजविज पाहिली पाहिजे. ह्मणून मी ह्मणतों कीं आपल्या सर्व मंडळीचा आपण एकदिल करूं; आपले खरे खरे मित्र कोण आहेत हें प्रथम पाहूं; तसेंच शत्रूंचा प्रतीकार कसा करतां येईल हेंही पाहूं. या कामांत आपणापाशीं काय काय सामुग्री आहे आणि तीं आणखी कसकशी कोणत्या प्रकारें वाढवितां येईल, हाही विचार पाहूं. यासाठीं आपण सर्वांना एके ठिकाणीं जमवूं व त्यांशीं खलबत करून हा गुप्त कपटकट कसा उघडकीस आणतां येईल, व त्याला मर्दुमकीनें कसें तोंड देतां येईल, हें आपण ठरवूं.

**ऑक्टेव्हियस**—हें कांहीं वाईट नाहीं. असें करावें,

हेंच बरें. आपण पुढाकार घेतला हें सर्वांना ठाऊक झालें आहे. आणि ह्मणूनच पुष्कळ शत्रु आपणाला टपले असतील, यांत शंका नाही. यांत कित्येकजण तर असे आढळतील कीं बाहेरून पाहिलें तर त्यांचें हास्यमुख; तथापि त्यांच्या पोटांत किती कपटविष भरलें असेल, त्याचा पार लागावयाचा नाहीं. यासाठीं फार सावधगिरीनें वागलें पाहिजे.

( जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—सार्डिस गांवानजिक ब्रूटस याच्या लष्कराची छावणी.
(ब्रूटस याच्या तंबूपुढें नगारा वाजत असतां ब्रूटस, ल्युसिलियस, टिटिनियस व त्यांच्या मागें लष्करी शिपाई असे हे सर्व प्रवेश करितात. समोरून येऊन पिंडरस त्यांस भेटतो, व त्याच्या मागोमाग कांहीं थोड्या अंतरावर ल्युशियस येतो. )

**ब्रूटस**—हो ! खडे रहो !

**ल्युसिलियस**—हो! ह्मणून आरोळी दे, आणि खडे रहो !

**ब्रूटस**—( ल्युसिलियस यास उद्देशून ) कायरे, केशियस जवळपासच आहे काय ?

**ल्युसिलियस**—तो जवळपासच आहे महराज! आणि पिंडॅरस हा आपलें क्षेम चिंतून, आपल्या धन्याकडून भेटीला आला आहे.

**ब्रूटस**—माझें क्षेम तर तो उत्तमच चिंतित असेल, यांत शंका नाहीं. पिंडॅरस, तुझ्या धन्यानें अलिकडे अगदींच ताळ सोडला, असें दिसतें. नाहींतर, त्याच्या हाताखालच्या सैनिकांनीं जीं भलभलतीं कृत्यें केलीं तीं एरवीं कशीं घडलीं असतीं? मला खचित वाटतें अशीं कृत्यें मुळीं घडलीं नसतीं, तर फार बरें होतें. पण तो जवळपास असेल व त्याची व माझी समक्ष भेट होईल तर सर्व गोष्टींचा खुलासा होऊन माझें समाधान होईल.

**पिंडॅरस**—महाराज! माझा धनी खरोखरीच तुमच्या आदरास पात्र आहे, आणि तसाच तो तुह्मांलाही वाटेल, असा मला भरंवसा आहे.

**ब्रूटस**—त्याविषयीं मला मुळींच संशय नाहीं. पण कायरे ल्युसिलियस, तुला एक गोष्ट विचारावयाची अगदींच विसरलों. तूं जेव्हां त्याजकडे गेलास, तेव्हां त्यानें तुझा कसाकाय मान राखला, हें सांगपाहूं? ह्मणजे माझी थोडी बहुत तरी शंका फिटेल.

**ल्युसिलियस**—एकंदरीनें बरा राखला. त्याचें बोलणें

चालणें पाहिलें तें अगदीं विनयाचें व आदराचेंच दिसलें; तरीपण पूर्वी जसा तो सलगीनें, मोकळ्या मनानें व मित्रत्वाच्या नात्यानें वागत असे, तसा वागला, असें कांहीं ह्मणतां येणार नाहीं.

**ब्रूटस**—हें पहा ल्युशिलियस, तूं जें हें मित्रत्वाचें वर्णन केलेंस,त्यावरून तर तें मित्रत्व आरंभीं अत्यंत दृढ असावें, व पुढें तें विटून कमी कमी होत जावें, अशा प्रकारचेंच ह्मटलें पाहिजे. खचित, तुझा हा मित्र अशा प्रकारचाच दिसतो. अरे बाबा, आपण हें नेहमीं लक्षांत ठेवलें पाहिजे कीं मित्रत्व किंवा प्रेम जेव्हां प्रथम विटूं लागतें, व कमी कमी होत जातें, तेव्हां तें जुलुमाच्या कृत्रिम शिष्टाचारांची योजना करूं लागतें. सरळ साध्या वर्तनांत छक्केपंजे हवेत कशाला ? घोड्याला जेव्हां हातीं धरून न्यावा, तेव्हां तो आधीं डौलानें आपली हुषारी दाखवितो. पण टांचा मारून घेण्याची पाळी आली ह्मणजे एखाद्या फसव्या तट्टाप्रमाणें निरुपयोगीं ठरतो. हीच गोष्ट कुटिल मनुष्याची समजावी. त्याचें सैन्य इकडेसच येत आहे काय ?

**ल्यूसिलियस**—होय महाराज, आजच रात्रीं सार्डिस येथें त्याचा तळ पडायचा आहे. पण त्यापैकीं बराच भाग ह्मणजे घोडेस्वार मात्र केशियस याजबरोबर पुढें आले आहेत.

**ब्रूटस**—ऐका ! हे पाहा, तेच आले.

( पडद्यांत धोड्यांच्या टापा वाजतात )

तर चला; आपणच हलके हलके त्याला भेटावयास जाऊं.

( केशियस सैन्यासहित प्रवेश करितो. )

**केशियस**—हो ! खडे रहो !

**ब्रूटस**—हो ! खडे रहो ! असें सर्वांना सांग.

**पहिला शिपाई**—खडे रो: !

**दुसरा शिपाई**—खडे रो: !

**तिसरा शिपाई**—खडे रो: !

**केशियस**—हे महाश्रेष्ठ बंधो ! तुह्मीं माझें केवढें अकल्याण केलें ! कदाचित् त्याची तुम्हाला कल्पनाही नसेल.

**ब्रूटस**—हे आकाशस्थ देवांनो ! मी आपल्या शत्रूंचें तरी कधीं अकल्याण केलें आहे काय ? याची तुह्मींच साक्ष द्या. आणि हें जर खरें आहे तर मी प्रत्यक्ष आपल्या भावाचें अकल्याण केलें, असें कसें होईल ?

**केशियस**—हे बंधो ! हें पाहा, तुमची ही शांतवृत्ति आह्मांला अपकार करून, सवरून त्यांजवर भलेपणाचें पांघरूण घालते. आणि तुमच्या हातून जेव्हां आह्मांला अपकारकारक असें कृत्य घडतें तेव्हां—

**ब्रूटस**—अरे केशियस ! शांत हो; अंमळ शांत हो. तुझ्या दुःखासंबंधानें जें कांहीं बोलायचें असेल तें जरा स्वस्थ चित्तानें बोल. तुझा स्वभाव मी चांगला ओळखतों. येथें तुझें सैन्य आहे, आणि माझेंही आहे. त्यांतील लोकांना आपलें परस्परांवर प्रेम आहे, असेंच दाखविलें पाहिजे. तेव्हां त्यांच्या समोर तरी विनाकारण भांडणतंट्याचा प्रसंग आणूं नको. आधीं त्यांना येथून निघून जाण्याचा हुकूम कर, आणि मग आपण दोघेही माझ्या तंबूंत जाऊं. मग तुला अपकारकारक अशी गोष्ट मी कोणती केली, व तुला काय काय दुःख दिलें, तें मला सविस्तर सांग. मी तें सर्व ऐकून घेईन.

**केशियस**—अरे पिंडॅरस जा; आणि आपल्या सर्व सरदार मंडळीला माझा हुकूम सांग कीं सर्वांनीं आपापलीं सैन्यें घेऊन येथून कांहीं अंतरावर जाऊन तळ द्यावा.

**ब्रूटस**—अरे ल्यूशियस, तूंही जाऊन आपल्या सरदारांना असाच हुकूम सांग, आणि येथें आमचें खलबत चालू आहे, तें संपलें नाहीं तोंवर कोणालाही इकडे सोडूं नको. ( ल्यूसिलियस व टिटिनियस यांजकडे पाहून ) तुम्हीं दरवाज्यावर राहून पहारा करा.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ—ब्रूटसचा तंबू

( ब्रूटस व केशियस प्रवेश करितात. )

**केशियस**—ल्यूशियस पेल्ला यानें सार्डिस गांवच्या लोकांपासून लांच घेतला, याबद्दल तुह्मीं त्याला गुन्हेगार ठरवून, प्रसिद्धपणें त्याची छिः थू केली; यांत तुह्मीं माझीच निर्भत्सना केली, असें झालें नाहीं काय ? तेव्हां तुह्मीं हेंच माझें मोठें नुकसान केलें, असें माझें ह्मणणें आहे. तो मनुष्य माझ्या ओळखीचा होता, ह्मणूनच मी त्याला तुमच्यावर पत्रें दिलीं, पण तीं तुह्मीं कचरा ह्मणून फेंकून दिलीं, हीच तुह्मीं माझी आणखी अवहेलना केली.

**ब्रूटस**—अशा कामांत तूं मला लिहिलेंस हीच मुळीं चूक केलीस, नाहीं का ? खरें ह्मटलें तर तूं आपलें नुकसान आपल्या हातानें करून घेतलेंस.

**केशियस**—पण अशा या समयाला लहानमोठ्या प्रत्येक गुन्ह्यावर टीका करित बसणें, हें चांगलें काय ?

**ब्रूटस**—हें पाहा, मी तुला अगदीं स्पष्ट सांगतों कीं ज्याअर्थी तूं लांच खाण्याची हांव धरलीस, आणि ज्या अर्थी सोनें घेऊन मोठमोठ्या हुद्याच्या जागा अयोग्य माणसांना

तूं विकल्यास, व अशाप्रकारें त्यांची देवघेव केलीस, त्या अर्थी तुझ्या स्वतःवरच मुळीं हा मोठा गुन्हा शाबीत होत आहे.

**केशियस**—काय, लांच खाण्याची हांव! असें बोलणारा इसम कोण? ब्रूटस! ब्रूटसच असें ह्मणतात काय? हें मला ठाऊक आहे, नाहीं तर, देवाशपथ, हें तुमचें शेवटचेंच बोलणें झालें असतें.

**ब्रूटस**—शिव! शिव! असल्या या घाणेरड्या व्यवहाराशीं तुझ्या नांवाचा संबंध असल्या मुळेंच त्याला मोठेपणा आला आहे. नाहीं तर याचें तेव्हांच पारिपत्य झालें असतें. परंतु सध्यां तें भयानें आपलें मस्तक लपवून बसलें आहे.

**केशियस**—माझें पारपत्य? तें कोण करणार?

**ब्रूटस**—मार्च महिन्यांतील इडीजची आठवण असूंदे. येवढा मोठा सीझर, पण त्याचा रक्तपात कां झाला? त्याला ठार करून न्याय कसा असतो, हें जगांच्या प्रत्यंतरास कोणी आणलें? ज्यांनीं ज्यांनीं त्याला ठार केलें व हा रक्तपात केला, त्यांनीं त्यांनीं तें कृत्य, केवळ न्यायाचा विजय व्हावा, अशा बुद्धिनेंच केलें नाहीं काय? ज्याची अशी बुद्धी नव्हती असा हरामखोर त्यांच्यांत कोणी होता काय?

सर्व जगांत जो श्रेष्ठ व अग्रणी ह्मणून गाजत होता, त्याला ज्यांनीं ठार केलें, त्यांनीं तें कृत्य कां केलें बरें ? न्यायाचा विजय व्हावा यावांचून दुसरें काय होतें ? हें जर खरें आहे, तर त्याला ठार करणारांपैकींच एकानें लांच घेऊन चोरांना आधार द्यावा, व त्यांजकडून घेतलेल्या पैशानें आपले हात मळिण करावे, फार काय सांगावें ?— आपल्या ताब्यांतील मोठमोठ्या हुद्याच्या व जबाबदारीच्या जागा कचरेवजा हलक्या सलक्या इसमानां द्याव्या, हें चांगलें काय ? थोर रोमन कुळांत जन्म घेऊन असल्या दुराचाराला प्रवृत्त व्हावें, आणि निंद्य कर्में करावीं, त्यापेक्षां कुत्र्याच्या जन्मास येऊन चंद्रावर भुंकत राहणें देखील मला एकेपरी बरें वाटतें.

**केशियस**—संभाळा ! असे भुंकुं नका. मला नाहीं तें सहन होणार. माझ्या सत्तेला तुम्ही एवढा आळा घालित आहां खरे; पण आपण कोण, आपलें सामर्थ्य किती, आणि आपण करतों काय, याचें तुम्हांला बिलकूल भान नाहीं. लक्षांत ठेवा–मी एक शिपाईगडी आहें. या कामांत तुमच्याहून मलाच जास्त अनुभव आहे. अर्थात तुमच्याहून मीच वरचढ आहें. तेव्हां मी काय करावें, कसें वागावें हा उपदेश तुम्हीं मला करूं नका; मी तो खचित ऐकणार नाहीं.

**ब्रूटस**—अरे चल, निघ; येथून चालता हो ! तूं तो केशियस नव्हेस.

**केशियस**—अलबत्, मी तोच आहें.

**ब्रूटस** नाहीं नाहीं. तूं केशियस नाहींस, हेंच खरें.

**केशियस**—मला आतां अधिक संताप आणूं नका. मग मला भान राहाणार नाहीं. कदाचित् तुमच्या जिवावर देखील बेतेल. यासाठीं आपल्या सुरक्षितपणाचा विचार पाहा. मला अधिक त्रासवूं नका.

**ब्रूटस**—अरे जा; चालता हो ! तुजसारख्या दुर्बळानीं काय व्हायचें आहे ? तुला असा घालवून देईन.

**केशियस**—हें शक्य आहे काय ?

**ब्रूटस**—मी काय ह्मणतों, आधीं माझें ऐक. अरे, मी तुझ्या या रागाला भीक घालीन, असें तुला वाटतें काय ? एखादा वेडा जर माझ्याकडे डोळे फाडून पाहूं लागला, तर मी घाबरून जाईन,असें तुला वाटतें काय ?

**केशियस**—हें आकाशस्थ देवांनो ! हें सर्व निमूटपणें सहन करावें काय ?

**ब्रूटस**—एवढ्यानेंच काय झालें आहे ? याहुनही अधीक सहन करण्याची पाळी येईल, तिला तयार हो. तुझ्या गर्विष्ठ अंतःकरणाची अशीच ओढाताण चालूं दे. ती

चालतां चालतां जेव्हां त्या अंतःकरणाचे तुकडे तुकडे होतील, तेव्हांच तुला चैन पडेल. तूं फार रागीट आहेस; तेव्हां तो तुझा राग आपल्या गुलामांना जाऊन दाखीव, आणि आपल्या बंद्या नोकरांना चळचळां कांपावयास लाव. मी कधीं तुला जुमानणार नाहीं, किंवा तुझ्या चिडखोर स्वभावाची पर्वा करणार नाहीं. मग तुजपुढें उभा राहून तुला मान वांकवीन ही गोष्ट कशाला ? देवा शपथ तुला जर राग आला तर तो तुझा तुलाच गट्ट करून टाकावा लागेल. मी कांहीं तुझें समाधान करावयास येणार नाहीं, किंवा रागानें तुझें मस्तक फोडलें, तरी किकडे मी पाहणार नाहीं. ठीक आहे. आजपासून मी तुझ्या रागाची आपली एक मौज करीन, इतकेंच नव्हे तर तूं चिडलास म्हणजे मी हसेन.

**केशियस**—शेवटीं इतक्यावर आलेंना ?

**ब्रूटस**—तूं म्हणतोस कीं तुझ्यापेक्षां मी उत्तम शिपाई आहें, तर मग तसें दिसूं दे. आपली बढाई खरी करून दाखीव, म्हणजे मी होय म्हणेन. माझ्याविषयीं म्हणशील तर बोवा तुजसारख्या श्रेष्ठ लोकांची ओळख झाली, एवढ्यानेंच मी आपल्याला कृतार्थ मानीन.

**केशियस**—छे ! बोवा ! किती तरी तऱ्हांनीं तुम्हीं मला खिजवितां हे ? अहो, तुम्हीं मला विनाकारण असे संता-

पवितां काय ह्मणून ? मी स्वतःला ' अनुभवी शिपाई ' असें ह्मटलें; पण "श्रेष्ठ" असें ह्मटलें नाहीं." सर्वोत्कृष्ट " असे शब्द माझ्या तोंडातून तरी आले काय ?

**ब्रूटस**—ह्मटलें असलेंस तरी मला कुठें त्याची पर्वा आहे?

**केशियस**—सीझर जिवंत होता, तेव्हां त्याची देखील अशा रीतीनें मला चिडविण्याची छाती झाली नाहीं.

**ब्रूटस**—हो हो, पण त्याची अशी परीक्षा पाहाण्याची तुझीही छाती झाली नाहीं.

**केशियस**—काय? माझी छाती झाली नसती ?

**ब्रूटस**—नसती.

**केशियस**—काय ? त्याचें सत्व पाहाण्याची मला छाती झाली नसती ?

**ब्रूटस**—अरे, तुला तुझा जीव प्रिय. तुझी काय छाती होती?

**केशियस**—हें पाहा, माझ्या प्रेमावर विसंबून तुह्मीं असें भलभलतें बोलूं नका. नाहींतर माझ्या हातून भलतें सलतें होईल, आणि मागाहून विनाकारण वाईट वाटण्याची मला पाळी येईल.

**ब्रूटस**—तुला वाईट वाटेल असें तूं अगोदरच करून चुकला आहेस; आणखी नवीन तें काय करायचें ? माझें मन माझ्या प्रमाणिकपणाची मला साक्ष देत आहे व

अशा प्रामाणिकपणाच्या शस्त्रानें मी एवढा सज्ज झालों आहें कीं तुझ्या या धमकावणीची मला बिलकूल पर्वा नाहीं. हें तर काय, पण अंगावरून वाऱ्याची झुळूक जावी, तितपतच तिची किंमत मी लेखितों. अरे बाबा, निंद्य मार्गांनीं पैसे गोळा करणें मला आवडत नसल्यामुळें, तुजपाशीं मी कांहीं रकमांची मागणी केली, पण तूं तिचा अव्हेर केलास. तेव्हां मी केवढ्या संकटांत पडलों हें तुला सांगितलें, तरी कळायचें नाहीं. तथापि अशा संकटांतही कष्टाळू शेतकऱ्यांपासून कुमार्गानें पैसे काढण्याची बुद्धि मी धरली नाहीं. तुला खचित सांगून ठेवतों, प्रसंगच तर. मी आपल्या काळिजाचें नाणें पाडीन, व रक्त आटवून त्याचे पैसे तयार करीन, परंतु बिचाऱ्या शेतकऱ्यांस पिळून काढणार नाहीं. मग मजपाशीं पैसे कां मागितलेस असें तूं ह्मणशील, तर अलबत मागितले. सैन्यांतील शिपायांचा पगार द्यावयाचा होता ह्मणून मागितले. ते तूं दिलेस काय ? एकदम नाहीं ह्मणून साफ सांगितलेंस. असें उत्तर देणें तुला शोभलें काय ? मी तुला असें उत्तर दिलें असतें काय ? आपल्या मित्रांना न कळूं देतां, क्षुद्र धातूचे तुकडे स्वतःपाशीं गुप्तपणें सांठवून ठेवण्या इतका लोभी हा ब्रूटस झाला आहे, असें तूं ह्मणतोस हें खरें काय ? खरें असलें तर

हे आकाशस्थ देवतांनो, तुह्मी आपलीं प्रलयास्त्रें सज्ज करा, आणि माझे तुकडे तुकडे करून टाका !

**केशियस**—पण मी तुह्मांला केव्हां नाहीं ह्मटलें ?

**ब्रूटस**—काय ? तूं नाहीं ह्मटलेंस नाहीं काय ?

**केशियस**—मी नाहीं तसें ह्मटलें. माझ्याकडून असें उत्तर मिळाल्याचें ज्यानें सांगितलें, तो खचित लबाड असला पाहिजे. हाय हाय ! ब्रूटसनें माझें काळीज फाडून टाकिलें. खरें ह्मटलें तर थोर माणसांनीं आपल्या मित्राचे दोष पोटांत घातले पाहिजेत. पण आमचे ब्रूटस महाराज तर त्यांत आणखी भरच घालतात.

**ब्रूटस**—तूं जेव्हां अपराध करशील व तेणेंकरून माझें नुकसान होण्याची पाळी येईल, तेव्हां मात्र मी तसें करीन; एरवीं कधीं करणार नाहीं.

**केशियस**—एकून तुमचें माझ्यावर प्रेम नाहीं हीच गोष्ट खरी.

**ब्रूटस**—तुझ्या दोषांवर माझें प्रेम नाहीं हें मात्र अगदीं खरें.

**केशियस**—मित्राच्या दृष्टीला असे दोष कधींही दिसावयाचे नाहींत.

**ब्रूटस**—अत्युच्च ऑलिंपस पर्वताएवढे जरी ते दोष विशाळ असले, तरी असल्या तोंडपुजा मित्राला ते कशाला दिसताहेत ?

**केशियस**—( रडकुंडीस आल्यासारखें करून ) बरें बरें ! फार बरें ! ॲन्टनीनें व तरुण ऑक्टेव्हियस यानें येऊन केशियसचा खुशाल सूड घ्यावा ! या जगाला मी अगदीं कंटाळलों आहें! ज्यानें त्याच्यावर प्रेम करावें तोच त्याचा द्वेष करायला सिद्ध झाला; आतां काय उरलें ? भावानेंच त्याचा तिरस्कार करावा, एखाद्या गुलामाप्रमाणें त्याला धाकांत ठेवावें, त्याचे दोष डोळ्यांत तेल घालून शोधित बसावे, सांपडतांच स्मरणार्थ टिपून ठेवावे, त्यांचें वारंवार मनन करावें, वेळेवर टोमणे मारायला उपयोगीं पडावे ह्मणून पाठ करून ठेवावे, आणि एवढा खटाटोप करून माझी यथेच्छ निर्भत्सना करावी, यापुढें आणखी काय राहिलें ? फार काय सांगूं ?—रडून रडून अश्रूंच्या रूपानें मला माझे प्राण बाहेर काढून टाकतां येते, तर फार बरें होतें. ही घ्या कट्यार. रत्नांच्या खाणीहून अतिश्रेष्ठ आणि सुवर्णाहूनही अति मौल्यवान असें माझें हृदय जेथें धडधडत आहे, ती ही माझी छाती तुह्मांपुढें उघडी आहे !—मीच तुह्माला सुवर्ण देण्याचें नाकारलें ह्मणून तुह्मीं ह्मणताना ?—तर मीच हिच्यांत कट्यार खूपसून तेथलें काळीज तुह्मांला काढून देतों. आतां कांहीं ह्मणणें आहे ? आपण खरे रोमन नसलां तर घेणार नाहीं. सीझरला मारिलें तसा मलाही मारून टाका. कारण तुम्ही जरी त्याचा

दीर्घ द्वेष केला असला, तरी त्याजवर जेवढें तुमचें प्रेम होतें, त्याचा एक शतांशही ह्या तुमच्या केशियसवर नाहीं, हें मी जाणून आहें.

**ब्रूटस**—पुरे रे ! तुझी ती कट्यार म्यानांत घालून ठेव, जा. तुला हवें तेव्हां तूं खुशाल रागाव. त्याच्या आड आह्मीं येत नाहीं. तुला हवें तें तूं कर; जा. तूं माझा कोण-ताही अपमान केलास, तरी ती तुझी तेवढ्या वेळापुरती एक लहर आहे, असेंच मी समजेन. खरेंच रे बाबा ! माझ्यासारख्या एका गरिबशा बैलाशीं तुझी जोड झाली आहे. केशियस, जिच्या अंगभूत विस्तव आहे, व घर्ष-णानें जिच्यामधून ठिणगी पडते, तरी जी आपली गारच्या गारच अशा एखाद्या गारगोटीप्रमाणें मी आहें.

**केशियस**—दुःखावेगानें व संतापानें अतीशय त्रस्त झालेल्या माझ्या ब्रूटस बंधूला भेटून, त्याचें सांतवन करायला केशियस जिवंत आहेना ? मग काय चिंता आहे ?

**ब्रूटस**—अरे, मी त्रासून गेलों आहें. माझें भान ठिकाणा-वर नाहीं. चित्त संतप्त झालें आहे, असें जेव्हां मी ह्मणालों, तेव्हांच तूं जिवंत होऊन पुढें आलासना ?

**केशियस**—येवढें तुह्मीं कबूल करतांना ? तर मग तुमचा हात पुढें करा पाहूं !

**ब्रूटस**—अरे हातसा काय, पण माझें अंतःकरण देखील देण्यास मी पुढें करतों.

**केशियस**—( गहिंवरून ) हे ब्रूटस बंधो !

**ब्रूटस**—अरे काय झालें ? झालें तरी काय ?

**केशियस**—माझ्या आईप्रमाणेंच मी हूड असल्यामुळें केलें काय, आणि आहे काय, याचा मला तेव्हांच विसर पडतो. तेव्हां हा माझा दोष पोटांत घालून क्षमा करण्या इतकें तुमचें मजवर प्रेम नाहीं काय ?

**ब्रूटस**—केशियस, प्रेम नाहीं असें कां ह्मणतोस ? आतां यापुढें जेव्हां जेव्हां ह्मणून तुझ्या ब्रूटसवर तूं रागावशील, तेव्हां तेव्हां तुझी आईच रागावली, असें समजून, तें तो मनास आणणार नाहीं, ह्मणजे झालें.

( पडद्यांत )

**कवि**—मला आंत सोडारे! अडवून धरूं नका. मला सेनापतीची भेट घ्यावयाची आहे. त्यांच्यांत कांहीं तरी कटकट निघाली आहे, तसें होणें इष्ट नाहीं.

**ल्यूसिलियस**—( पडद्यांत ) आह्मीं तुला त्यांच्याकडे जाऊं देणार नाहीं.

**कवि**—तुह्मीं प्राण घेतला तरी बेहेत्तर ! मी आंत जाईन; सोडणार नाहीं. मेलों तर मात्र मला त्यांच्याकडे जातां येणार नाहीं, तर न येवो !

( कवि आणि त्याच्या मागून ल्यूसिलियस,
टिटिनियस, व ल्यूशियस
प्रवेश करितात. )

**केशियस**—हो हो ! अरे आहे तरी काय ?

**कवि**—अहो सेनापतींनो ! कांहीं तरी लाजलज्जा ! अरे तुह्मीं हें मांडलें आहे तरी काय ? तुमच्याहून मी बरींच वर्षें जगांत काढलीं आहेत, ह्मणून मला अनुभव जास्त आहे. तेव्हां मी ह्मणतों कीं तुमच्यासारख्यांनीं एकमेकांवर प्रेम करावें आणि मित्रत्वानें वागावें.

**केशियस**—अहाहाहा ! हा मनुष्य कसें कपटानें बोलत आहे ?

**ब्रूटस**—अरे ए गृहस्था ! एथून चालता हो ! ए निर्लज्जा, चल; निघ येथून !

**केशियस**—त्याला अशी संवयच लागली आहे. पण त्याचें ह्मणणें ऐकून तर घेऊं या.

**ब्रूटस**—त्याचें ह्मणणें ऐकायला माझी ना नाहीं. पण त्याला कांहीं काळवेळ तरी समजतो का ? अरे, अशा युद्धाच्या ऐनवेळीं गुणगुण करणाऱ्या ह्या मूर्खांचें रे काय काम आहे ? तर बाबां आलास तसा आपला जा कसा.

**केशियस**—जा जा; आधीं चालता हो ! ( कवि जातो. )

**ब्रूटस**—बरी पीडा गेली. बरें, अरे ल्युसिलियस, ए टिटिनियस तुह्मीं जा. आज आपल्या सैन्याचा मुक्काम येथेंच व्हावयाचा आहे, तरी तशी सेनानायकांना तजविज ठेवा ह्मणून हुकूम सांगा.

**केशियस**—तुह्मीं सर्वजण या, व मेसेला यालाही बरोबर आमच्याकडे घेऊन या.

( ल्यूसिलियस व टिटिनिअस जातात. )

**ब्रूटस**—अरे ल्यूशियस, पेलाभरून आण पाहूं.

( ल्यूशियस जातो. )

**केशियस**—आपण एवढे रागावलां असाल, असें मला कांहीं वाटलें नव्हतें.

**ब्रूटस**—हे बंधो ! माझ्यामागें अनेक प्रकारचीं दुःखें लागलीं आहेत. व त्या पायीं मी अगदीं त्रस्त झालों आहें.

**केशियस**—अहो, असल्या आकस्मिक संकटांनीं जर तुह्मांला त्रास होऊं लागला, तर तुमच्या त्या तत्व ज्ञानाचा उपयोग काय ?

**ब्रूटस**—काय सांगूं रे ! कोणालाही इतकें दुःख सहन होणार नाहीं. अरे, पोर्शिया मेली !

**केशियस**—हाय ! पोर्शिये !

**ब्रूटस**—ती तर गेली !

**केशियस**—मी तुह्मांला इतकें त्रासविलें, तेव्हांच कां नाहीं बरें तुह्मीं मला ठार केलें ? काय हा असह्य घाला ! किती हृदयभेदक बातमी ही ! तिला असें दुखणें तरी कोणतें आलें ?

**ब्रूटस**—मी घरांत नाहीं तेव्हां ती घाबरली, आणखी काय ? आणि तरुण ऑक्टेव्हियस व मार्क ॲन्टनी, हे दोघेच कायते सगळ्या नगरांत प्रबळ झाले, ही बातमी ऐकूनच तिच्या काळजाला धक्का बसला. कारण ही बातमी तिचें प्राणोत्क्रमण होण्याचे आधीं नुकतीच तिला कळली असें सांगतात. या बातमीनें तिचें डोकें फिरून गेलें; मग जवळ दासी वगैरे कोणी नाहींत अशी संधी पाहून तिनें अग्निकाष्टें भक्षण केलीं.

**केशियस**—एकूण अशा रीतीनें तिचा अंत झाला ना ?

**ब्रूटस**—होय; अशाच प्रकारें.

**केशियस**—हे अमर देवतांनो !

( इतक्यांत दारूचा पेला व मेणबत्ती घेऊन ल्यूशियस पुन्हां प्रवेश करितो. )

**ब्रूटस**—तिजबद्दल आतां अधिक कांहीं बोलूं नको. मला एक पेला भरुन दे. अरे केशियस, हा पेला पिऊन त्याबरोबरच, मन निष्ठूर करुन, सर्वदुःख मी गट्ट करितों.

**कॅशियस**—हे बंधो ! तुजप्रमाणेंच माझ्या घशालाही कोरड पडली आहे. तुजबरोबर मीही पितों. तर अरे ल्यूशियस, माझ्यासाठीं देखील एक पेलाभर—अगदीं वाहून जाई तों कांठोकांठ भर.कारण जेवढी जास्त दारू प्यावी, तेवढें अधीक प्रेम व्यक्त होतें, असें जर आपण समजतों, तर यावेळीं तूं मला जेवढी दारू देशील, व जेवढी जास्त मी माझ्या बंधूचें प्रेम स्मरून गट्ट करीन, तेवढी थोडीच ह्मणून मी समजेन. ( पितो. )

**ब्रूटस**—अरे टिटिनियस ये आंत.

( ल्युशियस जातो )

( टिटिनियस व मेसाला पुन्हा प्रवेश करितात. )

ये; अरे मेसाला ये, आंत ये. आतां आपण अम्मळ या दिव्याशीं बसून, आपल्याला कोण कोणत्या गोष्टींची गरज आहे, व आपणाला अडचणी कोण कोणत्या आहेत, यांचा विचार करूं.

**केशियस**—पोर्शिये ! तूं आह्मांला टाकून गेलीस ना ?

**ब्रूटस**—हें पहा, कृपा करून त्या गोष्टीचा आतां व्यर्थ उच्चार नको. अरे मेसेला, मला अशीं पत्रें आलीं आहेत कीं तरुण ऑक्टेव्हियस व मार्क ॲन्टनी हे दोघे प्रचंड सैन्य घेऊन, फिलिप्पी नगराला वळसा घालून आपणावर चाल करून येत आहेत.

**मेसाला**—मला आलेलीं पत्रेंही याच अर्थाचीं आहेत.

**ब्रूटस**—याशिवाय त्यांमध्यें आणखीं कांहीं विशेष आहे काय ?

**मेसाला**—होय, त्यामध्यें आणखी असेंही आहे कीं सरासरी शंभर एक सभासदांना न्यायरक्षणबाह्य ठरवून, ऑक्टेव्हियस, ॲन्टनी व लेपिडस यांनीं त्यांचीं नांवें जाहिरनाम्यांत प्रसिद्ध करविलीं, आणि मागाहून एकेकाला हुडकून काढवून ठार केलें.

**ब्रूटस**—हा एवढा मजकूर तुला व मला आलेल्या पत्रांत जमत नाहीं. अशा प्रकारें सरासरी सत्तर एक प्रसिद्ध लोक आतांपर्यंतच मारले गेले. त्यांतच सिसरोही मारला गेला, असें मला आलेल्या पत्रांत वेगळें ह्मटलें आहे.

**केशियस**—काय ह्मणाला, सिसरोही मारला गेला ?

**मेसाला**—हो हो ! सिसरो मेला. आणि तोही इतरां प्रमाणेंच न्यायरक्षण बाह्य ठरूनच मारला गेला. महाराज, आपल्याला मिळालेलीं पत्रें आपल्या पत्नीकडूनच आलीं होतीं काय ?

**ब्रूटस**—नाहीं नाहीं !

**मेसाला**—आपणाला आलेल्या पत्रांत त्यांच्याविषयीं अधिकउणें कांहीं नव्हतें काय ?

**ब्रूटस**—छे, मेसाला कांहींएक नव्हतें.

**मेसाला**—याचें मला आश्चर्य वाटतें.

**ब्रूटस**—कां बरें ? तूं हें कां विचारतोस ? तुझ्या पत्रांत कांहीं आहे का ?

**मेसाला**—कांहीं नाहीं महाराज.

**ब्रूटस**—तूं रोमन आहेस, तेव्हां खरें असेल तेंच सांग.

**मेसाला**—तर मग मी जें कांहीं खरें खरे सांगणार आहें, तें आपणही रोमन गृहस्था प्रमाणेंच धैर्यानें ऐकून घ्या. त्या गेल्या हें खचित, पण त्यांचा अंत कांहीं विलक्षण रीतीनें झाला.

**ब्रूटस**—बरें आहे. पोर्शिये ! तुला सद्गती प्राप्त होवो ! अरे मेसाला, कधींना कधीं आपणा सर्वांनाही मरायाचेंच आहे. तसेंच तिलाहि मरायचें होतेंच—हें मनांत आणून मी तिच्या मृत्यूचें वर्तमान धैर्य करून निमुटपणें ऐकून घेतलें.

**मेसाला**—आपणासारख्या श्रेष्ठ मनुष्यांना संकटांस अशीच पाठ द्यावी लागते.

**केशियस**—ही गोष्ट तत्वतः तुझ्याप्रमाणेंच मीही जाणतों; पण प्रत्यक्ष सहन करण्याची पाळी आली, ह्मणजे ही तत्व-दृष्टी कांहीं उपयोगाला येत नाहीं.

**ब्रूटस**—जाऊं द्या. आतां पुढील उद्योगाला नेटानें लागलें पाहिजे. तुला कसें काय वाटतें ? फिलिप्पी नगरीकडे आतांच चाल करून जावें कीं कसें ?

**मेसाला**—मला तर तसें करणें योग्य वाटत नाहीं.

**ब्रूटस**—न वाटण्याचें काय कारण ?

**केशियस**—कारण असें आहे कीं शत्रूनें आपल्यावर चाल करून यावें हेंच बरें. त्यांत त्याच्या युद्धसामुग्रीची नासाडी होते, शिपाई थकून जातात, शिवाय आणखी कुरापत त्याच्याकडून निघाली असें होतें. आतां आपली स्थिति पाहिली तर आपणास तळावर बंदोबस्त करून राहतां येतें, व हवी तेवढी विश्रांती घ्यावयाला मिळते. तात्पर्य आपण ताजे तवाने असून, शत्रूंचा छापा येतांच, आपणास त्याचा सहज प्रतीकार करतां येतो.

**ब्रूटस**—योग्य कारणांचा तर विचार झालाच पाहिजे; पण त्यांतूनही अधिक महत्वाचीं कारणें कोणतीं हें अगोदर पाहिलें पाहिजे. मी ह्मणतों, फिलिप्पी आणि हें ठिकाण यांच्या दरम्यान ज्या लोकांची वस्ती आहे, त्यांची आपणाला ह्मणण्यासारखी अनुकूलता नाहीं. त्यांनीं आपणाला केली ती केवळ निरुपायास्तव मदत केली, असेंच नव्हे का ? तेव्हां शत्रु जर त्यांच्या आंगावरून चालून आला, तर त्याच्या सैन्यांत या लोकांतून पुष्क-

ळांची भर पडेल, यांत शंका नाहीं. याप्रमाणें पुष्ट होऊन मग तो आपणावर चालून येईल, तो मोठ्या उमेदीनेंच येईल. आणि सैन्यांत ही आयतीच भर पडल्यामुळें उत्तेजन येऊन कडेकोट तयारी निशी उभा राहिलेल्या शत्रूशीं तोंड देणें किती कठिण आहे हें सहज लक्षांत येईल. यासाठीं आपणच जर आधीं फिलिप्पीवर चाल करून जाऊन शत्रूला तोंड दिलें, तर ही सारी मिळणारी मदत आणि व्हावयाची त्याची ही सारी तयारी जागच्या जागींच राहील, नाहींकाय ?

**केशियस**--हे माझे श्रेष्ठ बंधो ! माझें ह्मणणें तर ऐकून घ्याल ?

**ब्रूटस**--मला क्षमा कर. मला आधीं माझें बोलणें पुरें बोलूं दे तरी. शिवाय, आपले मित्र कसे आहेत, आणि वेळेवर त्यांची कशी काय मदत मिळेल, हेंही आपणाला कळून चुकलें आहे. आपलें असायचें तेवढें सर्व सैन्य तयार आहे, व युद्धाचीही आपली तयारीच आहे. शत्रूचें सैन्य मात्र उत्तरोत्तर वाढत जाण्याचा संभव आहे, पण आपल्या तयारींत मात्र कमीपणा येत चालला आहे. माणसांच्या व्यवहारामध्यें नेहमी भरती-ओहोटी असते. कोणतीही गोष्ट भरतीच्या वेळीं केली तर यश येतें; पण तीच भरतीची वेळ घालविली तर त्यांच्या

जन्माची सफर फुकट गेल्यासारखें होतें. व शेवटीं त्यांस दुःख भोगावें लागतें. तर आपणही यावेळीं महासागरांतच तरंगत आहों असें ह्मटलें पाहिजे. तेव्हां आपणास अनुकूळता अशी भरती येतांच, आपण आपलें इष्टकार्य साधून घेतलें पाहिजे. असें करायचें नसलें, तर तुह्मीं आरंभिलेले साहस एकदम सोडून द्यावें हेंच उत्तम.

**केशियस**—असें आहे तर चला. आपणच सर्वजण फिलिप्पी मुक्कामावर जाऊन शत्रूंला गाठूं.

**ब्रूटस**—कायहो ! बोलतां बोलतां मध्यरात्र उलटून गेली. तेव्हां आतां आपणाला थोडीबहूत विश्रांती घेतली पाहिजे. आतां अधीक बोलण्यासारखें कांहीं उरलें नाहीं.

**केशियस**—कांहीं नाहीं ? ठीक आहे. तर प्रातःकाळीं आपण उठून येथून कूच करूं.

**ब्रूटस**—अरे ल्युशियस, ( ल्यूशियस प्रवेश करितो ) माझा झगा आण पाहूं. [ ल्यूशियस जातो ] [ मेसालायाजकडे पाहून ] ठीक आहे; आतां रामराम. [ टिटिनियस व केशियस यांस उद्देशून ] बरें आहे; आतां सकाळपर्यंत तुह्मांला पूर्ण विश्रांती सुख मिळो.

**केशियस**—हे प्रिय बांधवा ! आजच्या रात्रीचा आरंभ कांहीं चांगला झाला नव्हता. आपणा दोघांमध्यें असें

भांडण पुन्हा कधींही न होवो. नको, असा प्रसंग फिरून नको !

**ब्रूटस**––आहे तें सर्व ठीक आहे.

**केशियस**—नमस्कार, महाराज.

**ब्रूटस**—क्षेम असो, प्रियबंधो !

**टिटिनियस**
**मेसाला** } रामराम, ब्रूटस महाराज.

**ब्रूटस**—या बरें आतां सारेजण.

( ब्रूटस शिवाय सर्व जातात. )

( ल्यूशियस झगा घेऊन पुन्हां प्रवेश करितो. )

**ब्रूटस**—आण पाहूं तो माझा झगा. बरें, तुझें वाजवाव्याचें तें तुणतुणें कोठें आहे ?

**ल्युशियस**––येथें तंबूंतच आहे.

**ब्रूटस**––तूं झोंपेंत तर बरळत नाहींसना ? गरिब बापडा ! याचा दोष तुझ्याकडे नाहीं. फार जागल्यानें तूं त्रासून गेला असशील, नाहीं बरें ? जा, तिकडून एक दोघांना बोलावून आण, ह्मणजे त्यांना तंबूंतच निजायला सांगतों.

**ल्यूशियस**––ए व्हॅरो, अरे ए क्लॉडियस !

( दोघेही शिपाई प्रवेश करितात. )

**एक शिपाई**—महाराज, आपण मला हाक मारली काय?

**ब्रूटस**--हें पाहा महाराज तुह्मी माझ्याच तंबूत जाऊन, गाद्या टाकल्या आहेत, त्यांवरच पडून अम्मळ झोंप घ्या, अशी माझी विनंती आहे. कदाचित् थोड्या वेळानें केशियसकडे पाठविण्यासाठीं मी तुह्मांला जागें करीन.

**एक शिपाई**--ठीक आहे महाराज; आह्मीं उभे राहून पाहारा करित राहतों.

**ब्रूटस**--छे! तसें नको. तुह्मीं आपले जाऊन निजा. कदाचित् केशियस यांजकडे तुह्मांला पाठविण्याचें कारणच पडणार नाहीं. अरे ल्यूशियस, हें पाहिलेंस का? मी इतका वेळ शोधित होतों तें पुस्तक मी या झग्याच्याच खिशांतच ठेविलें आहे.

( ते दोघे शिपाई पडून राहतात. )

**ल्यूशियस**--खरें ना पण? माझी खात्री होती कीं महाराजांनीं तें माझ्याजवळ कांहीं दिलें नव्हतें.

**ब्रूटस**--जाऊं दे; मी आपला असाच विसराळू आहें. तुझे तर गड्या डोळे झोंपेनें पेंगले आहेत. तरीपण अम्मळ ते उघडे ठेवून, तुझ्या तुणतुण्यावर तूं एकदोन गाणीं ह्मणून दाखविशील का?

**ल्यूशियस**--मला वेड्यावांकड्या येतील, तशा महाराजांना आवडतील काय?

**ब्रूटस**—हो आवडतील. मी तुला फारच त्रास देत आहें; पण कितीही त्रास दिला, तरी तूं कांकूं करित नाहींस.

**ल्यूशियस**—अं: ! यांत काय आहे ? महाराज, हें तर माझें कर्तव्यच आहे.

**ब्रूटस**—कर्तव्य जरी असलें, तरीपण तुझ्या शक्तीबाहेर एखादी गोष्ट मी तुला करायला सांगितली, तर तें बरें नाहीं. कारण तरुण माणसांना विश्रांति अधिक लागते.

**ल्यूशियस**—महाराज, माझी झोंप झालेली आहे.

**ब्रूटस**—हें बरेंच ह्मणावयाचें. पण तूं आणखी नीज. मी काहीं तुला फार वेळ बसवून घेत नाहीं. मी जर जिवंत राहिलों तर मी तुझें कल्याण करीन.

( वाद्य बाजवून गाणें गाऊं लागतो. )

तुझ्या गाण्यावरून तर तुला झोंप आलीसें दिसतें. ही निद्रा तरी किती निष्ठुर ह्मणावी ! हा बिचारा गाणें गाऊन मला करमणूक करित असतां, ही पाहावी तों शिशाच्या आपल्या गदेनें कींहो याच्या डोक्यावर ठोके मारित आहे. ह्याच्या या डुलक्या पाहा ! अरे ए शहाण्या ! आतां पुरे कर. तुझी आणखी झोंपमोड करून तुला मी त्रास देत नाहीं. तुझ्या डुकल्याखालीं तुझें तें तुणतुणें मात्र मोडून जाईल एखादें. तें दे इकडे मजपाशीं पाहूं. बरें आतां पुरे. निज जा आतां. पण हो हो ! तें गाण्याचें

पुस्तक मी जेथपर्यंत वाचलें, त्याच्यापुढचीं पानें उलटलीं आहेस कीं काय ? मला पाहूं दे. हं ! येथपर्यंत माझें वाचून झालें होतेंसें मला वाटतें.

( सीझरचें पिशाच्च प्रवेश करितें )

कसली बोवाही मेणबत्ती ? जळत सुद्धां नाहीं. अरे पण येथें हें कोण आलें ? मला वाटतें माझ्या दृष्टीच्या कमी-पणा मुळेंच ही छाया येथें मला दिसत आहे. अरे ही तर जवळ जवळच येत चालली. हिला पाहून माझें शरिर थंड पडलें, व अंगावर रोमांच उभे राहिले. अरे बाबा, तूं देव आहेस, कीं गंधर्व आहेस, कीं पिशाच्च आहेस ? आहेस तरी कोण ?

**पिशाच्च**—ब्रूटस, तुझे ठिकाणीं असलेली दुष्टबुद्धि-

**ब्रूटस**—बरें तूं कां आलास ?

**पिशाच्च**—फिलिप्पी येथें तुझी माझी गांठ पडेल, हें तुला बजावण्यासाठीं.

**ब्रूटस**—बरें, तुझी माझी फिरून भेट होईल ?

**पिशाच्च**—हो, होईल फिलिप्पी येथें.

**ब्रूटस**—बरें आहे; मी तुझी फिलिप्पी येथें गांठ घेईन. ( पिशाच्च जातें ) तें गेलें तेव्हां आतां माझ्या जिवांत जिव आला. दुष्ट पिशाच्चा ! तुझ्याशीं आणखी दोन शब्द

बोलावेसे वाटतात. अरे ल्यूशियस, व्हॅरो, क्लॉडियस जागे व्हा. क्लॉडियस—

**ल्यूशियस**—महाराज त्या तारा कीं नाहीं बिघडल्या आहेत.

**ब्रूटस**—वाखा ! अजून आपण वाजवितच आहों, असेंच हा समजत आहे. ल्युशियस जागा हो.

**ल्यूशियस**—काय माहाराज ?

**ब्रूटस**—अरे, तुला कांहीं स्वप्न विघ्न पडलें कीं काय ? असा ओरडत कां होतास ?

**ल्यूशियस**—महाराज, ओरडल्याचें मला कांहीं आठवत नाहीं.

**ब्रूटस**—अरे होय तर, तूं ओरडलास; तुला कांहीं दिसलें कीं काय ?

**ल्यूशियस**—छे महाराज, कांहीं एक दिसलें नाहीं.

**ब्रूटस**—ल्यूशियस जा; तूं आपला जाऊन नीज जा. ( इतर शिपायांस हाक मारून ) कायरे, तुह्मी कोणी जागे आहां काय ?

**एक शिपाई**—माहाराज काय ?

**दुसरा शिपाई**—काय माहाराज ?

**ब्रूटस**—अरे झोपेंत तुह्मीं असे ओरडलां कां ?

**एक शिपाई**—काय, आम्ही ओरडलों ?

**ब्रूटस**—तुह्मीं कांहीं पाहिलें होय ?

**एक शिपाई**—छेः महाराज, मला कांहीं एक दिसलें नाहीं.

**दुसरा शिपाई**—महाराज, मला सुद्धां कांहीं एक दिसलें नाहीं.

**ब्रूटस**—आमचे केशियस यांच्याकडे जा, आणि त्यांना ह्मणावें आपलें सैन्य तयार करून, उजाडलें नाहीं तोंच कूच करून निघून जा. आह्मीही तुमच्या मागोमागच आलों.

**दोघेही शिपाई**—जी सरकार.

( जातात. )



केशियस--हे पिंडॅरस, तूं ह्या टेंकडीच्या अगदीं वर जा, आणि समरभूमीवर तुला काय काय दिसतें, तें मला सांग.

ज्यूलियस सीझर—अंक ५ प्र. ३

The Bombay Art Printing Works, Fort.

# अंक ५ वा.

## प्रवेश १ला.

स्थळ—फिलिप्पी येथील मैदान.

( ऑक्टेव्हियस व ॲन्टनी आपापल्या सैन्यासहित प्रवेश करितात. )

**ऑक्टेव्हियस**—ॲन्टनी, आपल्याला जसें वाटलें होतें तसेंच आतां घडून आलें आहे. शत्रू इकडे न येतां, टेंकड्यांचा आणि वरच्या भागाचाच आश्रय करून राहतील, असें तूं ह्मणत होतास, पण शेवटीं तसें झालें नाहीं; त्याचें सैन्य अगदीं जवळ येऊन ठेपलें आहे. बहुधा युद्धाला तेच आरंभ करतील. त्यांना आव्हान करण्याची गरजच मुळीं पडणार नाहीं.

**अन्टनी**—छे; रे! त्यांचे सर्व अंतस्थ बेत मला चांगले माहित आहेत; आणि त्यांनीं असें कां केलें हेंही मी चांगलें जाणतों. तथापि दुसरे कोठें तरी अंतरावर सैन्य ठेवून तें सुरक्षित राहील अशी त्याची रचना सावधगिरीनें केली असती, व तेथून आपणावर झडप घालून आले असते, तर तें त्यांस फार सोईचें झालें असतें; पण हा त्यांचा बेत

फसला. याचप्रमाणें आपल्या आंगीं कांहीं विलक्षण शौर्य आहे असें दाखवून, आपणास थक्क करून सोडण्याचें त्यांच्या मनांतून होतें; पण हाही त्यांचा बेत फसला.

( एक जासूद प्रवेश करितो. )

**जासूद**—सेनापतींनो ! सावध असा बरें. शत्रू इकडे कोट तयारीनें येत असून त्याचें युद्धाचें निशाण फडकत आहे, त्यावरून इतक्यांतच कांहींतरी होईल असा सुमार दिसतो.

**अॅन्टनी**—अरे ऑक्टेव्हियस, सपाट मैदानावर डाव्या-बाजूनें हलकेहलके तूं आपलें सैन्य घेऊन चल.

**ऑक्टेव्हियस**—तसें नको. उजव्या बाजूनें मी आपलें सैन्य घेऊन जातों; तूं डावी बाजू संभाळ.

**अॅन्टनी**—अशा ऐन प्रसंगीं मी नको ह्मणत असतांना तूं तसें कां करतोस ?

**ऑक्टेव्हियस**—छे ! मी तुझी इच्छा मोडित नाहीं. मी असें करीन, हें मात्र खरें.

( सैन्यें चालूं लागतात. रणवाद्यें वाजूं लागतात. ब्रूटस व कॅशियस, त्यांच्या सैन्यासहित प्रवेश करितात, आणि त्याज बरोबरच ल्यूशियस, टिटिनियस व मेसाला हेही येतात. )

**ब्रूटस**--शत्रू येऊन उभा राहिला आहे, व आपल्याशीं कांहीं बोलण्याची त्याची इच्छा आहे.

**केशियस**-अरे टिटिनियस, नीट सावध राहा. आपण पुढें चाल करून जाऊं; व काय बोलायचें तें बोलूं.

**ऑक्टेव्हियस**—अरे ॲन्टनी, युद्ध सुरू करण्याची इशारत देऊं काय ?

**ॲन्टनी**--कशाला ? आपल्याला आधीं कांहींएक करायचें नाहीं. त्यांनाच अगोदर चाल करून येऊं दे. मग आपण सुरवात करूं. हं चला पुढें; त्यांच्या सेनापतीची बोलण्याची इच्छा दिसते.

**ऑक्टेव्हियस**—निशाण फडकवीपर्यंत कोणी हलूं नका.

**ब्रूटस**—हे देशबांधव हो ! आधीं शब्द, आणि मागाहून ठोसे, असेंच ना ?

**ऑक्टेव्हियस**—तुह्मांला शब्द प्रिय असतील, आह्मांला तर ठोसेच प्रिय आहेत.

**ब्रूटस**—कायरे ऑक्टेव्हियस, ठोशांहून शब्द बरे नव्हेत का ?

**ॲन्टनी**—अरे ब्रूटस, निर्दयपणें घाला घालतांना तूं चांगलें चांगलें बोलतोस, नव्हे का ? सीझरच्या हृदयावर घाव घालतांना सीझर दीर्घायुषी होवो, व त्याचें कल्याण असो, असेंच तूं ह्मटलें असशील. त्यावेळचें तुला कांहीं आठवतें का ?

**केशियस**—अरे ॲन्टनी, घाला घालण्याची तुझी तऱ्हा अद्याप कांहीं कळलेली नाहीं; पण तुझे शब्द मात्र असे आहेत कीं मधमाशांच्या पोळ्यांतला मध चोरून, तें नीरस करून टाकणाऱ्या गांधिल माशांप्रमाणें ते दुःसह होत.

**ॲन्टनी**—पण लक्षांत ठेव, त्यांची ही नांगी चांगली शाबूत आहे बरें.

**ब्रूटस**—अलबत त्यांची नांगीचशी काय, पण गुणगुणणें देखील असावें तसें चालू आहे. कारण मी ह्मणतों तूं त्यांचें गुणगुणणें देखील चोरलें आहेस; आणि दंश करण्यापूर्वी गुणगुणून तूं मोठ्या शहाणपणानें त्याची भीती दाखवित असतोस.

**ॲन्टनी**—आणि हे नीच दुष्टांनों ! तुह्मीं नाहीं असें केलें ? जेव्हां तुमच्या दुष्ट कट्यारी सीझरच्या उरांत जाऊन भिडल्या, तेव्हां माकडाप्रमाणें तुह्मीं आपले दांत बाहेर काढले, कुत्र्याप्रमाणें शेपटी हालवली, आणि गुलामाप्रमाणें माना वांकवून सीझरच्या पायाचें चुंबन केलें. असा प्रकार चालला असतांना, तिकडे कॅस्का यानें एखाद्या भितऱ्या कुतऱ्याप्रमाणें लपत छपत पाठीमागून जाऊन, सीझरच्या मानेवर अधमपणें घाय घातला. आहारे तोंडपुज्यांनो !

**कॅशियस**—काय ? आम्हीं तोंडपुजे ? अहो ब्रूटस माहाराज ! घ्या; ऐका आतां. कॅशियस याचें जर त्यावेळीं तुम्हीं ऐकलें असतें, तर या वळवळणाऱ्या जिभेनें आज खचित आपला असा अपमान केला नसता.

**ऑक्टेव्हियस**—जाऊंद्या. वाद कशाला ? आपल्या उद्योगाला लागूं या. आपण जरी कितीही असा शुष्क वाद घालित बसलों, तरी त्याचा शेवट रक्तपातावांचून होणें नाहीं. ही पाहा, मी आपली तलवार काढली. ती ह्या कटवाल्यांवर एकदां चालू झाली, ह्मणजे फिरून म्यानांत केव्हां जाऊन बसेल, आहे का ठाऊक ? छे ! सीझरला लागलेल्या तेहतीस जखमांचा सूड घेतल्या वांचून, किंवा या विश्वासघातक्यांच्या तलवारीला हा दुसरा सीझर बळी पडेपर्यंत कांहीं ती परत म्यानांत जाणार नाहीं.

**ब्रूटस**—अरे ऑक्टेव्हियस सीझर, जर विश्वासघातक्यांच्या हातूनच तुला मरण यावें असें ठरलें, तर असलीं माणसें तुझ्या बाजूच्या लोकांतच असतील; तीं आमच्यांत असणार नाहींत.

**ऑक्टेव्हियस**—माझी अशीच इच्छा आहे. मी कांहीं ब्रूटससारख्या विश्वासघातक्याच्या तलवारीनें मरण्याकरितां जन्माला आलों नाहीं.

**ब्रूटस**—अरे तुझ्या घराण्यांत जर तूंच स्वतःला थोर

ह्मणावित असशील, तर अशा मरणांतच तुला थोरपणा आहे, असें समज.

**केशियस**—अहो, या पोरांत काय अवसान आहे ? हा बोलून चालून नाटक्या ! असल्या मानाला मुळींच पात्र नाहीं.

**ॲन्टनी**—हा केशियस पूर्वी होता, तसाच अजूनही आहे.

**ऑक्टेव्हियस**—( ॲन्टनी यास उद्देशून. ) आपण जाऊं. अरे विश्वासघातक्यांनों, आह्मीं तुमची मुळींच पर्वा करित नाहीं. छाती असली तर समरांगणांवर या. नाहींतर जेव्हां होईल तेव्हां या.

( ऑक्टेव्हियस व ॲन्टनी सैन्यासहित निघून जातात. )

**केशियस**—आतां प्रचंड वारा सुटो, सागर खवळून जावो, वादळ उसळून जावो, सर्वच धाडस ! मग आमचें तारूं कां तरूं नये ?

**ब्रूटस**—अरे ल्युसिलियस, मी काय ह्मणतों तें ऐकून घे.

**ल्यूसिलियस**—( पुढें उभा राहून ) महाराज !

( ब्रूटस व ल्यूसिलियस एका बाजूला जाऊन बोलतात. )

**केशियस**—मेसाला !

**मेसाला**—काय ह्मणतां सेनापती ?

**केशियस**—मेसाला, आजचा माझा जन्मदिवस आहे. याच दिवशीं केशियस जन्माला आला. मेसाला तुझा हात

अम्मळ इकडे दे पाहूं. ही घे टाळी. मी काय म्हणतों तें ध्यानांत ठेव; आणि जरूर तेव्हां या गोष्टीची साक्ष दे. पॉम्पी माहाराजांवर जसा प्रसंग आला होता, तसाच आजचा प्रसंग आहे. आजच्या एका लढाईच्या निकालावर आपणा सर्वांच्या स्वातंत्र्याची जबाबदारी अवलंबून राहात आहे, व ती तशी ठेवणें आपणास भाग पडत आहे. हें कांहीं मला मनापासून आवडत नाहीं, सांगून ठेवतों. मला एपिक्यूरस तत्वज्ञाचा प्रत्यक्षवाद पसंत होता, व मी त्याच मताचा होतों हें तुला माहितच आहे. पण माझा निश्चय बदलला, आणि भविष्यसूचक चिन्हांवर थोडाबहूत विश्वास ठेवण्याकडे माझें मन वळलें आहे. सार्डिस येथून आपण कुच करून निघालों तेव्हांच मोठमोठे दोन गरुडपक्षी खालीं उतरून आपल्या निशाणावर बसले. आपल्याच शिपायांनीं त्यांना दाणापाणी घातला, आणि आपल्याच बरोबर तेही फिलिप्पी येथें आले; पण आज सकाळीं पाहिलें तों ते कोठें दिसतना.ते गेले आणि त्यांच्या ऐवजीं काकोल, कावळे व घारी हेच पक्षी दिसूं लागले, व ते आपल्या मस्तकावर घिरट्या घालित असून, आपण मरायला टेकलेले प्राणी आहोंत, अशा दृष्टीनें आपल्याला टोंचायला ते टपले आहेत. आणि त्यांच्याच अशुभसूचक

छायेखालीं आपलें सैन्य असून, तें जणूंकाय मरायला तयार आहे, असें दिसत आहे.

**मेसाला**—छे हो ! असें काय ह्मणतां?

**केशियस**—मी तसें ह्मणत नाहीं. तरीपण थोड्या फार अंशानें तसें समजतों खरें. आतां नव्यानें मी हिंमत धरली आहे, आणि सर्व संकटांना धैर्यानें तोंड देण्याचा मी निश्चय केला आहे.

**ब्रूटस**—हें असेंच ल्युशियस ( एका बाजूला )

**केशियस**—हे थोर ब्रूटस, परमेश्वर कृपेनें शांततेच्या वेळीं जसे आपण मित्रभावानें नांदत आलों, तसेच ह्मातारपणींही नांदूं. पण ज्या अर्थीं मनुष्याचे व्यवहार अगदीं अनिश्चित आहेत, असें आपण पाहातों, त्या अर्थीं कोणावर कसा प्रसंग येईल, याचा कांहीं भरंवसा नाहीं. हें लक्षांत आणून संकटाला नेहमीं सिद्ध असणें, हेंच आपणांस योग्य आहे. तर झालें हेंच आपलें शेवटचें बोलणें. बरें तसें झालेंच तर पुढें काय करावयाचें ?

**ब्रूटस**—ज्या तत्वज्ञानाच्या नियमावरून, आत्महत्या केल्याबद्दल मी केटोला दोष दिला, त्या नियमाचाच जरी विचार केला, तरी—आतां कसें हें मला समजत नाहीं. पण पुढेंमागें आपल्यावर एखादा विपरित प्रसंग ओढवेल या

भीतीनें आपली आयुर्मर्यादा कमी करावयाची, ह्मणजे हें मला भित्रेपणाचें व निंद्य कृत्य वाटतें. ह्मणून मी ह्मणतों कीं सहनशीलतेच्या शस्त्रानें सज्ज होऊन, इहलोकींच्या व्यवहारांचें नियमन करणाऱ्या ईशसत्तेप्रमाणें प्राप्त होणारीं सुखदुःखें भोगण्यास मी तर सिद्ध होईन.

**केशियस**—एकूण आजच्या लढाईंत अपयश आलें, तर रोमनगरच्या रस्त्यांमधून मिरवत जाण्याचा आपणाला आनंदच वाटेल.

**ब्रूटस**—तसें मात्र होणार नाहीं. लक्षांत ठेव कीं या ब्रूटसचें मन थोर आहे; क्षुद्र नाहीं. तेव्हां शत्रूंनीं बांधून रोमनगरांतून नेलेलें त्याला खपेल, असें तूं समजूं नको. पण मार्च महिन्यांतील पंधरा तारखेला सुरू झालेलें कार्य मात्र आजच शेवटास गेलें पाहिजे. आतां पुन्हा आपली भेट होईल कीं नाहीं, हें मला माहित नाहीं. ह्मणून केशियस, हाच आपला शेवटचा, कायमचा, अगदीं अखेरचा रामराम ! जर आपण पुन्हां भेटलोंच, तर आनंदानें भेटूं. आणि तसें नच झालें तर आतां झाली हीच बरी भेट झाली, असें ह्मणावें.

**केशियस**—हे ब्रूटस, हा घ्या अगदीं कायमचा, अखेरचा रामराम ! आपण पुन्हा भेटलोंच तर आनंदानेंच

भेटूं, नाहींच तर झाली हीच अखेरची भेट बरी झाली असें ह्मणावें.

**ब्रूटस**---खरेंच, आज घडणाऱ्या गोष्टीचा शेवट अगोदर कळेल काय? पण दिवस संपला ह्मणजे काय घडलें, हें कळणार. बरें; येवढेंच पुरे. चला, चला! ( जातात )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**–रणभूमी

( सूचनेचा नगारा वाजतो व इतर वाद्येंही वाजतात. ब्रूटस व मेसाला प्रवेश करितात. )

**ब्रूटस**—मेसाला, घोडा भरधांव फेंक. दुसऱ्या बाजूच्या सैन्याला हे हुकुमाचे कागद नेऊन दे. त्यांना ह्मणावें, एकदम हल्ला करा. कारण ऑक्टेव्हियसच्या तुकडीनें कच खाल्ल्यासारखें दिसतें. आणि शत्रूनें जर एका-एकीं हल्ला केला तर आपलेही शिपाई कच खातील कीं काय अशी मला शंका येते. तर जा; मेसाला टांक घोडा भरधांव. तूं लवकर गेलास, ह्मणजे केशियस याच्या तुकडीचे कांहीं शिपाई अजून टेंकडीवर आहेत, ते चटकन खालीं येऊन थडकतील.

( जातात. )

# प्रवेश ३ रा.

स्थळ—रणभूमीची दुसरी बाजू.

( रणवाद्यें वाजतात. केयिशस व टिटिनियस प्रवेश करितात. )

**केशियस**—अरे टिटिनियस, ते पाहिलेस का, ते हरामखोर कसे भागुबाईसारखे पळत सुटले आहेत. माझ्या सैन्याचा निशाणदार इतक्यांतच असा पळून मागें चालला होता, पण मी त्याचा शत्रु बनलों, आणि त्याला ठार करून त्याच्या हातचें निशाण हिसकून घेतलें.

**टिटिनियस**—अहो केशियस, हल्ला करण्याचा हुकूम ब्रूटस यांनीं फार लवकर सोडला; आणि ऑक्टेव्हियसवर मारा करण्याची चांगली संधी मिळाली, असें समजून, आपल्याला जय मिळेलच अशी खात्री वाटून, त्यांनीं मोठ्या दमानें एकदम लढाई सुरू केली. त्यांच्या शिपायांनीं लुटालूट चालविली आहे, व आम्हांला इकडे ॲन्टनीनें गराडा घातला आहे, याची त्यांना दादही नाहीं.

( पिंडॅरस प्रवेश करितो. )

**पिंडॅरस**—महाराज, चला, पळा, लांब पळा; महाराज, मार्क-ॲन्टनी तुमच्या तंबूंत येऊन धडकला आहे. तर हे थोर केशियस महाराज, लांब पळा.

**केशियस**—ही टेंकडी फार लांब आहे का हो? तो दिसत आहे, तेथेंच आपले तंबू आहेत ना?

**टिटिनियस**—होय माहाराज.

**केशियस**—टिटिनियस, माझ्यावर जर तुझें प्रेम असेल तर ह्या माझ्या घोड्यावर स्वार हो, आणि भरधाव फेंकून समोर तें सैन्य दिसत आहे, तें कोणाचें आहे, हें पाहून ये. तें आपलेंच आहे, कीं शत्रूचें आहे, हें समजण्याची फार गरज आहे.

**टिटिनियस**—बरें आहे. अत्यंत शीघ्र गतीनें जाऊन येतों.

**केशियस**—आतां हे पिंडॅरस, तूं ह्या टेंकडीच्या अगदीं वर जा. माझी दृष्टी तर अगदीं मंद आहे; तेव्हां टिटिनियसकडे तूं आपली नजर लाव आणि समरभूमी-वर तुला काय काय दिसतें, तें मला सांग.

( पिंडॅरस टेकडीवर चढतो. )

याच दिवशीं माझा जन्म झाला; आणि वेळ तर अशी आली आहे कीं ज्या दिवशीं माझा जन्म झाला, त्याच दिवशीं माझा शेवट होणारसें दिसतें. खचित् माझी आयुर्मर्यादा संपली. बरें, कायरे ए काय खबर आहे?

**पिंडॅरस**—सरकार!

**केशियस**—काय, खबर काय आहे?

**पिंडॅरस**—टिटिनियसला स्वारांनीं सर्व बाजूंनीं गराडा घातला आहे; आणि तो आपला घोडा भरधांव टाकित पळत सुटला असून, त्याच्यामागें शत्रूचे स्वार लागले आहेत. त्यांनीं आपल्या घोड्यांना टांचा मारल्या; आणि अरेरे! आतां तर त्यांनीं त्याला घेरलाच. अरे टिटॅनियस, त्यांच्या हातून निसटण्याची कांहींतरी तोड काढ. त्यांच्या पैकीं कांहींजण घोड्यावरून उतरले. अरे! आतां तोही उतरला. पकडलाच त्याला. (मोठा गलबला होतो.) ऐका; ते पहा आनंदानें ओरडूं लागले.

**केशियस**—चल, खालीं ये. त्याच्याकडे अधिक पहात राहूं नको. अरेरे! केवढा हा मी भ्याड! माझ्या अत्यंत प्रिय मित्राला माझ्या डोळ्यादेखत धरून नेत असतां, तें पाहाण्याला मी जिवंत राहावें ना?

(पिंडॅरस खालीं उतरतो.)

चलरे असा इकडे ये. पार्थिया देशांत मी तुला कैदी केला, त्यावेळीं तूं शपथ वाहिलिस कीं जें जें तुम्हीं मला सांगाल, तें तें मी यथाशक्ती मनोभावानें करीन. आणि याच शर्तीवर मी तुझे प्राण वांचविले. चल तर आतां आपली शपथ पाळ. मी तुला आतां स्वतंत्र केला. तर सीझरच्या काळीजाचा ठाव घेणाऱ्या या पाणीदार तलवारीनें माझ्याही काळजाचा ठाव घे. उत्तर नको.

तलवारीच्या मुठीला हात घाल आणि आतां झांकलें आहे, असें माझें तोंड मी झांकून घेतल्यावर तिचा मार्ग तिला दाखीव.

( पिंडॅरस तलवारीनें त्याला भोंसकतो. )

अरे सीझर ! तुझ्या वधाचा सूड उगवला गेला; आणि ज्या तलवारीनें तुला ठार केलें, तीच तलवार या वेळींही उपयोगी पडली. ( मरतो. )

**पिंडॅरस**—आतां मी स्वतंत्र झालों, हें खरें. आणि मनांत होतें तसा वागलों असतों, तर मात्र कधीं स्वतंत्र झालों नसतों. असो; हे केशियस, जेथें कोणीही रोमन मनुष्य माझी विचारपूस करायला येणार नाहीं, अशा देशाला हा पिंडॅरस पळून जात आहे. ( जातो. )

( टिटिनियस व मेसाला पुन्हा प्रवेश करितात. )

**मेसाला**—टिटिनियस, लढाईत हें असें व्हायचेंच. कारण थोर ब्रूटसच्या सैन्यानें ऑक्टेव्हियसचा पराजय केला, तर इकडे ॲन्टनीनें केशियसच्या लोकांचा पाडाव केला.

**टिटिनियस**—या बातमीनें केशियसला खचित आनंद होईल.

**मेसाला**—तूं त्याला कोठें सोडलास ?

**टिटिनियस**—मी गेलों तेव्हां तो अगदीं खिन्न झाला

होता व याच टेकडीवर उभा होता. त्यावेळीं त्याजबरोबर त्याचा गुलाम पिंडॅरस मात्र होता.

**मेसाला**—येथें जमिनीवर पडला आहे, हाच तर तो नाहींना ?

**टिटिनियस**—अरे, हा कांहीं जिवंत दिसत नाहीं. हाय रे हाय !

**मेसाला**—हाच नव्हे का तो ?

**टिटिनियस**—छे ! मेसाला ! हा तोच खरा, पण तो केशियस आतां गेला ! हे अस्ताचलाप्रत जाणाऱ्या दिनकरा, तूं ज्याप्रमाणें आपल्या आरक्त किरणांसह आज रात्रीच्या घोर अंधःकारांत लोपून गेला आहेस, त्याचप्रमाणें केशियस हाही हृदयांतून निघालेल्या लाल रक्तासहित आपला शेवटला दिवस समाप्त करून निघून गेला. रोमनगरचा सूर्य आज मावळला. आमची सर्व उमेद लयास गेली. संकटाचे ढग दिसूं लागले. दुःखांचे दंव बिंदु पडूं लागले. झालें; आमचे पराक्रम आटोपले. एकूण, कार्यांत यश येईल कीं नाहीं या संशयामुळेंच असा परिणाम झाला.

**मेसाला**—खरोखर, कार्यांत यश येईल कीं नाहीं, या अविश्वासाचेंच हें फळ; आणखी कांहीं नाहीं. उद्विग्नतेच्या उदरीं जन्म घेणाऱ्या हे विभ्रमा ! ज्या गोष्टींचा संभवच

मुळीं नाहीं त्यांचें अस्थित्व मनुष्यांच्या मनाला भासवितोस. हे विभ्रमा तुझा गर्भसंभव जरी त्वरेनें होतो तरी तुझें जनन कधींही सुखानें होत नाहीं. ज्या मातेनें तुला वाढविलें, तिलाच तूं मारून टाकतोस.

**टेटिटिएस**—अरे, पिंडॅरस येथें कोठें दिसत नाहीं, हें काय?

**मेसाला**—त्याला शोधा तरी अम्मळ. तोंपर्यंत मी थोर ब्रूटसला भेटून, ही बातमी त्याच्या कानावर घालतों. खचित ही बातमी,विषारी शस्त्रें, व प्राणघातकबाण ह्यांच्या इचकीत ब्रूटसच्या कानाला गोड लागेल.

**टिटिनियस**—जा तर लवकर मेसाला. इकडे तोंपर्यंत मी पिंडॅरसला शोधितों.

( मेसाला जातो. )

हे शूर केशियस! मला तूं पुढें जाण्यास कां बरें सांगितलेंस? तुझ्या मित्राला मी भेटलों आणि त्यानेंच ही जयश्रीची माळ माझ्या गळ्यांत घालून, ती तुला अर्पण करावयास मला सांगितलें.आतां मी ती कोणाला अर्पण करूं? त्याचा जयघोष तूं ऐकला नाहींस का? अरेरे! प्रत्येक गोष्टीचा तूं भलत्याच तऱ्हेनें अर्थ केलास. पण आधीं हीं जयश्रीची तूं आपली माळ घे. ही माळ तुझ्या गळ्यांत घालण्याविषयीं तुझ्या ब्रूटसनें मला बजावून सांगितलें

आहे, आणि त्याप्रमाणें मी करित आहें. ब्रूटस! चल, लवकर ये. आणि केशियसचा मी कसा सन्मान करित आहें, हे पाहा. हे देवतांनो! तुमची परवानगी घेऊन हा रोमन गृहस्थ आपलें कर्तव्य करित आहे.

( स्वतःस मारून घेतो. )

( दुंदुभी वाजतात. मेसाला, ब्रूटस, तरुण केटो, स्ट्रॅटो, व्हाल्युमनियस व ल्यूसिलियस पुन्हा प्रवेश करितात. )

**ब्रूटस**—मेसाला, कुठें त्याचें शव पडलें आहे?

**मेसाला**—तें पाहा पलिकडे. आणखी टिटिनियस तेथें शोक करित आहे तें.

**ब्रूटस**—टिटिनियसचें तोंड तर वर आहे.

**केटो**—तो तर मारलेला दिसत आहे.

**ब्रूटस**—हे ज्यूलियस सीझर! अझूनही तूं प्रबळच आहेस; तुझा आत्मा बाहेर फिरत असून, आमच्याच तरवारी आमच्याच आंतड्यांत भोंसकवित आहे.

( दुंदुभी हळूहळू वाजलेल्या ऐकूं येतात. )

**केटो**—अरे शूर टिटिनियस! तूं ती जयश्रीची माळ मृत केशियसच्या गळ्यांत घातलीस कीं नाहीं?

**ब्रूटस**—यांच्यासारखे आणखी दोन रोमन गृहस्थ कोणी अजून जिवंत असतील काय हो? रोमन लोकांमधल्या या शेवटच्या पुरुषश्रेष्ठाला प्रणाम असो! रोममध्यें पुन्हा तुझ्या-

सारखा नरश्रेष्ठ जन्माला येणें कठिण आहे. मित्रांनो ! हल्लीं मला जितकें दुःख होत आहेसें तुह्मांला वाटतें, त्याहून अधिक दुःख यांच्याबद्दल मला झालें पाहिजे. चिंता नाहीं; तें दुःख दर्शविण्याची संधी मला लवकरच मिळेल. आतां हें शव थेसस येथें पाठवा. त्याचा प्रेत-संस्कार पाहून आपल्याला दुःख होईल, ह्मणून तो येथें होणें इष्ट नाहीं. चला, ल्यूसिलियस, केटो, चला आपण संग्रामभूमीवर जाऊं. लेबियो, फ्लेव्हियस आपली लढाई चालू करा. आतां तीन वाजले आहेत; आणि या दुसऱ्या लढाईचा शेंवट रात्र पडली नाहीं तोंच काय होतो, तें आपण पाहूं.

( जातात. )

## प्रवेश ४ था.

स्थळ—रणभूमीची दुसरी बाजू.

( रणवाद्यें वाजत आहेत, दोन्ही बाजूंकडील सैन्याचे शिपाई लढत आहेत, अशा समयीं, ब्रूटस, तरुण केटो, ल्यूसिलियस व इतर लोक प्रवेश करितात. )

**ब्रूटस**—देशबांधवहो ! अजून उमेद सोडूं नका.

**केटो**—उमेद सोडील तो खराच पाजी ह्मटला पाहिजे. असा पाजी कोण आहे ? माझ्याबरोबर येण्याला कोण

तयार आहे ? समरांगणावर मी आपल्या नांवाची ग्वाही फिरवीन. मी मार्कस केटोचा पुत्र आहें. जुलमी लोकांचा शत्रू व देशबंधूंचा मित्र असा मार्कस केटोचा जो पुत्र तो मी आहें.

**ब्रूटस**—आणि मी ब्रूटस; मार्कस ब्रूटस तो मी. मी ब्रटस आपल्या देशाचा मित्र. मी ब्रूटसच हें पक्कें समजा.

**ल्युसिलिय**—हे तरुण केटो ! तूं पडलास काय ? टिटिनियसप्रमाणें तूंही शौर्यानेंच मेलास; आणि केटोच्या मुलाला योग्य असाच मानसन्मान तुला मिळेल.

**पहिला शिपाई**—शरण ये, नाहींतर मरण्याला तयार हो.

**ल्युसिलियस**—मरण यावें ह्मणूनच मी शस्त्र ठेवतों. मला चटकन उडव हेंच मी मागतों. हें घे.

( त्याला पैसे देऊं करतो. )

ब्रूटसला मार व आपलें नांव करून ठेव.

**पहिला शिपाई**—छे बोवा ! आपण नाहीं मारणार येवढा थोर कैदी.

**दुसरा शिपाई**—अरे चला, बाजूला व्हा; अन्टनीला कळवा कीं ब्रूटसला कैदी केला आहे.

**पहिला शिपाई**—मी जाऊन सांगतों ही बातमी. ह्या पहा सेनापती इकडेच येत आहे.

( अॅन्टनी प्रवेश करितो. )

महाराज ब्रूटसला कैद केलें आहे. ब्रूटसला पकडून आणलें आहे, सरकार.

**ॲन्टनी**—कोठें आहे तो ?

**ल्युसिलियस**—महाराज सुरक्षित आहे. तो ब्रूटस अगदीं सुरक्षित आहे. मीं खात्रीनें सांगतों कीं कोणत्याही शत्रूच्यानें ब्रूटसला जिवंत धरून आणवणार नाहीं. महान् महान् देव अपकीर्तिपासून त्याचें रक्षण करित आहेत. तो जिवंत असो किंवा मेलेला असो. तुम्हांला कसाही आढळला तरी तो ब्रूटससारखाच इमानी ब्रूटस असणार.

**ॲन्टनी**—मित्रा! हा कांहीं ब्रूटस नव्हे; तर ही तितक्याच किंमतीची एक बहुमोल वस्तु आहे, एवढें बरिक खरें. मनुष्याला नीट सुरक्षित ठेवा.त्याला मोठ्या सदयतेनें वागवा. अशीं माणसें शत्रूच्या ऐवजीं जर माझीं मित्रवर्गातलीं असतीं, तर किती चांगलें झालें असतें ? जा तर लवकर; ब्रूटस जिवंत आहे, कीं मेला आहे हें पहा. आणि बाकीच्या सर्व गोष्टी कशा काय चालल्या आहेत, याबद्लची काय ती खबर ऑक्टेव्हियसच्या तंबूत येऊन मला कळवा.

# प्रवेश ५ वा.

स्थळ—संग्रामभूमीची दुसरी बाजू.

( ब्रूटस, डार्डेनियस, क्लिटस, स्ट्रॅटो व व्होल्यूमिनियस प्रवेश करितात. )

**ब्रूटस**—हे माझ्या राहिलेल्या मित्रांनो! तुम्हांतून जेवढे जिवंत असाल, तेवढ्यांनीं या खडकावर बसून विश्रांती घ्यावी.

**क्लिटस**—महाराज, सॅटिलियस यानें मशालीचा उजेड दाखविला; पण तो कांहीं परत आला नाहीं. तेव्हां तो जिवंत आहे, कीं मेला आहे, कीं त्याला कैद केलें आहे, हें कांहींच कळत नाहीं.

**ब्रूटस**—क्लिटस तूं खालीं बैस. मरणें हेंच काय तें आपलें आतां ब्रीद. ऐक क्लिटस. ( त्याच्या कानांत कांहीं सांगतो. )

**क्लिटस**—महाराज, काय म्हणतां? मी असें करूं? छे! सारें जग कोणी देऊं केलें तरी तसें होणें नाहीं.

**ब्रूटस**—बरें पण गप्प राहा; शब्द काढूं नको.

**क्लिटस**—त्यापेक्षां मी स्वतःलाच मारून घेतों.

**ब्रूटस**—डार्डेनियसा ऐक. (त्याच्या कानांत कांहीं सांगतो.)

**डार्डेनियस**—मी असलें कृत्य करूं काय?

**क्लिटस**—डार्डेनियस!

**डार्डेनियस**—क्लिटस! काय रे?

**क्लिटस**—कोणतें वाईट कृत्य करावयास ब्रूटसनें तुला सांगितलें?

**डार्डेनियस**—क्लिटस, अरे मला ठार मार असें तो ह्मणाला. पहा तो विचारांत निमग्न झाला आहे.

**क्लिटस**—दुःखानें तें पात्र इतकें भरलें आहे काय? हो, असें दिसतें खरें. त्यांतील पाणी उंचबळून, हे पहा डोळ्यावाटे अश्रु वाहूं लागले.

**ब्रूटस**—व्होल्युमनियस, असा इकडे ये. मी काय म्हणतों तें ऐक.

**व्होल्युमनियस**—महाराज, काय आपलें म्हणणें आहे?

**ब्रूटस**—व्होल्युमनियस, हें पहा सीझरचें पिशाच्च मला रात्रीचें दोनदां दोन ठिकाणीं दिसलें; एकदां सार्डिज येथें आणि कालच रात्रीं या रणभूमीवर; तेव्हां मला वाटतें, आतां माझीं शंभर वर्षें भरलीं.

**व्होल्युमनियस**—छे महाराज, तसें कांहीं नाहीं.

**ब्रूटस**—छे! रे व्होल्युमनियस, माझी अगदीं खात्री होऊन चुकली आहे. व्होल्युमनियस हें जग कसें चाललें आहे, तें तूं पहातों आहेसच. शत्रूनें आपल्याला या खळग्या-पर्यंत हटवीत आणलें आहे, ( दुंदुभी हळू हळू वाजतात. ) तेव्हां आतां शत्रूनें आपल्याला ढकलून देण्यापूर्वी आपण

होऊनच आतां खळग्यांत उड्या घ्याव्या,हेंच चांगलें नाहीं काय? व्होल्युमनियस, तुला ठाऊकच आहे कीं आपण अगदीं लहानपणापासून एकाच शाळेंत होतों. आपण लहानपणापासून एकमेकांचें संवगडी आहों; तेव्हां तुला माझी अशी विनंती आहे कीं त्या बाळपणच्या प्रेमासाठीं तरी निदान आंतां ही माझी तलवारीची मूठ धर ह्मणजे मी तीवर पडतों.

**व्होल्युमनियस**—महाराज, मित्राचें हें कांहीं काम नव्हे.

( दुंदुभी बाजतात· )

**क्लायटस**—महाराज, पळा पळा ! येथें थांबण्याची सोय नाहीं

**ब्रूटस**—आतां तुह्मांला सर्वांना व व्होल्युमनियस तुला माझा रामराम. स्टॅटो, आतांपर्यंत तूं तर निजूनच राहिला आहेस; बरें तर तुलाही आतां रामराम. देशबांधव हो ! आतांपर्यंत माझ्याशीं अप्रामाणिकपणें वागणारा एकही मनुष्य माझ्या पाहाण्यांत आला नाहीं, याबद्दल माझ्या अंतःकरणाला समाधान होत आहे. ऑक्टेव्हियस व मार्कस ॲन्टनी यांना आजच्या या क्षुद्र जयानें जितका आनंद होईल, त्यापेक्षां आमच्या पराजयानेंच मला अधिक आनंद होत आहे. तेव्हां आतां सर्वांना रामराम. कारण ब्रूटसच्या जिभेनें त्याच्या इतिहासाचा शेवटला भाग आतां अगदीं संपविला. रात्रीच्या जागरणानें माझे डोळे

कसे अगदीं ओढून गेले आहेत. ज्या माझ्या शरिरानें आतांपर्यंत एवढा त्रास सहन केला, त्याला विश्रांती मिळाली पाहिजे.

( दुंदुभी वाजतात, पळा, पळा, असा आंत गलबला होतो. )

**क्लिटस**—महाराज, पळा, पळा.

**ब्रूटस**—हं चला ? मी आलोंच.

( क्लिटस, डार्डेनियस, व्होल्युमनियस जातात. )

स्ट्रॅटो, तुझ्या धन्यापाशीं उभा रहा, अशी मी तुला विनंती करतों. तूं चांगला संभावित मनुष्य आहेस. तुझ्या वागणुकीवरून दिसतें कीं मानसन्मानाची तुला कांहीं चाड आहे. तर ही माझी तलवार धर, आणि आपलें तोंड फिरीव ह्मणजे मी तिजवर पडतों. स्ट्रॅटो, करशील का एवढें ?

**स्ट्रॅटो**—महाराज पहिल्यानें आपला हात पुढें करा. रामराम, महाराज.

**ब्रूटस**—रामराम, स्ट्रॅटो. अरे सीझर तूं आतां शांत हो. मी स्वतःला मारून घेत आहें तो खुषीनेंच घेत आहें, पण तुला मारलें, तें मात्र खुषीनें मारलें नाहीं. ( त्यानें धरलेल्या तलवारिवर पडतो व प्राण सोडतो. )

( दुंदुभी वाजतात व सैन्य मागें फिरतें. ऑक्टेव्हियस, ॲंटनी, मेसाला, ल्युसिलियस हे प्रवेश करितात, व त्यांचे मागोमाग सैन्य येतें )

**ऑक्टेव्हियस**—तो कोण माणूस आहे ?

**मेसाला**—हा माझ्या धन्याचा माणूस; अरे स्ट्रॅटो तुझा धनीरे कोठें आहे ?

**स्ट्रॅटो**—मेसाला, तुह्मीं आहां, त्या गुलामगिरींतून तो मुक्त झाला. आतां फार झालें तर हे विजयी लोक त्याचें शव जाळतील इतकेंच त्यानें आपल्या स्वतःला जिंकलें; आणि त्याला मारण्याचा मान कोणालाहि घेतां येणार नाहीं.

**ल्युसिलियस**—तर मग ब्रूटस कोठें आहे, तें पाहिलें पाहिजे धन्य आहे ब्रूटस! धन्य आहे ! तूं ल्यूशियस याचें ह्मणणें खरें केलेंस.

**ऑक्टेव्हियस**—ज्यानीं ज्यानीं ह्मणून ब्रूटसची चाकरी केली, त्यांचा त्यांचा मी समाचार घेईन. आतां राहिलेलें तुमचें आयुष्य माझ्या नोकरींत घालविण्याची तुमची मर्जी आहे काय ?

**स्ट्रॅटो**—मेसला यानें जर तुमच्यापाशीं माझी शिफारस केली, तर मी तसें करण्यास खुशी आहें.

**ऑक्टेव्हियस**—मेसाला तसें याला सांग.

**मेसाला**—अरे स्टॅटो, माझा धनी कसा मेला ?

**स्ट्रॅटो**—मी तलवार धरली आणि तो तिच्यावर पडला.

**मेसाला**—ऑक्टेव्हियस, याला आपल्याबरोबर येऊं द्या तर; कारण माझ्या धन्याची त्यानें नुकतीच शेवटची नोकरी बजावली आहे.

**ॲन्टनी**--खरोखर हा ब्रूटस मात्र समस्त रोमन लोकांत अत्यंत श्रेष्ठ होता. त्याच्याखेरीज इतर कटवाल्यांनी जें कांहीं केलें, तें त्या महान सीझरशीं मत्सर धरून केलें. पण तो त्यांस मिळाला तो मात्र लोक कल्याणाचा, निष्पाप, शुद्ध हेतू मनांत धरूनच त्यांस मिळाला. तोच खरा कुलीन. त्याच्या ठिकाणीं पंचतत्वें अशा रितीनें वठलीं होतीं कीं प्रत्यक्ष सृष्टी देवीच पुढें येऊन, बोलती झाली तर तीही ह्मणेल कीं हाच, याला ह्मणावें महा पुरुष !

**ऑक्टेव्हियस**--तर मग त्याच्या गुणांना अनुरूप असाच त्याचा अंतविधि आपण करूं. आजची रात्र त्याचें शव मोठ्या शूर वीराप्रमाणें माझ्या तंबूतच थाटा-माटानें राहूं द्या. आणि रणांगणावरील सर्व लोकांनाही विश्रांती घेऊं द्या. आणि आपणही आजच्या जयश्रीचें सुख अनुभवण्यास आतां जाऊं.

( पडदा पडतो. )

